# अमर विश्व साहित्य





४

भारतीय ग्रंथ भवन

# अमर विश्व साहित्य

अमेरिकन, इंग्लिश, रशियन, फ्रेंच, जर्मन, नॉर्वेजियन अशा
चौदा कादंबऱ्या; ग्रीक, इंग्लिश, अमेरिकन अशीं सात नाटकें;
एक लॅटिन महाकाव्य आणि एक इंग्लिश परीकथा;
अशा एकंदर तेवीस जगप्रसिद्ध ग्रंथांचे सारांश


अनुवादक

**स. ह. मोडक**






**भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४**

# अनुक्रमणिका

# ऋण निर्देश

पुढील कॉपीराइट ग्रंथांचा या भागांत उपयोग करण्यास परवानगी दिल्याबद्दल आम्ही त्या त्या ग्रंथांच्या लेखकांचे वा प्रकाशकांचे आभारी आहोंतः

**पीयर ग्यिन्ट,** लेखक हेन्रिक इब्सेन; 'द कलेक्टेड वर्क्स ऑफ हेन्रिक इब्सेन' या ग्रंथांतून; अनुवादक विल्यम अँड चार्ल्स आर्चर; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें. **द प्लेबॉय ऑफ द वेस्टर्न वर्ल्ड,** लेखक जॉन मिलिंग्टन सिंज; रँडम हाउस इन्कॉर्पोरेटेड यांच्या परवानगीनें; प्रकाशक द मॉडर्न लायब्ररी इन्कॉर्पोरेटेड; कॉपीराइट, १९३५, द मॉडर्न लायब्ररी इन्कॉर्पोरेटेड यांचा. **क्वालिटी स्ट्रीट,** लेखक जेम्स एम्. बॅरी; 'द प्लेज ऑफ जेम्स एम्. बॅरी' या ग्रंथांतून; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९१४, चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांचा, १९१८, १९२८, जे. एम्. बॅरी यांचा. **द स्कूल फॉर स्कॅन्डल,** लेखक रिचर्ड ब्रिन्स्ले शेरिडन; प्रकाशक द मॅकमिलन कंपनी. **स्ट्राइफ,** लेखक जॉन गाल्सवर्दी; 'प्लेज,' लेखक जॉन गाल्सवर्दी, या ग्रंथांतून; प्रकाशक चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९०९, १९१०, जॉन गाल्सवर्दी यांचा, १९२८, चार्ल्स स्क्रिब्नर्स सन्स यांचा. **चिल्ड्रेन ऑफ गॉड,** लेखक व्हार्डिस फिशर; खुद्द लेखकाच्या आणि प्रकाशक व्हॅन्गार्ड प्रेस, इन्कॉर्पोरेटेड, यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९३९, व्हार्डिस फिशर यांचा. **क्लॉडियस द गॉड,** लेखक रॉबर्ट ग्रेव्हज; खुद्द लेखकाच्या आणि प्रकाशक रँडम हाउस, इन्कॉर्पोरेटेड, यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९३४, हॅरिसन स्मिथ अँड रॉबर्ट हास, इन्कॉर्पोरेटेड, यांचा. **द क्लेहँगर ट्रायलॉजी,** लेखक आर्नोल्ड बेनेट; ए. पी. वॉट ॲन्ड सन, लंडन, यांच्या आणि प्रकाशक डबलडे अँड कंपनी, इन्कॉर्पोरेटेड, यांच्या परवानगीनें; कॉपीराइट, १९१०, डबलडे, अँड कंपनी, इन्कॉर्पोरेटेड, यांचा; पुन्हां नव्यानें घेतलेला कॉपीराइट, १९३७, मारीय मार्गारेट बेनेट यांचा.

# द मिसॅन्थ्रोप : मानव-वैरी

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* मोलियर (जीन बातिस्त पॉक्केलिन, १६२२-१६७३). *कथानकाचा प्रकार :* *शिष्टाचारविषयक सुखान्तिका. *काळ :* सतरावें शतक. *स्थळ :* पॅरिस. *पहिला प्रयोग :* १६६६.

*प्रमुख पात्रें :* **आल्सेस्ते**, याचें सेलिमीने हिजवर प्रेम असतें. **फीलिन्ते**, आल्सेस्तेचा मित्र. **ओरोन्ते**, याचें सेलिमीनेवर प्रेम असतें. **सेलिमीने**, एक तरुण विधवा. **एलियान्ते**, सेलिमीने हिची चुलत बहीण.

*समीक्षण :* मोलियर, जन्मनांव जीन बातिस्त पॉक्केलिन, हा सुखान्त नाटकांचा श्रेष्ठ फ्रेंच लेखक. त्यांतल्या त्यांत शिष्टाचारप्रधान सुखान्तिका लिहिण्यांत तर त्याचा हातखंडाच आहे. त्याच्या प्रतिभेचा विषयविस्तार आणि तींतील भूतदयावाद या गुणांच्या बाबतींत त्याची कधीं कधीं शेक्स्पियरशीं तुलना करतात. 'द मिसॅन्थ्रोप' हें नाटक जरासा दुःखद शेवट असलेली अशी सुखान्तिका आहे. परंतु त्यांत केलेलें शिष्टाचारांचें चित्रण हा त्यांतल्या गुणाचा आधार आहे. मोलियरनें स्वतःच्या काळाचें जें वस्तुनिष्ठ विश्लेषण केलें, तें आपल्याला त्याच्या 'द मिसॅन्थ्रोप' या नाटकांत दिसतें. कारण आपल्या समकालीनांचा क्षुद्रपणा व विसंगतपणा तो जगाच्या नजरेसमोर उघड करून दाखवितो.

*कथानक :* आल्सेस्ते याला त्याच्या अनेक मित्रांनीं 'मानव-वैरी' अशी पदवी दिली. आणि त्याला हें नांव मिरवण्यांत एक प्रकारचा हटवादी आनंदच वाटूं लागला. त्याच्या या स्वभाववैशिष्ट्यापायीं त्याचा सन्मित्र फीलिन्ते याच्याशीं त्याचें कडाक्याचें भांडण झालें. हा स्नेही आपल्या काळांतल्या क्षुद्र शिष्टाचारांपुढें बिनतक्रार मान तुकवीत असे; आणि त्याच्या या वृत्तीमुळें आल्सेस्तेचा जळफळाट होई. सहज ओळख झालेल्या कुणा इसमाला चालू रीतीभातीनुसार फीलिन्तेनें गाढ आलिंगन दिलें रे दिलें कीं आल्सेस्तेनें ठांसून सांगावें कीं : "तुझी ही असली वागणूक अगदीं ढोंगीपणाची आहे. तुझी त्या माणसाशीं जवळ जवळ मुळींच ओळख नसतांना तूं त्याच्या बाबतींत आपल्या प्रेमाचं येवढं प्रदर्शन करावंस हें कांहीं तुला शोभत नाहीं."

फीलीन्तेनें यावर आल्सेस्तेला आठवण करून दिली कीं "अरे, तुझा·

खटला आतां सुनावणीला निघायच्या जवळ जवळ बेतांत आलेला आहे अशा परिस्थितींत तूं सर्वसाधारण मानानं लोकांच्या बाबतींतली तुझी वृत्ति जरा नेमस्त ठेवलीस फार बरं होईल." या खटल्यांतले आल्सेस्तेचे प्रतिस्पर्धी लोकांची मर्जी संपादन करण्यासाठीं शक्य ते सगळे उपाय करीत होते. परंतु आल्सेस्तेचें वागणें आपलें कांहींच्या बाहींच. जो जो भेटेल त्या त्या प्रत्येकाचा अपमान करायचें त्यानें सत्रच चालविलेलें होतें. मग न्यायाधीशांना आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठीं त्यानें कसलीहि खटपट केली नाहीं, यांत आश्चर्य कसचें?

त्यांत पुन्हां आल्सेस्तेला उद्देशून टोमणे मारायला फीलिन्तेला त्याच्या प्रेमप्रकरणाचें एक चांगलेंच निमित्त मिळालेलें होतें. त्याची प्रियतमा म्हणजे सेलिमीने. शिष्टसमाजाची एक पुढारीण या नात्यानें तिला बहुतेक सारा वेळ ढोंगीपणा करण्यांतच घालवावा लागे. तरी देखील आल्सेस्तेचें प्रेम तिच्यावरच. फीलिन्तेनें ही विसंगति दाखवून दिल्यावर बिचाऱ्या आल्सेस्तेला या बाबतींत हार मान्य करावी लागली. बुद्धिवादाच्या कोणत्याहि कसोटीला अनुसरून आपल्या या प्रेमाचा आपल्याला उलगडा करून सांगतां येत नाहीं हें आल्सेस्तेला मुकाट्यानें कबूल करणें भाग पडलें.

या दोघांचा हा तंटा असा अगदीं ऐन रंगांत आलेला असतांना ओरोन्ते हा आल्सेस्तेला भेटायला आल्यामुळें उभय मित्रांच्या तंटयांत चांगलाच व्यत्यय आला. हा सफाईदार चालचलणुकीचा नि गोडबोल्या ओरोन्ते सगळें सोडून आपल्याला भेटायला कसा काय आला याचें आल्सेस्तेला तर मोठें कोडेंच पडलें. पण त्या कोड्याचा लवकरच उलगडा झाला. ओरोन्ते यानें नुकतेंच एक सुनीत रचलें होतें. त्या सुनीताच्या वाङ्मयीन गुणांविषयीं आल्सेस्तेचा अभिप्राय मिळावा म्हणून त्याला फारच उत्सुकता वाटत होती. म्हणून त्या सुनीताचें हस्तलिखित बरोबर घेऊन स्वारी इकडे आलेली होती. तें वाचून दाखविण्याची परवानगी त्यानें उभय मित्रांना विचारली.

मग आपण जरा चांचरत असल्याची यथास्थित बतावणी करून ओरोन्तेनें आपली ही सामान्य काव्यरचना वाचून तर दाखविली. तसा आल्सेस्ते हा भलताच प्रामाणिक माणूस. खोटी स्तुति करणें त्याला बिलकुल आवडायचें नाहीं. त्यानें कवीच्या तोंडावर या सुनीतांतील कडव्यांची कडक शब्दांत खरडपट्टी

काढली. येवढ्यावरहि तो थांबला नाहीं. त्यानें कवीच्या अगदींच सुमार लेखन-गुणाचा तीव्र उपहास केला. ओरोन्ते हा बोलूनचालून कवीच. त्याला ही टीका ऐकून ताबडतोब भयंकर राग आला. आणि या निमित्तानें .दुसऱ्याच एका भांडणाला तोंड लागलें. भांडणांतील युक्तिवादांची तड कांहीं शेवटपर्यंत लागलीच नाहीं. ते अनिर्णीतच राहिले. परंतु या तंटयांतून कवि आणि टीकाकार या उभयतांचें द्वंद्व युद्ध उद्भवणार असा रागरंग मात्र दिसूं लागला.

मग आल्सेस्ते महाशय आपली प्रेयसी सेलिमीने हिला भेटायला गेले. तिला भेटतांक्षणीं त्यानें तिच्यावर विकृत दृष्टिकोनांतून टीकेचा भयंकर मारा सुरू केला. "तुझी वागणूक छिछोरपणाची असते, तुझ्या इतर लोकांविषयींच्या वृत्तींत दांभिकपणा भरलेला असतो," अशीं अनेक दूषणें लावून त्यानें तिची सडकून हजेरी घेतली. तशी सेलिमीने बोलायला कांहीं कमी नव्हती. कुणाची निंदानालस्ती करायची असली, कुणाचा फजीतवाडा उडवायचा असला, तर तिच्या बुद्धीला खूप धार चढे आणि जिभेचें अस्त्र खूप तीक्ष्णपणें चाले. पण हे सगळें टीकाविषयक व्यक्ति गैरहजर असतांना. समक्षासमक्ष म्हणाल तर ती समोर असलेल्या माणसाची इतकी बेफाट स्तुति करी कीं ऐकणारानें लाजेनें चूर होऊन जावें. आणि त्याच्याशीं बोलतांना तर त्याच्याबद्दल इतकी आस्था दाखवी कीं कांहीं विचारायची सोयच नाहीं. तिची हीच वृत्ति आल्सेस्तेला बिलकुल नापसंत होती.

कित्येक मित्रमंडळी भेटायला आल्याची वर्दी नोकरानें दिली. या मंडळींमध्यें एलियान्ते ही देखील होती. ही सगळी मंडळी तिथेंच गप्पा मारत बसली, हें बघून आल्सेस्ते स्तंभितच झाला. त्यांच्या गप्पा संपतां संपेनात. आपल्या समाइक ओळखीच्या माणसांचीं एकेक नांवें या गप्पांमध्यें सादर करतांना पुरुष मंडळींना खूप आनंद व्हायचा. आणि असें एकेक नांव पुढें आलें कीं त्या त्या व्यक्तीच्या बाबतींत सेलिमीने हिनें कसले तरी अनुदार उद्गार काढायचे. तसें बघितलें तर त्या खोलींत हजर असलेल्या मंडळीमध्यें आणखी एकच सभ्य व्यक्ति होती. ती म्हणजे एलियान्ते. तिचें सौजन्य आणि तिच्या हृदयाचा दयाशीलपणा हे गुण सेलिमीनेच्या दाहक बुद्धिमत्तेशीं तुलना करतां विरोधामुळें उठून दिसत होते.

परंतु सेलिमीनेच्या बौद्धिक झगझगाटापुढें एलियान्तेचें तेज पडत नसे

त्यामुळें तिच्याकडे कुणाचें फारसें लक्षच नाहीं जायचें. सगळ्या पुरुष मंडळींनीं या दिवशीं जणूं काय सेलिमीनेची खुशामत करायचा पणच केलेला दिसला. कुणी जाग्यावरून हलेचना. जो तो सांगूं लागला : " आपण बुवा आतां इथंच गप्पा मारत बसणार. " सेलिमीनेच्या सहवासांत अधिकांत अधिक वेळ काढायची त्यांच्यामध्यें एक प्रकारची स्पर्धाच लागून राहिली. हा एकंदर प्रकार बघून आल्सेस्तेनें निर्धारच करून टाकला कीं आपण सगळ्यांच्या शेवटीं इथून हलायचें.

तथापि एक हवालदार तेवढ्यांत तिथें येऊन दाखल झाला. कोर्टासमोर हजर राहण्यासाठीं तो आल्सेस्तेवर समन्स बजावायला आलेला होता. हें ऐकून आल्सेस्तेला फारच आश्चर्य वाटलें. हा प्रकार आहे तरी कसला ? मग आल्सेस्तेला कळलें कीं त्यांत विशेष असें कांहीं एक नाहीं. त्याचें व ओरोन्तेचें जें भांडण झालें त्याचा डंका सगळीकडे चांगलाच गाजला. तेव्हां अधिकाऱ्यांना अशी खबरदारी घ्यावीशी वाटली की जर का या उभयतांना द्वंद्व युद्ध करायची खुमखुमी आली तर त्यांच्यावर या बाबतींत अगोदरच मनाईहुकुम बजावून या या गोष्टीचा पक्का प्रतिबंध करून ठेवावा. हें समजल्यावर आल्सेस्ते या प्रकाराचा मोठमोठ्यानें निषेध करीत गर्जून सांगूं लागला : " खुद्द राजेसाहेबांनींच माझ्यावर तसा हुकुम बजावला तर गोष्ट वेगळी. येरव्हीं मी ओरोन्तेच्या काव्य-गुणांची प्रशंसा करायला कधींहि तयार होणार नाहीं. " त्याची ही गर्जना चालू असतांनाच हवालदार त्याला तिथून आपल्याबरोबर कोर्टाकडे घेऊन गेला.

तो गेल्यावर आर्सिनोए ही महिला सेलिमीने हिला भेटायला म्हणून तिच्या घरीं आली. आपण फारच शीलवान व चारित्र्यवान आहोंत असा खोटाच टेंभा ही बाई मिरवीत असे. या भेटीच्या संधीचा फायदा घेऊन ही बाई सेलिमीनेला धोक्याचा इशारा देऊं लागली. हिनें सांगितलें : " बाई सेलिमीने, तुझ्या वागणुकीवर लोक फार टीका करूं लागले आहेत. तुला मागणी घालायला येणाऱ्या भावी वरांची तुच्याकडे खूपच गर्दी झालेली असते आणि तूं सगळ्यांनाच उत्तेजन देतेस असं लोक म्हणतात. त्यांत पुन्हां तुझी तिखट जीभ ! तुझं हें वागणं नि बोलणं सुधार ग बाई ! याच्यापायीं तुझ्या अब्रूचे धिंडवडे निघायला लागले आहेत. म्हणून म्हणत्यें, संभाळ ! " सेलिमीने तिचें

ऐकून घेऊन गप्प थोडीच बसणार! तिनें आर्सिनोए हिच्या सुतासारख्या सरळ स्वभावाचे बोचकारे काढकाढून त्याच्या अगदीं चिंध्या करून टाकल्या.

मग आर्सिनोए हिनें असें ठरविलें कीं आपण आल्सेस्तेचीच खासगी भेट घ्यावी नि त्याला आपलें मत समजावून सांगावें. तसें तिचें त्याच्यावर अर्धेमुर्धें प्रेमहि होतेंच म्हणा. ती त्याला भेटली. ती म्हणाली: "सेलिमीनेच्या प्रेमांत तुम्ही सांपडलांत हें तुमचं खरोखरीच दुर्दैव म्हटलं पाहिजे. पण तरी हरकत नाहीं. तुम्ही धीर धरा. याहि संकटांतून तुम्हांला बाहेर पडतां येईल. तसे तुम्ही व्यवहारांत फारच सरळ वागणारे आणि बोलण्यांत भारीच स्पष्ट-वक्ते आहांत. तुमचे हे गुण मला फार आवडतात." बोलण्याच्या ओघांत तिला त्याच्याविषयीं भारीच जवळीक वाटूं लागली. तिनें मग सांगितलें: "तुम्ही कांहीं काळजी करूं नका. तुमच्या वतीनं मी कोर्टात रदबदली करीन. तुमच्यासाठीं मी खूपच चांगलं चांगलं करायचं ठरवलंय." परंतु पुष्कळशी चर्चा केल्यानंतर देखील दोघांनीं मिळून शेवटीं निष्कर्ष हाच काढला कीं आल्सेस्तेला सेलिमीनेविषयीं जी प्रेमभावना वाटते ती जवळ जवळ सगळ्याच दृष्टींनीं अनुचित असली तरी ही प्रेमाची गांठ सुरगांठ नसून निरगांठच आहे.

दरम्यान एलियान्ते व फीलिन्ते या उभयतांची गांठ पडली. त्यांनीं आल्सेस्तेच्या स्वभावाची चर्चा केली. आपल्या स्पष्टवक्तेपणापायीं आपल्या मित्रांच्या मनामध्यें स्वतःविषयीं वैरभाव निर्माण करायची त्याला कशी संवयच जडलेली आहे याचा त्यांनीं आपसांत ऊहापोह केला. मग आल्सेस्तेची कोर्टापुढील जबानी व कोर्टात झालेलें या प्रकरणींचें कामकाज याबाबत फीलिन्तेनें तिला माहिती सांगतली. "ओरोन्तेच्या कविता अगदीं टाकाऊ आहेत असं आल्सेस्तेनं कोर्टापुढं अगदीं आग्रहपूर्वक प्रतिपादन केलं. परंतु याच्यापेक्षां अधिक आपल्याला कांहींच सांगायचं नाहीं असं तो म्हणाला." फीलिन्तेचें हें बोलणें चालू असतांना एलियान्ते व फीलिन्ते या उभयतांना असा साक्षात्कार होऊं लागला कीं आपण एकमेकांना आवडूं लागलों आहोंत. जर यदाकदाचित पुढें मागें एलियान्तेच्या मनांतून आल्सेस्तेविषयींची प्रेमभावना नाहींशी झाली तर आपण तिची प्रेमयाचना करणार असा फीलिन्तेनें आपल्या मनाशीं बेत योजून ठेवला.

इकडे आल्सेस्तेला त्याची चांगलीच खरडपट्टी काढणारें एक पत्र आलें. हें पत्र सकृद्दर्शनीं सेलिमीने हिच्याकडूनच आलेलें दिसत होतें. त्यांत तिनें

त्याचें वर्णन द्वेषपूर्ण भाषेंत केलेलें होतें. तें पत्र घेऊन आल्सेस्ते सरळ तिच्याकडे गेला आणि त्यानें तिला त्याबद्दल जाब विचारला. तिनें अगोदर लाजत लाजत बरेच आढेवेढे घेतले आणि मग आपणच तें पत्र त्याला धाडून दिल्याचें कबूल केलें. परंतु अशा पत्राचा त्याला राग कां यावा याविषयीं तिनें आश्चर्य प्रदर्शित केलें. तेवढ्यांत तिला मागणी घालणारे इतरहि भावी वर एकामागून एक तिथें हजर झाले. प्रत्येकाच्या हातांत एकेक पत्र होतें. आणि त्याबद्दल प्रत्येक जण खूपच चिडलेला होता. हीं वेगवेगळीं पत्रें सगळ्यांनीं एकमेकांशीं ताडून बघितलीं तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं तिनें सगळ्यांचीच सरीस रेवडी उडविलेली असून प्रत्येकाचा अगदीं यथेच्छ उपमर्द केलेला आहे.

हा सगळा प्रकार चालू असतांनाच आल्सेस्तेनें आपल्या मनाशीं एक निश्चय पक्का करून टाकला. तो म्हणजे हा कीं एलियान्तेला लग्नाची मागणी घालायची. परंतु मग त्याच्या लक्षांत आलें कीं सेलिमीनेनें आपला जो अपमान केला, त्याचा सूड घेण्याच्या इच्छेपोटींच आपला हा निश्चय निर्माण झालेला आहे असें दिसेल. म्हणून त्यानें आपल्या या निश्चयाचा फेरविचार केला. आतां या मानव-वैऱ्यासमोर एकच मार्ग खुला असलेला दिसला. आपल्यापुढील समस्येची सोडवणूक करण्यासाठीं आपण परागंदा व्हावें आणि वैराग्याचें जीवन जगावें, याखेरीज दुसरें कांहींच त्याला सुचेना.

"तूं आम्हांला असलीं अपमानास्पद पत्रं कां लिहिलीस तें सांगितलं पाहिजेस"—असा सेलिमीनेच्या भावी वरांनीं तिच्यासमोर एकच गिल्ला केला. त्याबरोबर ती त्यांना म्हणाली: "त्याचं असं झालं. शिष्ट संभाषणांतले बारकावे संभाळायचा मला अगदीं कंटाळा आला. म्हणून मी तुम्हां सगळ्यांची खरडपट्टी काढणारीं पत्रं एकेकाला धाडून दिलीं. यांत तुम्ही येवढं मनावर घेण्याजोगं काय आहे? खरोखरी माझ्या मनांत काय आहे हें एकदां तरी खुल्या दिलानं सांगून टाकावं असं मी ठरवलं नि त्याप्रमाणं करून टाकलं." तिचा हा कबुलीजबाब ऐकून तिच्या भावी वरांना चांगलाच धक्का बसला. कारण स्पष्टवक्तेपणा नि उद्धटपणा हे अक्षम्य गुन्हे आहेत असें त्यांचें मत होतें. दांभिकपणा, खुशामत-खोरी, लाळघोटेपणा आणि उडवेगिरी—हेच त्यांच्या मतें सभ्य स्त्रीचे गुणविशेष. त्यांनीं तिच्या या वर्तनाचा कडक शब्दांत निषेध केला आणि "आम्ही पुन्हां

तुझ्या घरांत पाऊलहि घालणार नाहीं" असें तिला बजावून सगळे तिच्याविषयीं तिरस्कार दर्शवीत एकजात तिथून निघून गेले.

एकटा आल्सेस्ते तेवढा मागें राहिला. त्याचा हा धीरोदात्तपणा बघून सेलिमीनेचें नखरेबाज व दुष्ट अंतःकरण देखील द्रवलें. आल्सेस्तेनें तिच्या-विषयींच्या आपल्या एकनिष्ठ प्रेमाची पुन्हां ग्वाही दिली आणि तिला आपल्याशीं लग्न करण्याची पुन्हां एकदां गळ घातली. तिनेंहि त्याला जवळ जवळ होकार दिला. परंतु मग आल्सेस्तेनें आपला पुढील कार्यक्रम तिला उघड करून सांगितला. तो म्हणाला: "लग्न झाल्यावर आपण कुठं तरी दूर दूर जाऊं या, परागंदा होऊं या. तिथं आपण निवांत नि साधंसुधं जीवन जगूं या." हें ऐकल्यावर ती उलटली. तिनें त्याच्याशीं लग्न करायला साफ नकार दिला. तसें म्हटलें जर ज्या खोट्या, क्षुद्र, शिष्ट समाजांत सेलिमीने वावरत होती त्यांत तिचें मन रमलेलें होतें. तो सोडून ती दुसरीकडे कधींच निघून जाणें शक्य नव्हतें.

आतां मात्र आल्सेस्ते संपूर्णपणें मानव-वैरी झाला. तो तिथून पक्का निश्चय करूनच चालता झाला. आतां शिष्ट समाजाला कायमचा राम राम ठोकायचा; बैरागी व्हायचें; फाजील शिष्टाचारयुक्त भाषेच्या कृत्रिम अवडंबरा-पासून दूर, दूर निघून जायचें;—असा त्याचा कार्यक्रम ठरला. फीलिन्ते आणि एलियान्ते या उभयतांचे विचार मात्र त्या मानानें पुष्कळच अधिक नेमस्त होते. त्यांनीं एकमेकांशीं विवाहबद्ध व्हायचें ठरवून टाकलें.

## ऑ थे ल्लो

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* विल्यम शेक्स्पियर (१५६४-१६१६). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* सोळाव्या शतकाचा आरंभ. *स्थळ :* व्हेनिस आणि सायप्रस. *पहिला प्रयोग :* १६०४.

*प्रमुख पात्रें :* **ऑथेल्लो**, व्हेनिस नगरीचा सरसेनापति; जातीनें आफ्रिकन मूर. **डेस्डिमोना**, त्याची पत्नी. **आयागो**, एक खलपुरुष. **कॅसियो**, ऑथेल्लोचा दुय्यम अधिकारी. **एमिलिया**, आयागोची पत्नी.

*समीक्षण :* "द ट्रॅजेडी ऑफ ऑथेल्लो, द मूर ऑफ व्हेनिस" (व्हेनिस नगरीचा सरसेनापति मूर ऑथेल्लो याची शोकान्तिका) या शोकान्तिकेची

गणना शेक्स्पियरच्या चार महान शोकान्तिकांमध्यें होते. वाङ्मयाचे इतिहासकार ज्याला शेक्स्पियरच्या जीवनांतील नैराश्याचा कालखंड असें नांव देतात, त्या कालखंडामध्यें शेक्स्पियरनें या चार शोकान्तिका लिहिल्या. मानवी आत्म्यांतील सुष्ट प्रवृत्ति आणि दुष्ट प्रवृत्ति यांजमधील झगडा कसा चाललेला असतो याचाच प्रामुख्यानें विचार या कालखंडामध्यें महाकवि शेक्स्पियरच्या मनांत चालू असलेला दिसतो. "ऑथेल्लो," "हॅम्लेट," "किंग लियर" आणि "मॅकबेथ" याच त्या चार महान शोकान्तिका. यांच्यापैकीं एकटी "ऑथेल्लो" हीच शोकान्तिका तेवढी अनिष्ट हेतूनें प्रेरित झालेली आहे असें म्हणतां येईल. या नाटकांतला खलपुरुष आयागो हें जगांतील कोणत्याहि वाङ्मयांतील सगळ्यांत जास्त विकृत व नीच मनोवृत्तीचें नि कमालीचें दुष्ट पात्र ठरतें असें म्हणायला बहुधा हरकत नसावी. "ऑथेल्लो" या नाटकांत शेवटीं प्रेमाचाच दुष्टपणावर व द्वेषबुद्धीवर विजय प्रस्थापित होतो; आणि एका स्त्रीला दुसऱ्या स्त्रीविषयीं वाटत असलेला जिव्हाळाच शेवटीं खलपुरुषाला कवीच्या न्यायासनासमोर खेंचून त्याला शिक्षा देण्याला कारणीभूत होतो.

*कथानक :* व्हेनिस नगरीच्या लष्कराचा सरसेनापति आफ्रिकन मूर जातीचा ऑथेल्लो याच्या हाताखालीं काम करणारा एन्साइन (सेकंड लेफ्टेनंट) आयागो याला बढतीच्या वेळीं बाजूला सारून ऑथेल्लोनें दुसराच एक लष्करी अधिकारी कॅसियो याला आपला "चीफ ऑफ स्टाफ" (उपसेनाप्रमुख) नेमून घेतलें. याचा सूड घेण्याचें आयागोनें ठरविलें. तशी संधीहि त्याला लगेच मिळाली. तो आपला अनुयायी रॉडेरिगो याला बरोबर घेऊन रात्रीं व्हेनिस नगरीचा सेनेटर (कायदे मंडळाचा सभासद) ब्रॅबॅन्टियो याच्या घरीं गेला. दोघांनीं ब्रॅबॅन्टियोला हांका मारून झोंपेंतून जागें केलें आणि मग आयागोनें त्याला सांगितलें कीं "अहो सेनेटरसाहेब, तुमची कन्या डेस्डिमोना ही तुम्हांला नकळत घरांतून पळाली आणि तिनें ऑथेल्लोशीं चोरून लग्न केलं." आपल्या कन्येनें एका परजातीय आफ्रिकन मूरबरोबर लग्न करावें याची ब्रॅबॅन्टियोला भयंकर चीड आली आणि तो आपले नोकर चाकर बरोबर घेऊन ऑथेल्लोच्या महालावर चाल करून गेला.

दरम्यान व्हेनिस नगरीच्या ड्यूकला असें कळलें कीं तुर्कांचीं लढाऊ

जहाजें सायप्रस बेटावर हल्ला करायची तयारी करीत आहेत. अशा या आणी-बाणीच्या प्रसंगीं त्यानें ऑथेल्लोला सेनेटच्या सभागृहांत हजर राहण्यासाठीं बोलावणें धाडलें. ऑथेल्लो तिकडे जायला निघाला आणि रस्त्यांतच ब्रॅबॅन्टियोशीं त्याची गांठ पडली. परंतु राष्ट्रहित नजरेसमोर ठेवून उभयतांनीं या वेळीं कसलीहि हाणामारी करायची लांबणीवर टाकली. ऑथेल्लो सेनेटच्या सभागृहांत दाखल झाला. त्याला ड्यूकनें व्हेनिसच्या फौजांचें नेतृत्व करण्याचा व सायप्रस बेटाचें रक्षण करण्याचा आदेश दिला. हें सगळें झाल्यावर मग ब्रॅबॅन्टियोनें जें काय सांगायचें तें ड्यूकला सांगितलें.

तो म्हणाला : " ड्यूकसाहेब! ऑथेल्लोनं माझ्या मुलीला फूस लावून माझ्या घरांतून पळवून नेलं आणि माझ्या संमतीशिवाय तिच्याशीं लग्न केलं. हा माझ्यावर अन्याय झालेला आहे. याचं परिमार्जन आपण करावं." यावर ऑथेल्लोनें आपल्या इभ्रतीचें नि इज्जतीचें ड्यूकसमोर जोरदार समर्थन केलें. ही चर्चा चालू असतांना खुद्द डेस्डिमोनाच तेथें आली आणि तिनें ऑथेल्लोचेंच म्हणणें बरोबर असल्याचा निर्वाळा दिला. अशा प्रकारें सगळ्या संशयाचें निराकरण झाल्यानंतर ऑथेल्लोनें ताबडतोब सायप्रस बेटाच्या दिशेनें जहाजें हांकारण्याची तयारी केली. सायप्रसच्या या मोहिमेच्या मुदतीपुरतें त्यानें डेस्डिमोनाला आयागोच्या स्वाधीन केलें आणि आयागोची पत्नी एमिलिया हिनें तिची सर्व प्रकारें सेवा करावी असा आदेश देऊन ठेवला.

इकडे भूमध्य समुद्रांत एक प्रचंड वादळ झालें. त्यामुळें तुर्कांच्या आरमाराची संपूर्ण वाताहत झाली. व्हेनिसची जहाजेंहि जिकडे तिकडे अस्ताव्यस्त विखुरलीं गेलीं. मग ऑथेल्लोच्या नेतृत्वाखालील हीं सगळीं जहाजें एकामागून एक अशीं सुरक्षित रीतीनें सायप्रस बंदरांत येऊन दाखल झालीं. नंतर ऑथेल्लो आणि डेस्डिमोना यांचें तिथेंच पुनर्मीलन झालें. आयागोच्या मनांतील सूडाचा निर्धार अजून तसाच कायम होता. त्यानें रॉडेरिगोला थाप सांगून दिली कीं " डेस्डिमोनाचं कॅसियोवर प्रेम आहे." खरें म्हटलें म्हणजे खुद्द रॉडेरिगोचेंच डेस्डिमोनावर प्रेम होतें. याचा फायदा घेऊन आयागोनें त्याला कॅसियोविरुद्ध चांगलेंच चिथावलें. वास्तविक रॉडेरिगो आणि कॅसियो यांची धड ओळखहि नव्हती. अशा परिस्थितींत आयागो त्याला म्हणाला : " हें बघ, रॉडेरिगो, मी तुझ्या सगळ्या मनकामना पूर्ण करायचं तुला वचन

देतों. तूं फक्त येवढंच करायचंस. कॅसियो, ज्या वेळीं चौक्या-पाहरे-तपासणी-अधिकारी म्हणून कामावर असेल त्या वेळीं तूं त्याच्याशीं कांहीं तरी वैयक्तिक कुरापत काढ आणि तींत त्याला गुंतवून ठेव. "

त्या रात्रीं शत्रूच्या निःपाताबद्दल आनंद प्रदर्शित करण्यासाठीं विजयोत्सव साजरा करण्याचा आदेश ऑथेल्लोनें दिला. परंतु त्याचबरोबर त्यानें कॅसियोला असा इशारा देऊन ठेवला कीं "तूं या शहरांतील व्हेनिसहून आलेल्या सैनिकांवर काळजीपूर्वक लक्ष ठेव." आयागोनें त्या रात्रीं गप्पा मारण्याच्या मिषानें कॅसियोला चिकार दारू प्यायला लावली. त्यामुळें प्रकार असा झाला कीं मागाहून रॉडेरिगोनें त्याची जराशी खोडी काढतांक्षणीं कॅसियोचा स्वतःवरचा ताबा सुटला आणि दोघे हमरीतुमरीवर आले. रस्तोरस्तीं दंग्याधोप्याच्या व बंडाव्याच्या अफवा पसरल्या. हा ओरडा आरडा ऐकून ऑथेल्लो जागा झाला आणि त्यानें चौकशी केली. दंगल सुरू होऊं दिल्याबद्दल त्यानें कॅसियोवर ठपका ठेवला आणि त्याची बढती रद्द करून त्याला खालच्या जागेवर आणून ठेवलें. कॅसियोची इभ्रत अशा रीतीनें जवळ जवळ धुळीला मिळाली. अशा परिस्थितींत आयागो त्याला विश्वासांत घेऊन म्हणाला : "तूं कांहीं काळजी करूं नकोस. मी तुझी व डेस्डिमोनाची गांठ घालून देतों. तिची मर्जी तूं संपादन कर. म्हणजे तिच्या मार्फत वशिला लावून तुला आपला गेलेला वरिष्ठ अधिकार परत मिळवितां येईल." कॅसियोला आयागोची ही योजना एकदम पसंत पडली.

मग आपली व डेस्डिमोनाची केव्हां एकदां भेट होते म्हणून कॅसियो अगदीं उतावीळ झाला. त्यानें याबाबत आयागोच्या मागें एकसारखें टुमणेंच लावलें. मग त्या दोघांची भेट झाली. कॅसियो व डेस्डिमोना हीं दोघें बोलत असतांना आयागोनें ऑथेल्लोला दुरून तें दृश्य दाखविलें आणि तो आपल्या सेनापतीला उद्देशून कांहीं तरी मोघम व व्यंगपूर्ण असें बोलला. मागाहून आयागो वेळोवेळीं ऑथेल्लोला असे प्रश्न विचारी, आणि ते अशा प्रकारें विचारी कीं त्यांच्यामुळें डेस्डिमोनाचें ऑथेल्लोशीं लग्न होण्यापूर्वीच्या काळांत डेस्डिमोना व कॅसियो यांची कांहीं तरी घसट असावी अशी ऑथेल्लोची समजूत होत गेली. असूयेच्या बीजांची पेरणी अशा प्रकारें एकदां होऊन गेल्यावर मग ऑथेल्लोला आपल्या पत्नीच्या प्रामाणिकपणाविषयीं संशय येऊं लागला.

एकदां ऑथेल्लो आपलें डोकें दुखत आहे असें डेस्डिमोनाला म्हणाला : "तुमच्या डोक्याला मी हातरुमाल बांधत्यें, म्हणजे तें दुखायचं राहील" असें ती त्याला म्हणाली. ऑथेल्लोनें तिला पहिली भेटीची वस्तु म्हणून एक हात-रुमाल दिलेला होता. हाच हातरुमाल त्याच्या डोक्याला बांधायचा तिनें विचार केला. तिच्या हातून गाफिलपणाच्या भरांत हा हातरुमाल जमिनीवर पडला आणि एमिलियानें तो उचलून घेतला. आयागोनें यांतून आपली योजना पार पाडण्याची संधि साधतां येईल असा अंदाज बांधून तो हातरुमाल एमिलियाकडून मागून घेतला आणि मागाहून तो कॅसियोच्या खोलींत लपवून ठेवला.

पुढें ऑथेल्लो व आयागो यांचें डेस्डिमोनाविषयीं असेंच एकदां बोलणें निघालें असतां ऑथेल्लो म्हणाला : "डेस्डिमोना माझ्याशीं खरेपणानं वागत नाहीं असं तूं सुचवतोस. पण याचा कांहीं पुरावा तुझ्याजवळ आहे का ? तुला जर कसलाच पुरावा आणतां आला नाहीं तर तिच्याविषयीं खोटा संशय घेतल्या-बद्दल मी तुला जिवानिशीं मारीन." ही धमकी ऐकल्यावर आयागो म्हणाला : "एकदां मी कॅसियोच्या खोलींत झोंपलों होतों. त्या वेळीं कॅसियो झोंपेंत डेस्डिमोनाविषयीं कांहीं तरी गोड गोड बोलत असल्याचं मला ऐकायला मिळालं. त्यानंतर आणखी एक घडलेली गोष्ट मी आपल्यांला सांगतों. आपण डेस्डिमोनाला एक हातरुमाल भेटीची वस्तु म्हणून दिला होता हें आपल्याला आठवत असेलच. याच हातरुमालानं कॅसियो आपली दाढी पुसत होता हें मी स्वतः आजच पाहिलं." हें ऐकून मात्र ऑथेल्लो संतापाच्या सर्वस्वीं आहारीं गेला आणि त्यानें सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. त्यानें आयागोला बढती देऊन आपला नवा दुय्यम सेनाप्रमुख म्हणून नेमून घेतलें.

ऑथेल्लोनें आपला भेट म्हणून दिलेला हातरुमाल हरवला कसा याबाबत डेस्डिमोनाला खुलासा विचारला. पण तो हातरुमाल कसा नाहींसा झाला याचा तिला उलगडा करतां आला नाहीं. ऑथेल्लोचें तुटक बोलणें आणि त्याची चिंताग्रस्त मुद्रा व अस्वस्थ मनःस्थिति, हे प्रकार बघून डेस्डिमोनाला काय करावें हेंच सुचेना.

ऑथेल्लोवर आपल्या दगाबाजीचे प्रयोग आयागोनें चालू ठेवले. त्यांचा परिणाम असा झाला कीं ऑथेल्लोला अपस्माराच्या झटक्यांसारखे झटके येऊं

लागले. त्यांच्या भरांत तो कोणत्या वेळीं काय करील याचा नेम नाहींसा झाला. व्हेनिसहून एक राजदूत आलेला होता, त्याच्यासमोर ऑथेल्लोनें डेस्डिमोनाच्या श्रीमुखांत भडकावली. हा प्रकार बघून सगळे हजर असलेले लोक थक्क झाले. फक्त आयागोला तेवढें या प्रकाराचें बिलकुल नवल वाटलें नाहीं. एमिलियानें आपल्या मालकिणीची बाजू घेतली व तिच्या प्रामाणिकपणाबद्दल ऑथेल्लोची खातरजमा करण्याचा प्रयत्न चालविला, परंतु ऑथेल्लो इतका पिसाट झालेला होता कीं डेस्डिमोनाविषयीं कुणी कांहीं चांगलें सांगितलें तर त्यावर त्याचा विश्वासच बसेनासा झाला. आणि त्यानें कटु वचनांनीं तिचा अधिक्षेप करण्याचा व तिचा अपमान करण्याचा सपाटा चालविला.

एके रात्रीं ऑथेल्लोनें डेस्डिमोनाला फर्मावलें : "तुझ्या सोबतीला आलेल्या दासीला निघून जायला सांग आणि आतांच्या आतां झोंपायला जा." त्याच रात्रीं कॅसियोला वाटेंत गांठून मारायचा डाव आयागोनें रचला आणि ही कामगिरी पार पाडायसाठीं त्यानें रॉडेरिगोचें मन वळविलें. पण या मारामारींत रॉडेरिगोच जखमी झाला. त्याबरोबर जवळच उभा असलेल्या आयागोनें पुढें सरसावून कॅसियोवर सुऱ्याचा वार केला. नंतर झालेल्या झटापटींत आयागोनें रॉडेरिगोलाहि सुरा भोंसकून ठार केलें आणि अशा रीतीनें आपल्या हस्तकाचा कांटा काढून टाकून तो आपल्या विरुद्ध कधींच उलटणार नाहीं असा पक्का बंदोबस्त करून टाकला. तेवढ्यांत त्या हाणामारीच्या ठिकाणीं कॅसियोची एक वेश्या मैत्रीण येऊन हजर झाली. तिथें जमा झालेल्या लोकांना तिनें आपलें कॅसियोशीं काय नातें आहे तें उघड करून सांगितलें.

कॅसियो अजून मेलेला नव्हता. म्हणून त्याची गेलेली इज्जत त्याला परत मिळण्याची त्याची सगळी आशा नष्ट करण्यासाठीं या बाईचा उपयोग करावा असा आयागोनें डाव टाकला. वरकरणीं मैत्रीचें सोंग आणून त्यानें जखमी कॅसियोला मदत केली नि त्याला ऑथेल्लोच्या महालांत परत पोंचविलें. हाणामारीनंतर तिथें आलेले व्हेनिसचे कांहीं सरदारहि त्याच्याबरोबर ऑथेल्लोच्या महालांत गेले.

दरम्यान ऑथेल्लो आपल्या पत्नीच्या शयनमंदिरांत गेला आणि त्यानें तिला पांघरुणांत घुसमटून तिचा जीव घेतला. तत्पूर्वीं त्यानें तिला चुकीच्या माहितीच्या आधारें सांगितलें कीं "कॅसियोनें तुझ्याविषयींच्या प्रेमाचा कबुली-

जबाब दिला आणि मग त्याला ठार करण्यांत आलं." तितक्यांत एमिलिया आपल्या मालकिणीच्या शयनमंदिरांत आली. तिनें अशी बातमी सांगितली कीं "जो ठार झाला तो रॉडेरिगो. कॅसियो जिवंत आहे."

ही बातमी ऐकून ऑथेल्लो सर्दच झाला. आपण आपल्या पत्नीचा खून केल्याबद्दल त्याचें मन त्याला खाऊं लागलें. तो एमिलियाला म्हणाला : "डेस्डिमोना माझ्याशीं इमानानं वागत नाहीं, तिचा कॅसियोशीं चोरटा प्रेमसंबंध होता, हें मला आयागोकडून कळलं." यावर एमिलिया उत्तरली : "माझ्या यजमानांनीं असले आरोप बाईसाहेबांवर केले असतील या गोष्टीवर माझा विश्वासच बसूं शकत नाहीं."

त्यांचें येवढें बोलणें होतें आहे तोंच आयागो आणि व्हेनिसचे सरदार ऑथेल्लोच्या महालांत येऊन पोंचले. त्याबरोबर एमिलियानें आयागोला सांगितलें कीं "सेनापति साहेबांचं म्हणणं तुम्ही एकदांचं खोडून काढा." मग मात्र आयागोचा भयंकर नीचपणा उघडकीस आला. आपला हातरुमाल कॅसियोच्या ताब्यांत कसा गेला हें ऑथेल्लोला आतां कळलें. आपल्या पतीच्या नीचपणाचा आणखी पुरावा एमिलिया देऊं लागली तेव्हां आयागोनें तिच्यावर सुरी-हल्ला केला. लगेच ऑथेल्लोनें झेंप घेऊन आयागोला जखमी केलें पण तेवढ्यांत व्हेनिसच्या सरदारांनीं ऑथेल्लोला आंवरलें. डेस्डिमोना सर्वस्वीं निरपराध व निर्दोषी आहे असा निर्वाळा देत एमिलियानें प्राण सोडला. तेव्हां दुःखाच्या आवेगानें वेडापिसा होऊन ऑथेल्लोनें स्वतःच्या छातींत खंजीर खुपसून घेऊन तिथल्या तिथें प्राण दिला. मग व्हेनिसच्या राजदूतानें असें अभिवचन दिलें कीं "सायप्रसच्या गव्हर्नर-जनरलकडून आयागोला हाल हाल करून ठार मारवूं."

## पीयर ग्यिन्ट

*वाङ्मयप्रकार* : नाटक. *लेखक* : हेन्रिक इब्सेन (१८२८-१९०६). *कथानकाचा प्रकार* : उपरोधिक कल्पनाविलास. *काळ* : एकोणिसाव्या शतकाचा मध्य काळ. *स्थळ* : नॉर्वे. *पहिला प्रयोग* : १८६७.

*प्रमुख पात्रें* : **पीयर ग्यिन्ट,** शेतावर काम करणारा एक नॉर्वेजियन

मुलगा. आसे, त्याची आई. **सॉल्वीग**, एक नॉर्वेजियन बालिका; हिचें ग्यिन्ट-वरील प्रेम अढळ राहतें. **द ग्रेट बॉइग**, एक अद्भुत राक्षस. **द बटन-मोल्डर**, हा पीयरला आपल्या पळ्यांत कढवून काढायची धमकी देतो.

*समीक्षण :* ताठ शरीर आणि वांकलेला आत्मा, असला अंतर्विरोध स्वतःमध्यें सामावणारा प्राणी जो मानव, त्याचा उपहास करणारें "पीयर ग्यिन्ट" हें नाटक. व्यक्तिस्वातंत्र्यवाद या विषयाचें प्रतीकात्मक विवरण इब्सेन कसें करतो याचें हें नाटक म्हणजे एक उदाहरण. हें नाटक म्हणजे प्रदीर्घ, एकीमागून एक, अशा चित्रविचित्र घटना सादर करणारा कल्पनाविलास असून एक सुंदर, अक्कडबाज, बढाईखोर, परंतु प्रेक्षकांना हवाहवासा वाटणारा नायक या नाटकाला लाभलेला आहे. या नाटकाची रचना करतांना इब्सेननें लोककथा आणि उपहास यांची एकत्र गुंफण करून त्यांत प्रतीकांचें मिश्रण केलें आणि यामुळें नाटकाचा परिणाम भावनात्मक प्रभावाच्या दृष्टीनें खूपच सखोल होतो. तथापि चाकोरीबाहेरची व रंगमंचाशीं अगदींच विसंगत अशी याची मांडणी असल्यामुळें याचा रंगभूमीवर प्रयोग करणें म्हणजे महा कठीण कर्म. नाटकाचा विषय म्हणाल तर मानवी आत्म्याचा अधःपात हा आहे. तरी सुद्धां त्याच्या शेवटीं निनादणारी विजयी ललकारी, म्हणजेच प्रेमाचें पुनरुद्धारक सामर्थ्य, याच्या योगानें नाट्यात्मक परिणामाच्या दृष्टीनें तें शोकान्त व्हायला अटकाव होतो.

*कथानक :* पीयर ग्यिन्ट हा एक तरुण नॉर्वेजियन शेतकरी. आळशीपणा व बाष्कळ बडबड हा त्याचा खास खाक्या. तंटेबखेडे माजविणें आणि स्वप्नरंजन करणें यांतच तो आपले तासन् तास फुकट घालवायचा. असा तो वेळ व्यर्थ दवडायला राजी कां असावा, म्हणून त्याची आई आसे त्याची कानउघाडणी करी. यावर तो उत्तर देई : "आई, तुझं म्हणणं शंभर टक्के बरोबर आहे." मग ती त्याची आणखी फटफजिती उडवून त्याला ताळ्यावर आणतां येतें का बघावें म्हणून त्याला खोंचून सांगे: "अरे, तूं जर प्रामाणिकपणानं काम करणारा शेतकरी असतास, तर हेग्स्टाडच्या मुलीनें तुझा स्वीकार केला असता आणि आज घटकेला तूं एक सुखी नवरदेव म्हणून मिरवला असतास."

तेव्हां पीयरनें आपल्या मनांतला बेत तिला उघड निवेदन केला. तो म्हणाला: "माझा बेत काय आहे तो ऐकून घे. हेग्स्टाडच्या मुलीचं आज रात्रींच लग्न व्हायचं असं ठरलंय. मी तिथं जाणार आणि तें लग्न मोडून टाकणार."

हें ऐकून त्याची आई त्याच्यावर खूप रागावली. तिनें त्याला असें न करण्याबद्दल बजावलें. पण तो कसचा ऐकतो! त्यानें आईला उचलून घेतली आणि थेट आपल्या घराच्या छपरावर नेऊन ठेवली. तिथून ती "अरे कुणी तरी मला खालीं उतरवा रे!" असा मोठमोठ्यानें ओरडा आरडा करूं लागली. परंतु तिच्या या आरोळ्यांकडे मुळींच लक्ष न देतां त्यानें सरळ हेग्स्टाडच्या घराची वाट धरली.

लग्नसमारंभाच्या वेळीं हजर असलेल्या सगळ्या मंडळींनीं त्याच्याविषयीं तीव्र तिरस्कार दर्शविला. याला अपवाद होती फक्त एकटी सॉल्वीग. ही तरुणी त्याच्या ओळखीचीहि नव्हती. परंतु तिला त्याच्या हीन चारित्र्याची हकीकत ऐकायला मिळतांक्षणीं ती देखील त्याची संगत टाळायला लागली. मांडवामध्यें पीयर दारू पिऊन बेहोष झाला आणि लागला सांगायला एकेक अचाट साहसाच्या अद्भुतरम्य गोष्टी. या त्याच्या कथाकथनानें मात्र एक मोठी कामगिरी बजाविली. लग्नसमारंभांत आयत्या वेळीं एक विचित्र विघ्न आल्यामुळें खंड पडला. हा खंड त्याच्या या गोष्टीवेल्हाळपणापायीं कुणाच्या लक्षांतच आला नाहीं.

या विचित्र विघ्नाचें स्वरूप असें होतें: लग्नसमारंभ सुरू व्हायच्या अगोदर वधूनें स्वतःला कोठीच्या खोलींत कोंडून घेतलें आणि बाहेर येण्याचें साफ नाकारलें. तिला बाहेर कसें यायला लावावें हें कोणालाच कळेना. शेवटीं नवरदेवानें हैराण होऊन पीयरची या कामीं मदत मागितली. पीयर वधूची समजूत घालायला कोठीच्या खोलीकडे रवाना झाला. तेवढ्यांत पीयरची आई कुणाच्या तरी मदतीनें छपरावरून खालीं येऊन लग्नमंडपांत दाखल झाली. अकस्मात नवरदेवानें बोंब ठोकली आणि टेंकडीच्या उताराकडे बोट दाखविलें. सगळी वऱ्हाडी मंडळीं दरवाजाकडे धांवत गेली. बघतात तों पीयर वधूला खांद्यावर घेऊन डोंगराची चढण वेगानें चढत असलेला त्यांना दिसला.

पीयरनें वधूला चटकन वाटेंत टाकून दिलें आणि तो ओसाड जंगलांत खूप आंत घुसून पसार झाला. हेग्स्टाड आणि त्याचे शेजारी त्याचा पाठलाग करीत जंगलांत शिरले, परंतु त्यांना झुकांड्या देऊन पीयर जो सटकला तो पर्वताच्या देवदूत-राजाकडे गेला. त्या राजाच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें आणि मागाहून तिलाहि टाकून दिलें. मग त्याला बडा राक्षस बॉइग भेटला. या राक्षसाचें स्वरूप अस्तित्वाच्या उखाण्याचें प्रतिनिधित्व करणारें होतें. तो बेडौल, उग्र आणि अजिंक्य असा महाराक्षस होता. पीयर पुन्हां पुन्हां पर्वताच्या

वरच्या भागांत शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न करीत होता आणि प्रत्येक वेळीं हा महाराक्षस बॉइग त्याच्या मार्गांत आडवा येत होता. पीयरनें या बॉइगला लढाईचें आव्हान दिलें, तेव्हां हा विद्रूप प्राणी उत्तरला: "मी सगळ्यांना जिंकत असलों तरी मी कुणाशींहि लढत नाहीं."

शेवटीं पीयर थकून भागून जमिनीवर आडवा झाला. आकाश हिंस्र पक्ष्यांच्या गर्दीनें झांकाळून आलें. ते सगळे पक्षी पीयरवर झडप घालायच्या अगदीं बेतांत होते. अकस्मात दूर अंतरावरून देवळांतील घंटांचा व स्त्रियांच्या बोलण्याचा असे आवाज त्याला ऐकूं येऊं लागले. त्याबरोबर बॉइगनें माघार घेतली आणि आपला पराभव झाल्याचें कबूल केलें. कारण पीयरला त्याच्या लढ्यांत स्त्रियांचा पाठिंबा होता.

हेग्स्टाडची मुलगी पळवून नेल्यामुळें पीयर तडीपार गुंड ठरला. तो जंगलांतच झोंपडी बांधून राहिला. तिथें सॉल्वीग त्याच्या सोबतीला येऊन राहिली. परंतु त्यांचें हें सहवाससुख फार काळ टिकलें नाहीं. कारण देवदूत-राजाची पीयरनें टाकून दिलेली कन्या एके दिवशीं त्याला भेटायला आली. ती आपल्या बरोबर एका विद्रूप राक्षसाला घेऊन आलेली होती. हा राक्षस म्हणजे तिच्या पोटीं जन्मलेला त्याचाच मुलगा. या दोघांना हांकून लावणें त्याला अशक्य झालें. तेव्हां तो स्वतःच दूरदेशीं निघून गेला. जातां जातां त्यानें सॉल्वीगला सांगितलें: "माझ्यासाठीं कांहीं काळ तुला वाट बघत राहणं भाग आहे."

स्वदेश सोडण्यापूर्वी त्यानें आपल्या मृत्युपंथाला लागलेल्या आईचा निरोप घेण्यासाठीं तिची शेवटची भेट घेतली. आईच्या गळ्याला मिठी मारून पीयरनें अंगाईगीतें म्हटलीं आणि तिला चिरनिद्रेच्या आधीन करून सोडलें. तिच्या मृत देहाला साक्ष ठेवून त्यानें आईच्या अनंत उपकारांचें स्मरण केलें. तिनें इतके सारे दिवस आपल्यासाठीं खाल्लेल्या खस्ता, तिनें आपल्याला बाळपणीं नीज आणण्यासाठीं म्हटलेलीं सगळीं अंगाईगीतें, तिनें आपल्याला नीट मार्गावर आणण्यासाठीं केलेली सगळी मारहाण— या सगळ्या गोष्टींचें त्यानें कृतज्ञभावनेनें स्मरण केलें.

मग तो साऱ्या जगभर साहसें करीत हिंडत राहिला. तो अमेरिकेला गेला आणि तिथें त्यानें गुलामांचा व्यापार केला. तो चीनमध्यें गेला आणि तिथें त्यानें बुद्धाच्या पवित्र मूर्तींचा व्यापार केला. बायबलाच्या प्रती व 'रम' जातीचें

मद्य यांच्या व्यापारांत त्याला गडगंज नफा झाला. त्याच्या सगळ्या ऐहिक मालमत्तेचें अपहरण दरवडेखोरांनीं केल्यावर तो आफ्रिकेच्या ओसाड वाळवंटांत गेला आणि तिथें तो परमेश्वराचा प्रेषित झाला. पुन्हां त्याला श्रीमंती आली आणि तो पौर्वात्य धर्तीचें ऐषआरामी जीवन जगूं लागला.

एके दिवशीं अनित्रा नामक एका नर्तिकेला बरोबर घेऊन तो घोड्यावरून ओसाड वाळवंटांत गेला. एका ठिकाणीं विश्रांति घेण्यासाठीं त्यानें मुक्काम केला. आपण अजूनहि मनानें व शरीरानें तरुण आहोंत हें अनित्रासमोर सिद्ध करून दाखवून आपली प्रौढी मिरविण्याचा मोह त्याला निवारतां येईना. या प्रयोगांत तो गढून गेलेला असतांना तिनें त्याची पैशाची थैली पळविली व त्याच्या घोड्यावर स्वार होऊन ती पसार झाली.

पीयर ग्यिन्ट आतां परत येईल, मग परत येईल, म्हणून वाट बघतां बघतां बिचारी सॉल्वीग मध्यम-वयस्का झाली. याच्या उलट, तिकडे दूर देशांत पीयर ग्यिन्ट आपल्या योजनाविहीन जीवनानिशीं झगडतच राहिलेला होता. मनांत कसलाहि दृश्य हेतु न ठेवतां तो जीवनाच्या सर्वभक्षक बॉइग राक्षसाभोंवतालीं एकसारखा प्रवाहपतिताप्रमाणें चकरा घालीतच होता.

शेवटीं एकदांचा तो नॉर्वे देशाला परत यायला निघाला. वाटेंत त्याचें जहाज फुटलें. जीव वांचविण्यासाठीं पीयर एका डोलकाठीला लटकून तरंगत राहिला. या डोलकाठीचा आधार फक्त एकाच माणसाला पुरेसा होता. तेवढ्यांत जहाजावरचा स्वयंपाकी त्याच डोलकाठीला लटकायचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां पीयरनें त्याला ढकलून दूर समुद्रांत लोटून दिलें. त्यानें स्वतःचा जीव तर वांचविला. परंतु आपल्या हेतुशून्य जीवनापासून स्वतःला वांचविण्यांत आपण यशस्वी झालों का नाहीं याबद्दल त्याला शंकाच होती.

तथापि नॉर्वे देशाला परत आल्यानंतर मात्र त्यानें असें ठरवून टाकलें कीं अतःपर- भटकंती बंद. यापुढें सेवानिवृत्त वृद्ध माणसाचें स्थिर जीवन जगायला तो खुषीनें तयार झाला. एके दिवशीं ओसाड रानांत त्याला एक बटन-मोल्डर भेटला. वयोवृद्ध पीयरचें शांत व समाधानी जीवन जगण्याचें स्वप्न खरें होऊं द्यायला या बटन-मोल्डरनें साफ नकार दिला. बटन-मोल्डर त्याला म्हणाला: "मी तुला माझा पळ्यांत घालून तुला कढवून टाकणार आहें. त्या बरोबर पीयर घाबरून गर्भगळित झाला. आपण ध्येयशून्य व स्वयंकेन्द्रित

जीवन जगलों असलों म्हणून काय झालें? परंतु अशा प्रकारें आपला आत्मा, आपलें व्यक्तित्व गमावून आपल्या आयुष्याचा शेवट होईल अशी त्याला काडीइतकीहि कल्पना नव्हती. तो त्या बटन-मोल्डरच्या हातांपायां पडला व आपल्याला कढवून टाकायचा विचार सोडून देण्याची विनंति त्यानें त्याला केली.

पीयर आर्त स्वरांत ओरडून म्हणाला: "अरे, फार झालं तर मी माझ्या आयुष्याचा खेळखंडोबा केला असं म्हणतां येईल. परंतु मी असामान्य पापीपणाचं कृत्य तर कधींच केलं नाहीं." यावर बटन-मोल्डर उत्तरला: "अरे पीयर! तूं नरकांत जाण्याइतका पुरेसा वाईटहि नाहींस, आणि स्वर्गांत जाण्या-इतका पुरेसा चांगलाहि नाहींस. म्हणून तूं माझ्या पळ्यांत टाकून कढवायला तेवढा योग्य आहेस." त्याच्या या विधानाचा पीयरनें निषेध केला. परंतु बटन-मोल्डर आपला हेका कांहीं केल्या सोडीना. पण त्यानें पीयरला एक पळवाट सुचविली. तो म्हणाला: "अरे पीयर! आपण स्वतः नरकांत जायला योग्य असा पापी इसम आहोंत हें जर तुला सिद्ध करतां आलं नाहीं, तर मात्र मी तुला माझ्या शून्याकारी पळ्यांत कढवून टाकीन हें तूं पक्कं समजून चाल."

पीयरनें विचार केला कीं अजिबात शून्याकार होण्यापेक्षां नरकांत जाणें ही किती तरी अधिक सौम्य अशी शिक्षा आहे. त्यानें निकरावर येऊन आपल्या पापांचें रसभरित वर्णन केलें. तो म्हणाला: "मी माणसांना गुलाम म्हणून विकण्याचा व्यापार केलेला आहे. मी लोकांना थापा मारून सपशेल फसवलं आहे. मी माझा जीव वांचवायसाठीं दुसऱ्या माणसाचा जीव घेतला आहे." यावर बटन-मोल्डर उपरोधिकपणें आपलाच हेका चालवीत म्हणाला: "अरे मूर्खा! असले अन्याय म्हणजे अगदींच क्षुल्लक आहेत. येवढ्यांच्या जोरावर तुला नरकांत जायला कसचं मिळणार?"

दोघे अशी वादावादी करीत करीत एका घरापाशीं आले. तिथें सॉल्वीग देवळांत जायच्या तयारीनिशीं दारांत उभी होती. प्रार्थनागीतांचें एक पुस्तक तिनें कांखोटींत मारलेलें होतें. पीयरनें तिच्या पायांवर सपशेल लोटांगण घातलें आणि विनविलें: "कसंहि कर आणि माझ्या पापांचा नि दुष्कृत्यांचा डांगोरा पीट." पण ती उत्तरली: "अरे! तूं आतां पुन्हां माझ्याकडे आला आहेस ना! त्यांत सगळं कांहीं आलं." पीयर म्हणाला: "तें कांहीं नाहीं. मी माझ्या गुन्ह्याचा डांगोरा निदान तुझ्यासमोर तरी पिटतों. तेवढी तरी परवानगी मला दे."

हें ऐकून तिला हादराच बसला. ती म्हणाली: "अरे पीयर! तूंच तर माझं जीवन फुलवलंस नि सुंदर करून सोडलंस." तिचे हे उद्गार ऐकून तो बटन-मोल्डर पसार झाला. मात्र जातां जातां असें भविष्य वर्तवून गेला कीं आपली व पीयरची पुन्हां भेट ही होणारच.

सॉल्वीगच्या कुशींत पीयरनें आपलें तोंड लपविलें. तिच्या बाहुपाशांत त्याला सुरक्षितता व स्थैर्य लाभलें. तिच्या हृदयाची ऊब त्याला मिळाली. खुद्द सॉल्वीगचा चेहराहि उन्हांत न्हाऊन निघाला.

## मे डे या

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* युरिपिडीज (इ.स. पूर्वी ४८०-४०६). *कथानकाचा प्रकार :* अभिजात शोकान्तिका. *काळ :* अतिप्राचीन काळ. *स्थळ :* कॉरिन्थ. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४३१.

*प्रमुख पात्रें :* **मेडेया**, एक जादुगारीण. **जेसन**, तिचा प्रियकर. **क्रेऑन**, कॉरिन्थचा राजा. **ग्लाउसे**, क्रेऑनची कन्या. **आयेगेयुस**, अथेन्सचा राजा.

*समीक्षण :* ग्रीक शोकान्त नाटकांपैकीं सगळ्यांत जास्त प्रख्यात नाटकांमध्यें "मेडेया" या नाटकाची गणना होते. आणि हें योग्यच आहे. कारण हें नाटक लिहून दोन हजारांहून अधिक वर्षें लोटलीं असलीं तरी आजच्या काळांतहि त्याचा अर्थपूर्णपणा व त्याचें वैशिष्ट्य पटतें. जेसन आणि मेडेया या दोन्ही विशुद्ध मानवी मूर्ति असून अतिमानुष साधनांच्या मध्यस्थीशिवाय देखील त्यांच्या स्वभावांतच शोकान्तिका अंगभूत असल्याचा प्रत्यय येतो. त्यांची ही कथा म्हणजे भावनावेगाच्या अतिरेकाविरुद्ध दिलेला कायमचा इशारा आणि कटु सूडबुद्धीविरुद्ध दिलेली कडक ताकीद आहे.

*कथानक :* आपल्या संसारसुखाचा विध्वंस झाल्याचें मेडेयाला कळून चुकलें. तिच्या जेसननें तिला टाकून दिलें आणि क्रेऑनची कन्या ग्लाउसे हिच्याशीं लग्न केलें. तिचा संताप शिगेला पोंचला. तिनें या प्रकाराचा भयंकर सूड घेण्याची प्रतिज्ञा केली. तिच्या सेविकेचें तिच्यावर फार प्रेम होतें. परंतु मेडेयाच्या या सूड घेण्याच्या कार्यक्रमापायीं कॉरिन्थ शहरावर भयंकर धोका कोसळणार ही गोष्ट या सेविकेच्या ध्यानांत येऊन चुकली. कारण कसला तरी

राक्षसी बदला घेतल्याखेरीज या अपमानाची भरपाई झाल्याचें समाधान मेडेयाला लाभणार नाहीं हें ती जाणून होती. त्यांतल्या त्यांत मेडेयाच्या दोन मुलग्यांच्या बाबतींत या सेविकेला भारी धास्ती वाटूं लागली. कारण या पुत्रांच्या पित्याविषयीं मेडेयाच्या मनांत ज्या द्वेषभावनेचें थैमान चाललेलें होतें तींत या जादुगारिणीनें स्वतःच्या मुलांनाहि सामील करून घेतलेले होतें.

तिच्या या प्रतिज्ञेची बातमी राजा क्रेऑन याच्या कानावर गेली. त्याबरोबर त्यानें तिला व तिच्या मुलांना कॉरिन्थमधून हद्दपार करण्याचा हुकूम फर्मावला. मग तिचा संताप आणखीच भडकला. परंतु तशी ती महा बिलंदर होती. तिनें सूडाचा बेत मनांत योजून तयार ठेवलेलाच होता. आणि तिनें राजाला विनंति केली: "मला माझ्या व माझ्या मुलांच्या प्रवासाची तयारी करायला अवसर पाहिजे. मला कृपा करून अवघ्या एक दिवसाची मुदत द्या. तेवढी दिलीत तर मुलांना घेऊन मी इथून माझं तोंड काळं करीन." राजानें तिची ही विनंति मान्य केली.

सूडाचें स्वरूप काय असावें हें तिनें अगोदरच ठरवून ठेवलेलें होतें. आतां एकाच प्रश्नाचा उलगडा शिल्लक राहिलेला होता. तो म्हणजे सूड घेतल्यानंतर आश्रय घ्यायला कुठें जायचें? या प्रश्नाचा ती विचार करीत होती येवढ्यांत तिचा फार पूर्वीपासूनचा स्नेही कुठल्या तरी प्रवासाहून परत जातांना कॉरिन्थ शहरांत आला. हा अथेन्सचा राजा आयेगेयुस. त्याला तिच्याबद्दल सहानुभूति वाटली. कारण जेसननें तिला टाकून देण्यांत अगदीं पशूसमानच वर्तन केलेलें होतें. आयेगेयुसनें तिला स्वतःच्या राज्यांत आसरा देऊं केला. आपल्या शत्रूंचा सूड घेतल्यानंतर तिला निर्धास्तपणें अथेन्स शहरीं आसरा घ्यायची आयेगेयुसनें मोकळीक दिली. अशा प्रकारें आपण कॉरिन्थ शहरीं जी कांहीं कृत्यें करणार आहोंत, त्यांची हकीकत आयेगेयुसला कळल्यानंतर देखील आपल्याला आसरा मिळायला प्रत्यवाय येऊं नये अशी पक्की तरतूद मेडेयानें आगाऊच करून घेतली.

कॉरिन्थनिवासी महिला मेडेयाला भेटायला आल्या. त्यांच्याकडून तिनें आपलें सांगणें कुणालाहि कळूं न देण्याच्या शपथा घेवविल्या. आपल्या योजने-बाबत संपूर्ण गुप्तता राखण्याची त्यांच्याकडून पक्की खातरजमा करून घेतल्या-नंतर तिनें त्यांना ती योजना समजावून सांगितली. पहिल्या प्रथम तिचा विचार असा होता कीं जेसन, त्याची प्रियतमा राजकन्या व राजकन्येचा पिता राजा

क्रेऑन या तिघांना ठार करायचें आणि मग आपल्या मुलांना घेऊन कॉरिन्थ-मधून पळ काढायचा. पण मागाहून नीट विचार केल्यानंतर तिनें हा बेत बदलला.

तिला असें वाटलें कीं जेसन जर पुढें पुष्कळ काळ जिवंत राहिला व त्याला आपल्या प्रिय माणसांचें वियोगदुःख सहन करावें लागलें, तर आपला सूड जास्त गोड ठरेल. कुणी प्रेमाचें माणूस आपली विचारपूस करायला नाहीं, कुणी मूलबाळ नाहीं, कुणी स्नेही सोबती नाहींत, अशा परिस्थितींत वार्धक्य येईपर्यंत जगणें आणि पुढें वृद्धापकाळांतहि असेंच जगत राहणें यापेक्षां अधिक दुःखदायक कांहीं असूं शकेल काय ? आणि म्हणून मेडेयानें असें ठरवून टाकलें कीं जेसनला जिवंतच ठेवायचा; आणि राजा, राजाची कन्या व आपलीं स्वतःचीं मुलें ठार मारायचीं.

या योजनेची अंमलबजावणी करणें हें सोपें काम नव्हतें. तिनें जेसनला बोलावणें धाडलें. त्याच्या समोर तिनें अशी बतावणी केली कीं "तुम्ही जें काय केलंत त्याबद्दल मी तुम्हांला क्षमा करायचं ठरवलंय. राजकन्या ग्लाउसे हिच्या बरोबर लग्न करण्यांत तुम्ही जी न्यायबुद्धि व दूरदृष्टि प्रदर्शित केलीत ती आतां अखेरीस माझ्या ध्यानांत आली. मी तुमच्यावर याच्या अगोदर जी चीड काढली तीबद्दल मी तुमची क्षमा मागत्यें. आतां माझी तुम्हाला एक विनंति आहे. ती तुम्ही ऐकाल का ? माझ्या पश्चातापाची निशाणी म्हणून नववधूसाठीं मला कांहीं भेटीच्या वस्तू पाठवायच्या आहेत. त्या वस्तू तुम्ही माझ्या मुलांच्या हातीं तिच्याकडे धाडायला परवानगी द्याल का ?"

तिच्या या तथाकथित हृदयपरिवर्तनामुळें जेसन सपशेल फशीं पडला. त्याला तिचें हें सगळें मानभावी बोलणें खरेंच वाटलें. तिला उशीरां का होईना, पण एकदांचें शहाणपण सुचलें, म्हणून त्याला खूप आनंद झाला आणि हा आनंद त्यानें तिच्याजवळ उघड करून दाखविला. तिला हवी होती ती परवानगी त्यानें अर्थातच तिला देऊन टाकली.

मेडेयानें एक अत्यंत उंची भरजरी झगा बाहेर काढला. त्याच्या जोडीला एक सोन्याचा बिजवरा दिला. या दोन्ही भेटीच्या वस्तू तिचे आजोबा सूर्यदेव हेलियॉस यांनीं तिला दिलेल्या होत्या. परंतु या भेटीच्या वस्तू आपल्या मुलांच्या हातीं आपल्या सवतीकडे धाडायच्या अगोदर तिनें त्यांना एका भयंकर जलाल दाहक विषाचें पुट चढविलें. आणि मग त्या वस्तू तिनें योग्य स्थळीं धाडून दिल्या.

थोड्याच अवकाशानंतर एक जासूद तिच्याकडे निरोप घेऊन आला. त्यानें तिला ताबडतोब पळून जायला सांगितलें. तिच्या योजनेचा एक भाग यशस्वी रीतीनें पार पडलेला होता. जेसन आणि त्याचीं मुलें या भेटीच्या वस्तू देऊन निघून गेलीं. मग राजकन्या ग्लाउसे हिनें हा अति सुंदर झगा परिधान केला आणि ती राजवाड्यांतून फेरफटका करूं लागली.

परंतु तिच्या अंगांतली ऊब व घाम यांचा संयोग त्या विषारी पदार्थाशीं होतांक्षणीं तो बिजवरा नि तो झगा तिच्या अंगाला घट्ट चिकटून बसला आणि तिच्या देहाची आग आग होऊं लागली. तिनें तो दागिना व तो झगा आपल्या अंगावरून ओरबाडून दूर फेंकून देण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला. परंतु तिनें जसजशी ओढाताण करावी तसतसा तो झगा तिच्या अंगाला अधिकच घट्ट लपेटून बसावा, असा प्रकार होऊं लागला. अखेर ती वेदना असह्य होऊन किंकाळ्या मारूं लागली. तिचें सगळें अंग पेटलें. तशांतच तिचा अत्यंत करुणाजनक अंत झाला.

राजा क्रेऑन त्या ठिकाणीं धांवत आला. आपली कन्या आगींत होरपळून तडफडत पडली असल्याचें त्यानें पाहिलें. तिला वांचविण्यासाठीं त्यानें तिला जमिनीवरून उचलून घेण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर त्याला देखील त्याच विषाराची बाधा झाली. त्याचेंहि सर्वांग पेटलें. तोहि तिच्या सारखाच वेदना असह्य होऊन किंकाळ्या मारूं लागला. तिच्या प्रमाणेंच तोहि हाल हाल होऊन तडफडत गतप्राण झाला.

दरम्यान जेसननें मुलें मेडेयाकडे परत आणून पोंचविलीं होतीं. तिनें मुलांकडे बघितलें. त्यांचे करपाश तिच्या गळ्यांत पडले. एकीकडे अपत्यांचें प्रेम आणि दुसरीकडे जेसनविषयींचा द्वेष अशी तिच्या मनाची भयंकर ओढाताण सुरू झाली. एकीकडे सूडाची आसुरी लालसा तिला खेंचत होती. आणि दुसरीकडे मातेच्या उपजत बुद्धीचे आदेश तिला उलट दिशेला ओढून नेत होते. परंतु शेवटीं तिच्या स्वभावांतल्या रानटी प्रवृत्तीचा विजय झाला. कारण मेडेया ही जन्मानें ग्रीक नव्हती. कोल्चीस येथील रानटी जमातींतली ती कन्यका होती. राजा क्रेऑन आणि त्याची कन्या राजकन्या ग्लाउसे हीं दोघें आगींत होरपळून कशीं तडफडून तडफडून मेलीं याची हकीकत जासुदाच्या तोंडून ऐकतांना मेडेयाला

मनसोक्त आनंद झाला. मग ती आपल्या मुलांना घेऊन घरांत गेली आणि तिनें दरवाज्याला आंतून कडी लावून घेतली.

कॉरिन्थनिवासी महिला अगतिकपणें तिच्या घराबाहेर गर्दी करून उभ्या होत्या. मेडेया एका तरवारीनें स्वतःच्या मुलांचीं आंत खांडोळीं करीत आहे आणि तिचीं मुलें आर्त किंकाळ्या मारीत आहेत, हें सगळें त्यांना बाहेर ऐकूं येत होतें. परंतु त्यांना याचा प्रतिबंध करण्यासाठीं कांहीं एक करतां आलें नाहीं. तेवढ्यांत जेसन तिथें येऊन पोंचला. आपल्या मुलांना क्रेऑनचे अनुयायी संतापाच्या भरांत मारून टाकतील, कारण त्यांनींच त्या प्राणघातक भेटीच्या वस्तु राजवाड्यांत नेऊन दिलेल्या होत्या, म्हणून आपल्या मुलांचे प्राण वांचविण्यासाठीं त्यांना घेऊन कुठें तरी निघून जावें, येवढ्याचसाठीं तो घाई-घाईनें घरीं आलेला होता.

पण येऊन बघतो तों दार आंतून बंद. मेडेयानें आपलीं मुलें ठार मारून टाकलीं हें त्याला बाहेरच्या बाहेरच कळलें. त्या बरोबर तो दुःखानें जवळ जवळ वेडापिसा झाला. तो घराच्या बंद दरवाज्यांवर धडाधड धक्के देऊं लागला. तेवढ्यांत मेडेया अचानक वाड्याच्या वरच्या अंगाला प्रकट झाली. सूर्यदेव हेलियॉस यांनीं धाडून दिलेल्या रथांत ती बसलेली होती. ठार मारलेल्या स्वतःच्या मुलांचे मृत देह तिनें आपल्या कवेंत धरून ठेवलेले होते.

जेसन तिला आलटून पालटून शिव्याशाप देत होता आणि तिचीं आर्जवेंहि करीत होता. मुलें मारल्याबद्दल शिव्या देतां देतां तो तिला विनवून सांगत होता : "चांडाळणी, माझीं मुलं मला एकदां शेवटचीं बघून तरी घेऊं दे ग!" यावर मेडेया त्याला टोमणे मारत होती : "आतां बसा असेच एकलकोंडे जन्मभर शंख करीत. माझ्या उरावर सवत आणायला पाहिजे होती नाहीं का तुम्हांला? आतां भोगा आपल्या कर्माची फळं. मी कांहीं झालं तरी आई आहे. माझीं मुलं माझ्या हातानं मारायची पाळी माझ्यावर यावी या परतं अधिक भयंकर दुःख मला दुसरं कोणतं असणार! परंतु चांडाळा, मी तुझा जो हा गोड सूड घेतलाय, त्याच्या आनंदानं या दुःखाची भरपाई होते आहे, येवढंच मला त्यांतल्या त्यांत समाधान मिळतंय."

तिच्या रथाला उडते राक्षस जोडलेले होते. त्यांनीं तो रथ आकाशांतून भरधांव उडवीत प्रथम हेरा देवतेच्या पर्वतावर नेला. तिथें मेडेयानें आपल्या

मृत मुलांचें दफन केलें. मग तिथून ती अथेन्स नगराला गेली. आपलें उरलेलें सगळें आयुष्य तो याच शहरांत घालविणार होती. आपल्या भयंकर दुःखाचे नि सूडाचे जहरी कडवट घोंट घेतच ती जगणार होती.

## द मिकाडो : जपानचा बादशहा

*वाङ्मयप्रकार :* हास्यरसप्रधान संगीतिका. *लेखक :* डब्ल्यू. एस्. गिल्बर्ट (१८३६-१९११). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक उपहासिका. *काळ :* मध्ययुग. *स्थळ :* जपान. *पहिला प्रयोग :* १८८५.

*प्रमुख पात्रें :* **को-को,** टिटिपू नगरांतला 'लॉर्ड हाय एक्झिक्यूशनर' (वरिष्ठ मारेकरी सरदार). **द मिकाडो ऑफ जपान,** जपानचा बादशहा. **नान्कि-पू,** त्याचा पुत्र म्हणजे राजपुत्र; यानें शाहिराचा खोटा वेष धारण केलेला असतो. **पू-बा,** लॉर्ड हाय "एव्हरिथिंग एल्स" (सकल शेषाधिकारी सरदार). **युम-युम, पिटि-सिंग,** आणि **पीप-बो,** सरदार को-को यांच्या आश्रित मुली. **काटीशा,** नान्कि-पू याच्या प्रेमांत सांपडलेली एक प्रौढा. **पिश-दुश,** एक बडा सरदार.

*समीक्षण :* सर विल्यम गिल्बर्ट आणि सर आर्थर सेमूर सुलिव्हन (१८४२-१९००) हे उभयतां एकमेकांच्या सहकार्यानें हास्यरसप्रधान संगीतिका लिहून कीर्तिमान झाले. यांच्या अशा अनेक कृतींपैकींच 'द मिकाडो' ऊर्फ 'द टाउन ऑफ टिटिपू' ही एक कृति. या उभयतांनीं आपापली निर्मितिक्षम कारकीर्द अलग अलगपणेंच सुरू केली असली तरी त्यांना मोठ्यांत मोठा लौकिक जो लाभला तो त्यांनीं दोघांनीं मिळून १८७१ नंतर केलेल्या कामगिरीचाच परिणाम. गिल्बर्टनें गीतें रचायचीं आणि सुलिव्हननें त्यांना चाली द्यायच्या, असें या उभयतांच्या सहकार्याचें स्वरूप. 'द मिकाडो' ही दोन अंकी हास्यरसप्रधान संगीतिका आहे. गिल्बर्ट आणि सुलिव्हन यांच्या बहुतेक सगळ्या अन्य निर्मितींप्रमाणेंच या संगीतिकेमध्यें देखील खूपच हास्यस्फोटक विनोद आणि धारदार उपहास भरलेला आहे.

*कथानक :* जुन्या काळच्या जपानांत टिटिपू या नगरामध्यें को-को यांना वरिष्ठ मारेकरी सरदाराचें उच्चपद प्राप्त झालें. येवढा भयानक आणि रुबाबदार अधिकार त्यांच्या हातीं आल्यामुळें साहजिकच अनेक बडेबडे मानकरी

व सरदार त्यांची खुशामत करण्यासाठीं आणि त्यांची मनधरणी करण्यासाठीं त्यांच्या वाड्याच्या अंगणांत गर्दी करूं लागले.

एके दिवशीं एक अगदींच त्रयस्थ इसम सरदार को-को यांच्या वाड्यांत येऊन दाखल झाला. हा भटक्या शाहीर होता. आणि यानें आपलें ' गिटार ' हें तंतुवाद्य आपल्या पाठीवर बांधलेलें होतें आणि त्याच्या हातांत पोवाड्यांच्या हस्तलिखितांचा एक गठ्ठा होता. हा इथें कशाला आला याविषयीं जपानी सरदार मंडळींचें कुतूहल जागृत झालें. कारण तो कांहीं सरदार घराण्यांतला नव्हता आणि म्हणून सामर्थ्यशाली सरदार को-को यांजकडून आपल्याला कसलाहि कृपाप्रसाद मिळेल अशी त्याला आशा असणें शक्य नव्हतें. अखेर शेवटीं सरदार पिश-तुश यांनीं त्याला विचारलें : " काय रे, सरदार को-को यांजकडे तुझं काय काम आहे ? "

शाहिरानें त्यांना आपला परिचय करून दिला. तो म्हणालाः " माझं नांव नान्कि-पू. मी एक शाहीर आहें. गेल्या सालीं टिटिपू नगराच्या बँड-पथकांत मी ' सेकंड ट्रॉम्बोन ' हें वाद्य वाजवीत होतों. त्या वेळीं सरदार को-को यांची स्वरूप-सुंदरी आश्रित युम-युम हिच्या मी प्रेमांत सांपडलों. तिलाच भेटायला मी आलों आहे. सरदार को-को यांना चोरटं प्रेम केल्याच्या आरोपावरून फांशीची शिक्षा मिळाली आहे असं मी ऐकलं. कारण मिकाडो बादशहांच्या राज्यांत चोरटं प्रेम करणं हा फांशीच्या शिक्षेला पात्र ठरणारा गुन्हा आहे हें आपण जाणतांच. आणि आतां सरदार को-को ज्या अर्थी मरणारच आहेत, त्या अर्थी युम-युम हिला माझ्याशीं लग्न करायला मोकळीक मिळेल."

या बेफाट तरुणाचें हें बोलणें ऐकून सरदार पिश-तुश यांनीं त्याची चूक दुरुस्त केली. ते म्हणाले : " अरे वेड्या, मिकाडो बादशहांनीं सरदार को-को यांची फांशीची शिक्षा रद्द केली आहे. आणि त्याच वेळीं त्यांनीं सरदार साहेबांना टिटिपू नगराच्या वरिष्ठ मारेकऱ्याचा उच्च अधिकार बहाल केला आहे."
हें ऐकून नान्कि-पू याचा नक्षा सपशेल उतरला. कारण येवढ्या महत्त्वाच्या अधिकारपदावर असलेल्या सरदाराची आश्रित तरुणी हलक्या जातीच्या शाहिराशीं लग्न करायचें मनांत आणील तर तिला तें लग्न करायची परवानगी मिळणें शक्य नाहीं, हें त्याच्या ध्यानांत येऊन चुकलें.

पू-बा हा दुसरा एक सरदार मनांतल्या मनांत खूप चिडलेला होता.

कारण आपण येवढे प्राचीन उच्चकुलोत्पन्न असतांना आपल्याला पूर्वी केवळ शिंपी असलेल्या या सरदार को-को सारख्या इसमाच्या हाताखालीं सकल शेषाधिकारी म्हणून एका मामुली अधिकारपदावर काम करायची पाळी यावी हें सरदार पू-बा याला बिलकुल पसंत नव्हतें. परंतु लांच खाण्याची कसलीहि संधि मिळाली, तर ती सोडायची नाहीं असा सरदार पू-बा याचा खाक्या होता. सरदार को-को याच्या मनांत आपल्या स्वरूपसुंदर आश्रित तरुणीशींच लग्न करायचा विचार आहे हें तथा-कथित सरकारी रहस्य बेलाशक उघड करून सांगायची देखील पू-बा याची तयारी होती. म्हणून त्यानें नान्कि-पो याला असा सल्ला दिला कीं "बाबा रे, तूं हें टिटिपू नगर सोडून दुसरीकडे कुठं तरी निघून जा. आणि कांहीं झालं तरी युम-युम हिच्या आसपास देखील फिरकूं नकोस."

दरम्यान सरदार को-को यानें कोणकोणत्या प्रकारच्या गुन्हेगारांना आपण फांसावर चढवावें त्यांची यादी तयार करण्याचें काम चालविलें होतें. या यादीमध्यें पुढील गुन्हेगारांचा समावेश होता :

बड्या लोकांच्या स्वाक्षऱ्या मिळविण्यासाठीं धडपडणारे.

चोरट्या प्रेमिकांच्या गुप्त भेटीगांठींमध्यें बिघाड आणण्याचा आग्रह धरणारे.

पेपरमिंट चघळणारे आणि दुसऱ्यांच्या तोंडावर श्वास सोडणारे.

स्वदेशाखेरीज इतर प्रत्येक देशाची प्रशंसा करणारा इसम.

क्षमायाचना करणारे मुत्सद्दी.

आपल्या नव्या अधिकारपदाच्या अनुषंगानें आपल्याला खास हक्क कोणकोणते प्राप्त झालेले आहेत याची निश्चित कल्पना वरिष्ठ मारेकरी सरदार को-को यांना येईना. म्हणून त्यांनीं आपल्या आगामी विवाहप्रसंगीं आपल्याला किती पैसे खर्च करतां येतील या बाबतींत सकल शेषाधिकारी सरदार पू-बा यांचा सल्ला घेतला. यावर सरदार पू-बा त्यांना म्हणाले : "प्रथम मी खासगी कारभारी या नात्यानं माझं मत सांगतों." आणि मग अर्थमंत्री या नात्यानें त्यांनीं या मताच्या विरुद्ध असा दृष्टिकोन सादर केला. त्यांच्या हातीं जितकीं वेगवेगळीं अधिकारपदें होतीं त्या त्या प्रत्येक अधिकारपदागणीक त्यांनीं या विषयावर वेगवेगळें मत दिलें. याशिवाय त्यांना ज्या अनेक अधिकृत पदव्या होत्या

त्या प्रत्येक पदवीनुसार त्यांच्या या विषयावरील मतांमध्यें त्यांनीं फरक करून दाखविला. परंतु उभयतांच्या या सल्ला मसलतींत एक व्यत्यय आला. तो म्हणजे युम-युम आणि तिच्या बहिणी पीप-बो व पिटि-सिंग या तिघी तरुणींचें आगमन. या आगमनाचा फायदा घेऊन सरदार को-को यांनीं आपल्या भावी वधूचें चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. परंतु युम-युम हिनें या बाबतींतली नाखुषी व शिसारी त्यांच्यासमोर उघडपणें व्यक्त करून दाखविली.

तेवढ्यांत या तिघी बहिणींना नान्कि-पू हा जवळपासच रावखुळत असलेला दिसला. त्याबरोबर त्याची भेट घ्यायला नि त्याला अभिवादन करायला त्या धांवतच गेल्या. तो टिटिपू नगरांत आहे हें बघून त्या आश्चर्यानें अगदीं थक्क झाल्या. या तिघी तरुणींचें हें शाळकरी मुलींना शोभणारें आनंद-प्रदर्शन बघून सरदार को-को बुचकळ्यांत पडला आणि नाराजहि झाला. त्यानें या तिऱ्हाइताशीं आपली ओळख झाली पाहिजे असा या तिघीं तरुणींना आदेश दिला.

या सगळ्या प्रकारांत त्यांतल्या त्यांत संधि साधून युम-युम व नान्कि-पू या दोघांनीं एकीकडे जाऊन कांहीं क्षण आपसांत एकांत केला. त्या अवधींत या शहिरानें आपली खरी ओळख तिला दिली. आपण मिकाडोचे पुत्र आहोंत हें त्यानें तिला उघड करून सांगितलें. आपण राजदरबारांतून पळ काढून इकडे कां आलों याचा पाढाहि त्यानें तिच्या समोर वाचला. त्याच्या पलायनाचीं कारणें अशीं होतीं: मिकाडोच्या दरबारांत काटीशा नामक एक मध्यमवयस्क महिला होती. नान्कि-पूच्या कांहीं कृतींमुळें तिचा गैरसमज झाला आणि तिला असें वाटलें कीं नान्कि-पू आपल्याशीं कामचेष्टा करूं इच्छीत असावा. तिनें ही हकीगत मिकाडोच्या कानावर घातली. मिकाडोनें आपल्या राजपुत्राच्या वागण्या-विषयीं स्वतःचाच गैरसमज करून घेतला आणि राजपुत्र नान्कि-पू याला अशी विनंति केली कीं "तूं काटीशाबरोबर लग्न करून मोकळा हो." इकडे नान्कि-पूचें तर युम-युमवर अगोदरच प्रेम बसलेलें होतें. म्हणून त्यानें शाहिराचा वेष घेऊन दरबारांतून पोबारा केला आणि थेट टिटिपू नगर गांठलें.

त्याच दिवशीं सरदार को-को याच्याकडे मिकाडोचें एक फर्मान येऊन थडकलें. त्यांत असा आदेश होता: "तुम्ही अलीकडे कुणालाच फांशीं दिलें नाहीं. अशानें आपला कारभार नीट चालणार नाहीं. बऱ्या बोलानें एक

महिन्याच्या आंत कुणा ना कुणाला तरी फांशीं देऊन टाका. असें जर तुम्ही केलें नाहींत, तर ' वरिष्ठ मारेकरी सरदार ' हा तुमचा हुद्दा रद्द करण्यांत येईल. येवढेंच नव्हे तर आपल्या कर्तव्यांत कसूर केल्याबद्दल खुद्द तुम्हांलाच फांशीं देण्यांत येईल. आणि टिटिपूचा नगर हा दर्जा रद्द करून त्याची केवळ एक खेडेंगांव म्हणून गणना होईल. "

या आकस्मिक नि दुःखकारक बातमीमुळें सरदार को-को चांगलाच बुचकळ्यांत पडला. यांतून काय मार्ग काढावा हें त्याला बराच वेळ सुचेना. तितक्यांत नान्कि-पू त्याला दिसला. नान्कि-पू एक कासरा घेऊन चाललेला होता; या कासऱ्यानेंच तो स्वतःला गळफांस लावून घेऊन जीव देणार होता. त्याला बघतांक्षणीं सरदार को-को याला एक छान युक्ति सुचली. तो नान्कि-पू याला उद्देशून म्हणाला : " बा शाहिरा, मी येते तीस दिवस तुझी अगदीं चैनींत राहायची व्यवस्था करून देतों. परंतु एक अट मात्र तूं पूर्ण केली पाहिजेस. ही तीस दिवसांची मुदत संपल्यावर तूं अधिकृत रीत्या फांशीं जायला तयार झालं पाहिजेस. " यावर नान्कि-पू म्हणाला : " सरदारजी, तुमचं म्हणणं मी मान्य करतों. पण एका अटीवर. मला ताबडतोब युम-युमशीं लग्न करायला मिळालं पाहिजे. "

उभयतांनीं एकमेकांच्या अटी मान्य केल्या. सरदार को-को याला एकदांचा स्वतःच्या अडचणींतून मार्ग सांपडला. पण काटीशा तेवढ्यांत तिथें आली आणि मग सगळाच घोंटाळा झाला. तिनें नान्कि-पू याला ओळखलें आणि हा आपला पति आहे म्हणून त्याच्यावर हक्क सांगायचा प्रयत्न चालविला. मग तिला कळलें कीं त्याचें लग्न युम-युम बरोबर ठरलें आहे. तें ऐकून ती खूप संतापली आणि त्याचें खरें स्वरूप उघडकीस आणण्याची तिनें धमकी दिली. परंतु युम-युमच्या चिथावणीनें तिथें गाण्याबजावण्याचा आणि ओरड्या आरड्याचा येवढा हल-कल्लोळ माजला कीं काटीशानें केलेला तो गौप्यस्फोट कुणाला ऐकायलाच आला नाहीं.

युम-युम आणि नान्कि-पू यांचें लग्न होणार असल्याची बातमी सकल शेषा-धिकारी सरदार पू-बा यांना ऐकायला मिळाली. त्या बरोबर सरदार पू-बा यांनीं सरदार को-को यांना कळविलें कीं " शिरच्छेद झालेल्या माणसाच्या पत्नीला जिवंत पुरून टाकलें पाहिजे, असा आपल्या देशाचा कायदाच आहे. " या कायद्याचा अर्थ

उघड होता. नान्कि-पू जर फांशीं गेला तर युम-युम हिला जिवंत पुरून टाकलें पाहिजे. आतां या गुंत्यांतून मार्ग कसा काढायचा हा सरदार को-को यांजपुढें नवा प्रश्न उपस्थित झाला. त्यांना तर कांहींच सुचेना. तितक्यांत खुद्द मिकाडो बादशहांचें अनपेक्षित आगमन त्या ठिकाणीं झालें. आतां कांहीं तरी ताबडतोब करणें सरदार को-को यांना भागच पडलें. त्यांनीं नान्कि-पू याला कसेंबसें लपवून ठेवलें आणि त्याला फांशीं दिल्याचा खोट्या सहीचा दाखला मिकाडो बादशहासमोर सादर केला.

परंतु फांशीं गेलेल्या व्यक्तीचें नांव वाचतांक्षणीं मिकाडो बादशहांनीं जाहीर केलें कीं "आमच्या गादीचे वारस खुद्द युवराज महाराज यांनाच तुम्ही फांशीं दिलें आहे. आतां आमच्या देशाच्या कायद्याप्रमाणें या अपराधाबद्दल खुद्द तुम्हांलाच फांशीं गेलें पाहिजे. दुसरा इलाजच आतां शिल्लक नाहीं."

तथापि सरदार को-को यांचें नशीब भलतेंच शिकंदर. त्याच क्षणीं नान्कि-पू आणि युम-युम हें जोडपें तिथें दत्त म्हणून हजर झालें. दोघांनीं शेवटीं एकदांचें आपलें लग्न उरकून घेतलें होतें आणि उभयतां स्वाऱ्या आतां मधुचंद्रासाठीं प्रवासाला निघायला तयार झालेल्या होत्या. आपल्या युवराजांना मनासारखी पत्नी मिळून ते सुखी झाले आहेत, आणि आपण समजत होतों त्याप्रमाणें ते फांशीं गेलेले नाहींत हें बघितल्यावर मिकाडो बादशहांना जो काय आनंद झाला म्हणतां! त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं सरदार को-को यांच्या कटांत सामील झालेल्या सगळ्यांना माफी देऊन टाकली. खुद्द वरिष्ठ मारेकरी सरदार को-को यांना मात्र एकाच अटीवर माफी मिळाली. ती ही कीं त्यांना युवराज महाराजांनीं धुडकावून लावलेली काटीशा हिच्याशीं लग्न करावें लागलें.

## फा ये ड्रा

*वाङ्‌मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जीन बातिस्त रेसिने (१६३९-१६९९). *कथानकाचा प्रकार :* अभिजात शोकान्तिका. *काळ :* अतिप्राचीन काळ. *स्थळ :* प्राचीन ग्रीसमधील ट्रोएझेन नगरी. *पहिला प्रयोग :* १६७७.

*प्रमुख पात्रें :* **थेसियस,** अथेन्सचा राजा. **फायेड्रा,** त्याची पत्नी. **हिप्पॉलिटस,** थेसियसचा पुत्र. **आरिसिया,** एक अथेन्स-निवासी राजकन्या.

*समीक्षण :* 'फायेड्रा' हें फ्रेंच रंगभूमीच्या अभिजात परंपरेचें प्रतिनिधित्व करणारें नाटक आहे. सतराव्या शतकांतला फ्रान्स हा त्या वेळीं वैभवाच्या शिखरावर असल्यामुळें आपल्या फौजेच्या पराक्रमाला आणि राजघराण्याला पाठिंबा देण्यासाठीं आपल्या कलाकारांनीं मोठी कामगिरी करावी अशी सबंध देशाची मागणी असे. म्हणून समकालीनांचीं मनें प्राचीन काळच्या वैभवशाली जीवनाच्या ज्ञानानें जागृत करावींत आणि त्यांना अधिक मोठे पराक्रम करण्याची प्रेरणा द्यावी असा प्रयत्न त्या कालखंडांत लेखकांनीं केला. या कामगिरीप्रीत्यर्थ त्यांनीं प्राचीन काळ आत्मसात केला. अभिजात दंतकथांचें प्रचंड कोठार हें असंख्य कथानकांना व कलाविषयांना आधारभूत म्हणून कामीं आलें. पूर्णतः वा अंशतः प्राचीन नाटकें व पुराण कथा यांना नव्या नाटकांची रचना करण्यासाठीं राबविण्यांत आलें आणि हीं नवीं नाटकें अभिजात परंपरेशीं अधिकांत अधिक मिळतीं जुळतीं व्हावींत म्हणून लेखकांनीं खास खबरदारी घेतली. आपल्या शतकांतील अशा नव-अभिजातवाद्यांच्या अग्रभागीं रेसिने हा नाटककार झळकतो.

*कथानक :* मिनोटॉरला ठार करणारा थेसियस याची ॲमॅझॉन राणी मरण पावली. मग त्यानें क्रीटच्या राजाची तरुण कन्यका फायेड्रा हिच्याशीं विवाह केला. फायेड्राची नजर आपला सावत्र मुलगा हिप्पॉलिटस याच्याकडे गेली. शौर्य व सद्गुण आदि सगळ्याच बाबतींत हा मुलगा आपल्या वडिलांसारखाच होता. आणि शिवाय त्याची ही मूर्ति अधिक तरुण वयांतली होती. फायेड्राचें त्याच्यावर प्रेम बसलें. थेसियसच्या पुत्राविषयीं तिच्या मनांत उद्भवलेला हा प्रेमाचा आवेग तिनें छपवून ठेवण्याचा प्रयत्न चालविला. ती त्याला तुटकपणें व आकसखोर वृत्तीनें वागवूं लागली. शेवटीं हिप्पॉलिटसनेंच ठरविलें कीं आपणच ट्रॉएझेन सोडून निघून जावें. नाहीं तरी त्याचे वडील त्या वेळीं राज्यांतून गैरहजरच होते. त्यांच्या शोधार्थ तो निघाला. जाण्यापूर्वीं त्यानें आपले गुरुजी थेरामेनेस यांना विश्वासांत घेऊन सांगितलें कीं "मी जो दूर निघून जातोंय, तो माझी सावत्र आई व अथेन्सनिवासी राजकन्या आरिसिया या दोघींनाहि टाळण्यासाठीं जातोंय." आरिसिया ही राजकन्या थेसियसला विरोध करणाऱ्या कुळांतली होती.

फायेड्रानें आपली दाई ओएनोने हिच्याजवळ आपलें हिप्पॉलिटसविषयींचें

पापी प्रेम उघड करून सांगितलें. ती म्हणाली : "माझ्या खऱ्या भावना लपवायसाठीं मी मुद्दामच त्याच्याशीं दुष्टपणानं वागायचं नाटक चालवलेलं होतं."

थेसियस मरण पावल्याची बातमी ट्रोएझेन नगरांत येऊन थडकली. तेव्हां ओएनोने हिनें फायेड्राला विचारलें : "आतां अथेन्सचा नवा राजा म्हणून निवड कुणाची व्हायची ? हिप्पॉलिटसची का तुझ्या स्वतःच्या मुलाची ?" आणि तिनें फायेड्राचा स्वतःचाच मुलगा राजा व्हावा अशी तिची खात्री पटवून देण्याचा प्रयत्न केला. इकडे आरिसियाला अशी आशा वाटत होती कीं आपली स्वतःचीच निवड राज्यपदासाठीं होईल.

हिप्पॉलिटस न्यायी वृत्तीचा तरुण माणूस होता. तो आरिसियाला म्हणाला : "अथेन्स नगरीच्या राज्यपदावर तूं यावीस म्हणून तुला मी पाठिंबा देईन. फायेड्राचा मुलगा वारसाहक्कानं क्रीटचा राजा व्हावा असं मला वाटतं. आणि मी स्वतःच ट्रोएझेनचा राजा म्हणून इथं राहावं हें मला तरी न्यायाला धरून योग्य आहे असं वाटतं." त्याच वेळीं त्यानें आरिसियाविषयींची आपली प्रणयभावना कबूल करून टाकली. परंतु देवदेवता आपल्या ह्या प्रेमाची परिपूर्ति करायची परवानगी कधींच देणार नाहींत अशी आपल्याला वाटत असलेली धास्तीहि त्यानें बोलून दाखविली.

आपल्या मनांतले हे सगळे विचार आपल्या सावत्र आईला समजावून सांगायचा त्यानें प्रयत्न केला. तिनेंहि आपलें मन त्याच्या जवळ उघड करून दाखविलें. ती म्हणाली : "तुझ्याशीं मी जी द्वेषबुद्धीनं नि अविश्वासानं वागत होत्यें, ती माझी केवळ बनवाबनवी होती." आणि शेवटीं तिनें आपलें हिप्पॉलिटसविषयींचें मनांत ठेवलेलें चोरटें प्रेम प्रकट करून सांगितलें. तिचें हें बोलणें ऐकून हिप्पॉलिटसला धक्काच बसला. त्यानें तिचा धिक्कार केला. त्याबरोबर तिनें स्वतः च्या जिवाचें बरें वाईट करण्याची धमकी दिली.

तथापि सारेंच मुसळ केरांत, अशांतला प्रकार झाला. अथेन्सनिवासी जनतेनें फायेड्राचा मुलगाच आपला राज्यकर्ता म्हणून निवडून दिला. आरिसियाची बिचारीची निराशा झाली. थेसियस अजून जिवंत आहे अशाहि अफवा उठल्या. तेव्हां आपल्या वडिलांचा तपास झाला पाहिजे असें हिप्पॉलिटसनें फर्मान काढलें.

आपण हें सगळें हिप्पॉलिटसला काय सांगून बसलों, या विचारानें

फायेड्राची मनःस्थिति फारच चमत्कारिक झाली. आतां तिचेंच मन तिला खाऊं लागलें. आपलें प्रेम आपण अजिबात उघड करून सांगितलें नसतें तर फार बरें झालें असतें असें तिचें तिलाच फार फार वाटूं लागलें. तशी ती मोठी अभिमानी बाई होती. परंतु आतां तिचा अभिमान कायमचा दुखावला गेला. मात्र आपल्या मनांतली प्रेमभावना काबूंत ठेवणें तिला अशक्य झालें. तिनें अथेन्स नगरीचें राज्य हिप्पॉलिटसलाच देऊं करायचें असा निर्णय घेतला. त्या निमित्तानें आपल्याला त्याच्या सहवाससुखाचा तरी लाभ मिळेल असा यांत तिचा हेतु होता.

मग अशी बातमी आली कीं थेसियस स्वतःच आपल्या राजधानीकडे परत येत आहे. तेव्हां ओएनोने हिनें फायेड्राला इशारा देऊन ठेवला कीं "निदान आतां तरी तूं हिप्पॉलिटसविषयींच्या आपल्या खऱ्या भावना लपवून ठेवल्या पाहिजेस. त्यांचा राजाला पत्ता लागतां कामा नये." याच्याहि पुढें जाऊन तिनें राणीला असें सुचविलें कीं "तूंच आतां हिप्पॉलिटसवर एक कुभांड रच. त्यानेंच तुला व्यभिचार करायच्या मोहांत घातलें अशी तूं राजाची समजूत करून दे."

राजा थेसियस परत आला. फायेड्रानें मोठ्या नाखुषीनें त्याचें स्वागत केलें. ती म्हणाली: "महाराज, मी आपली अर्धांगी राहण्याची योग्यता माझ्या अंगीं अतःपर राहिलेली नाहीं." हिप्पॉलिटसनेंहि त्याच सुमारास वडिलांना सांगून टाकलें कीं "मला ताबडतोब ट्रोएझेन सोडून निघून जायची परवानगी द्यावी." आपण येवढे जगून वांचून परत आलों, तर येथें हा भलताच प्रकार काय चाललेला आहे, आपल्या येण्यानें आपल्या जवळच्या माणसांपैकीं कुणालाच आनंद झालेला दिसत नाहीं, याचें थेसियसला फार वैषम्य वाटलें.

ओएनोने मोठी कारस्थानी बाई होती. तिनें राजाला खोटेंच सांगून टाकलें कीं "हिप्पॉलिटसनं आपल्या आईशीं अतिप्रसंग करायचा प्रयत्न केला." हें ऐकून थेसियसच्या संतापाला पारावारच राहिला नहीं. हिप्पॉलिटसला या कारस्थानाची गंधवार्ताहि नव्हती. पहिल्या प्रथम त्याला वडिलांच्या संतापाचें व धमकावण्याचें नवलच वाटलें. मग वडिलांनीं त्याच्यावर जेव्हां उघड उघड आरोपच केला तेव्हां त्यानें या आरोपाचा साफ इन्कार केला. परंतु थेसियस त्याचें कांहीं एक ऐकून घ्यायलाच तयार होईना. त्यानें आपल्या मुलाची

आपल्या राज्यांतून कायमची हकालपट्टी केली. आपण खरोखरी आरिसियाच्या प्रेमांत सांपडलों आहोंत असें हिप्पॉलिटसनें वडिलांसमोर प्रतिपादन केलें. पण तें ऐकून थेसियस आणखीच भडकला. वरुणदेव नेपच्यून यानें आपल्या मुलाचा सूड घ्यावा अशी त्यानें संतापाच्या भरांत प्रार्थना केली.

हिप्पॉलिटसनें आपला निरपराधीपणा सिद्ध करून दाखविला पाहिजे असें आरिसियानें त्याला आग्रहानें पटवून द्यायचा प्रयत्न केला. परंतु या गोष्टीला त्यानें नकार दिला. कारण फायेड्राच्या पापी प्रेमभावनेचा परिस्फोट झाला तर त्याचें आपल्या वडिलांना इतकें भयंकर दुःख होईल कीं तें त्यांना सहन करतां येणार नाहीं हें तो जाणून होता. म्हणून दोघांनीं मिळून पळून जायचें ठरविलें. परंतु आरिसिया राजवाड्यांतून बाहेर पडण्यांत यशस्वी व्हायच्या अगोदरच थेसियसनें तिला "कुठें चाललीस?" म्हणून विचारलें. त्याला कांहीं तरी काळें बेरें असल्याचा संशय आला. त्यानें ओएनोनेला बोलावणें धाडलें आणि खरा प्रकार काय आहे तो आपल्याला समजला पाहिजे अशी मागणी केली. आपलें बिंग फुटलें असणार अशी धास्ती घेऊन ओएनोने जीव देऊन मोकळी झाली.

दरम्यान हिप्पॉलिटस समुद्राच्या किनाऱ्याजवळून आपल्या रथांतून चाललेला होता. ही संधि साधून वरुणदेव नेपच्यून यानें अर्धा बैल व अर्धा राक्षस असें रूप असलेला एक भयंकर प्राणी सोडला. या प्राण्यानें थेसियसचा मुलगा हिप्पॉलिटस याला ठार करून टाकलें.

त्याच्या मृत्यूची वार्ता वाड्यांत येऊन थडकली. त्याबरोबर फायेड्रानें आपल्या पापी प्रेमाचा कबुलीजबाब दिला आणि लगेच विष प्राशन केलें. थेसियसला आपली पापी राणी एकदांची मेली, हें बघून आनंद झाला. तिच्याबरोबर तिच्या आयुष्याची आठवणहि नष्ट व्हावी येवढीच इच्छा त्याच्या मनांत शिल्लक राहिली. आरिसियावर तर दुःखाचा डोंगरच कोसळला होता. तिला धीर द्यावा म्हणून तो खिन्न मनानें तिची विचारपूस करूं लागला.

## द प्लेबॉय ऑफ द वेस्टर्न वर्ल्ड : "खेळाडू"

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जॉन मिलिंग्टन सिंज (१८७१-१९०९). *कथानकाचा प्रकार :* वास्तववादी सुखान्तिका. *काळ :* विसाव्या शतकाचा आरंभ. *स्थळ :* मेयो परगणा, आयर्लंड. *पहिला प्रयोग :* १९०७.

*प्रमुख पात्रें :* **ख्रिस्टॉफर मॅहॉन,** बाष्कळ बढाया मारणारा एक इसम. **ओल्ड मॅहॉन,** त्याचे वडील. **मार्गारेट फ्लाहेर्टी** (पेगीन माइक), त्याची प्रियतमा. **विडो क्विन,** एक ग्रामीण विधवा स्त्री. **शॉन केऑघ,** पेगीनच्या प्रेमांत सांपडलेला एक तरुण शेतकरी.

*समीक्षण :* जॉन मिलिंग्टन सिंज याच्या आयरिश नाटकांमध्यें हें नाटक सर्वश्रेष्ठ ठरतें. त्यांत नाटककारानें सुंदर भावस्पर्शी आयरिश भाषेचा वापर अत्युत्कृष्ट परिणाम घडविणारा असा केलेला आहे. ' द प्लेबॉय ऑफ द वेस्टर्न वर्ल्ड ' हें नाटक हळुवार, उपरोधिक नि विनोदी आहे.

*कथानक :* आयर्लंडच्या मेयो परगण्यांतील डोंगराळ समुद्र किनाऱ्यावरील एक लहानशी खानावळ. इथें एका सायंकाळीं एक तरुण इसम आला. आल्याबरोबर त्यानें जमलेल्या मंडळींना उद्देशून जाहीर करून टाकलें कीं " मी घरून पळून आलेलों आहे. माझं नांव ख्रिस्टॉफर मॅहॉन. मी कां पळून आलों असं तुम्ही विचाराल. म्हणून मीच तुम्हांला सांगतों. माझी नि माझ्या वडिलांची मारामारी झाली. तींत माझे वडील माझ्या हातून ठार झाले." खानावळींत वेळ वालवीत बसलेले शेतकरी त्याच्या धैर्यशालीपणाचें हें प्रदर्शन बघून फारच खूष झाले. खानावळीचा मालक मायकेल फ्लाहेर्टी याची सुंदर तरुण कन्यका पेगीन हिनें तर ख्रिस्टॉफरचें विशेष कौतुक केलें. तिनें नि आणखी इतर कांहीं लोकांनीं त्या तरुणाला आपल्या पराक्रमाची कहाणी पुन्हां पुन्हां सांगायचा आग्रह चालविला.

ख्रिस्टॉफरची वरची वागणूक म्हणाल तर तो अगदीं गरीब व आज्ञाधारक मुलगा होता, आणि त्याच्या वडिलांचाच त्याच्यावर वरचष्मा असे. वडिलांनीं कितीहि अपमान केले तरी ते तो बिचारा मुकाट्यानें सहन करी. शेवटीं वडिलांनीं अगदीं शेवटची हद्द गांठली. एका श्रीमंत म्हातारीशीं त्याला जबरदस्तीनें लग्न करायला लावायचा त्यांनीं प्रयत्न आरंभला. मग मात्र निरुपाय होऊन त्यानें एक ठोसा वडिलांच्या डोक्यांत मारला. वडील जमीनदोस्त झालेले बघून ख्रिस्टॉफरनें असें गृहीत धरलें कीं त्यांना मृत्यू आला असलाच पाहिजे. आणि तो घरांतून पळाला.

खानावळींत आलेला अनुभव हा ख्रिस्टॉफरला कांहीं तरी नवीन असा प्रकार वाटला. कारण उभ्या आयुष्यांत लोकांनीं त्याच्याकडे एक वीर पुरुष म्हणून

पाहण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. त्यानें सांगितलेली हकीगत सांगीवांगीनें खेड्यांतल्या लोकांमध्यें पसरत गेली. त्याबरोबर हा आदर्श शूर वीर कोण आहे हें बघण्यासाठीं लोकांची तिथें एकच गर्दी जमूं लागली. तरुण स्त्रियांना तर त्याच्याकडे बघण्यांत विशेषच गोडी वाटत होती. आणि ज्या तितक्याशा तरुण नव्हत्या त्याहि या बाबतींत तरुणींइतक्याच उत्सुक दिसल्या. डेम क्विन ही मध्यमवयस्क विधवा तर या तरुण गुत्तावीरावर फारच खूष झाली.

परंतु ख्रिस्टॉफरला आकर्षण वाटलें तें स्वरूपसुंदरी पेगीन हिचें. ती आपलें कौतुक करते हें बघून तो अगदीं चढून गेला, आणि तिचें आपल्याविषयीं जें मत झालें आहे, त्याला पोषक अशी कामगिरी करण्याचा तो विशेष प्रयत्न करूं लागला. त्याच्या भरांत तो एकसारख्या बढायाच मारत सुटला. थोड्याच अवधींत खुद्द त्याला स्वतःलाहि असा आत्मविश्वास वाटूं लागला कीं आपण खरोखरीच मोठी धाडसाची कृति केली असली पाहिजे.

त्या खेड्यांत दर वर्षी क्रीडामहोत्सव होत असे. त्यांत निरनिराळ्या खेळांमध्यें पुरुष मंडळींची एकमेकांशीं खूप स्पर्धा चाले. या क्रीडामहोत्सवामध्यें ख्रिस्टॉफरनें भाग घ्यावा अशी सगळ्यांची अपेक्षा असणें अगदीं साहजिक होतें. त्याचा पूर्वीचा भित्रेपणा केव्हांच विलयाला गेलेला होता. त्यानें आतां पेगीनच्या नजरेंत आपला शूरपणा भरावा म्हणून प्रयत्नांची शिकस्त चालविली. त्याच्याशीं आतां तर तिचा उघडपणें वाङ्‌निश्चयहि झालेला होता. पूर्वी शॉन केऑघ नामक एका तरुण शेतकऱ्याशीं तिचा वाङ्‌निश्चय झालेला होता. परंतु ख्रिस्टॉफर हा शूर वीर मैदानांत उतरल्यावर लवकरच तिनें पहिला वाङ्‌निश्चय मोडून आतां हा त्याच्याशीं नवा वाङ्‌निश्चय केला.

पेगीननें त्याला आपला "प्लेब्रॉय" असें लाडकें नांव दिलेलें होतें. हा "प्लेब्रॉय" क्रीडामहोत्सवांत भाग घेत असतांना एक म्हातारा इसम त्या खानावळींत आला. तो ख्रिस्टॉफरच्या चेहऱ्यामोहऱ्याशीं अगदीं बरोबर मिळताजुळता चेहरामोहरा असलेल्या एका तरुण इसमाचा शोध करीत होता. तिथें म्हाताऱ्याला डेम क्विन भेटली. तिनें अजूनहि ख्रिस्टॉफरचा नाद सोडलेला नव्हता. म्हणून तिनें मुद्दामच त्या म्हाताऱ्याला चुकीचें मार्गदर्शन केलें. तो बिचारा त्याच्या शोधार्थ भलतीकडेच भरकटत गेला आणि तो सांपडला नाहीं म्हणून पुन्हां त्याच खानावळींत परत आला.

परंतु तो परत येऊन बघतो तों ख्रिस्टॉफर तिथें दत्त म्हणून हजर! सगळे जण ख्रिस्टॉफरच्या विजयाची तारीफ करीत होते. कारण त्यानें नुकतीच खेंचरांची शर्यत जिंकलेली होती. ख्रिस्टॉफरच्या फटक्यानें म्हाताऱ्या मॅहॉनला मरण नव्हतें आलेलें. त्यानें आपल्या मुलाला ताबडतोब ओळखलें. आणि मग मात्र म्हाताऱ्याला बेसुमार संताप आला. ख्रिस्टॉफरनें ताबडतोब आपल्या-बरोबर घरीं आलें पाहिजे असें त्यानें जरबेनें सांगितलें. म्हाताऱ्यानें ख्रिस्टॉफरवर हवें तसें तोंडसुख घेऊन जमलेल्या लोकांसमक्ष त्याची भयंकर मानखंडना केली.

पण ख्रिस्टॉफर आतां पूर्वींचा राहिलेला नव्हता. शूर वीर म्हणून मिरविण्यांत केवढा गौरव असतो! आणि या गौरवाचा उपभोग त्यानें बराच वेळ घेतलेला होता. म्हणून पूर्वीं जशी त्यानें वडिलांसमोर भेकडपणानें शरणागति पतकरली असती, तशी आतां पतकरायला तो मुळींच तयार नव्हता. आणि या वेळीं तर त्यानें आपल्या वागण्यानें आपल्या वडिलांना थक्कच करून सोडलें. त्यानें म्हाताऱ्याच्या डोक्यावर जोरानें ठोसा मारला. पुन्हां एकदां म्हातारा मॅहॉन मेला कीं काय असें वाटूं लागलें.

तथापि या वेळीं लोकांचा अभिप्राय अजिबात वेगळाच पडला. ख्रिस्टॉफरच्या कृतीविषयीं लोकांची प्रतिक्रिया त्याच्या अपेक्षेप्रमाणें घडून नाहीं आली. कांहीं झालें तरी अनेक मैल दूर अंतरावर आपल्या वडिलांचा खून करणें ही गोष्ट वेगळी; आणि अनेक प्रेक्षकांच्या समोर, जे प्रेक्षक असल्या प्रकरणांत गुंतवले जाण्याचा संभव आहे अशा प्रेक्षकांसमोर, आपल्या वडिलांचा खून करणें ही गोष्ट तर त्याहूनहि वेगळी ठरण्याजोगी होती. आणि झालें तसेंच. लोक आपसांत रागारागानें पुटपुटूं लागले. मारेकऱ्याचा त्यांनीं धिक्कार आरंभला. आणि खुद्द पेगीन देखील या धिक्कारकार्यांत सामील झाली.

लोकांनीं शेवटीं एकदांचें या बाबतींत काय करायचें तें ठरविलें. या बाबतींत एकच गोष्ट करणें योग्य होतें. ती म्हणजे ख्रिस्टॉफरला त्याच्या या गुन्ह्याबद्दल फांशीं देणें. तीच गोष्ट करायचें त्यांनीं ठरविलें. त्यासाठीं त्यांनीं या तरुणाच्या हिसकाहिसकीला न जुमानतां त्याच्या व्यवस्थित मुसक्या बांधल्या आणि त्याला तिथून दूर नेण्याची तयारी केली. परंतु म्हातारा ओल्ड मॅहॉन यानें आपला खणखणीतपणा पूर्वीं जसा सक्रिय सिद्ध करून दाखविलेला होता, तसाच आतांहि

त्यानें पुन्हां सिद्ध करून दाखविला. ख्रिस्टॉफरनें त्याच्या डोक्यावर हाणलेल्या पहिल्या मुष्टिप्रहारामुळें त्याला केवळ बेशुद्धी आलेली होती. ख्रिस्टॉफर पळून गेल्यानंतर थोड्याच वेळांत स्वारी छान शुद्धीवर आली आणि तो पूर्ववत इतका ठणठणीत झाला कीं तिथून त्याचा पाठलाग करीत त्याला हें खेडें गांठतां आलें.

आणि आतांच्या दुसऱ्या मुष्टिप्रहारामुळें म्हातारा जरी केवळ तसाच बेशुद्ध पडला असला तरी पहिल्या वेळेपेक्षांहि तो लवकर शुद्धीवर आला. तिकडे ख्रिस्टॉफरची हिसकाहिसकी चालूच होती. तरीहि लोकांनीं त्याला गच्च धरून ठेवलें आणि त्याच्या गळ्यांत फांस तर अडकवला. तथापि काळ आला असला तरी वेळ आलेली नव्हती. म्हातारा मॅहॉन शुद्धीवर येतांक्षणीं तसाच रांगत-रांगत दरवाज्यांतून आंत शिरला. पाहतो तों आपल्या दिवस्थ्या चिरंजिवांना फांशीं देण्याची तिथें अगदीं जय्यत तयारी चाललेली त्याला दिसली.

मग म्हातारा पुढें सरसावला. सारे खेडुत लोक अवाक् होऊन आ वासून त्याच्याकडे बघतच उभे राहिले. तो सरळ आपल्या मुलाकडे चालत गेला आणि त्याच्या मुसक्या त्यानें काढून टाकल्या. आपल्याला आपल्या मुलानें मारहाण केली याबद्दल म्हाताऱ्यानें त्याच्यावर राग काढणें दूरच राहिलें. उलट आपल्याला वाटलें होतें तितका आपला मुलगा भेकड बुळ्या नाहीं म्हणून म्हातारा चांगलाच खूष झाला. दोघे पितापुत्र हातांत हात घालून त्या खानावळींतून निघून गेले. पेगीन त्यांना "जाऊं नका" म्हणून एकसारखी विनवीत होती, परंतु त्यांनीं तिकडे लक्षच नाहीं दिलें. उलट मेयो परगण्याच्या बंदरपट्टींतले लोक किती मूर्ख आहेत याबद्दल दोघांनीं जातां जातां त्यांची चांगलीच दुर्वेवडी उडविली.

## प्रॉमेथेउस बाउन्ड : मानवहितकर्त्या राक्षसाचा बंदिवास

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* एस्किलस ( इ. स. पूर्वी ५२५-४५६ ). *कथानकाचा प्रकार :* अभिजात शोकान्तिका. *काळ :* अतिप्राचीन काळ. *स्थळ :* सिथियामधील एक ओसाड कडा. *पहिला प्रयोग :* इ. स. पूर्वी ४७०.

*प्रमुख पात्रें :* **प्रॉमेथेउस**, एक महा सामर्थ्यशाली व्यक्ति—टायटन. **हेफायेस्टस**, त्याचा नातेवाईक आणि अग्निदेव. **क्रॅटॉस**, शक्तिदेव. **बिया**,

बल-देव., **ओसियानस**, सागर-देव. **इयो**, इनाचस या नदी-देवाची कन्या. **हर्मीज**, देवांचा पंखयुक्त जासूद.

*समीक्षण :* अग्नि-वाहक प्रॉमेथेउस याच्या पौराणिक कथेचा नाट्यरूप आविष्कार करणारें 'प्रॉमेथेउस बाउन्ड' हें नाटक एस्किलसच्या नाट्यशैलीचा पूर्ण स्वरूपांत प्रत्यय आणून देतें. या नाटकाचा नायक प्रॉमेथेउस हा अर्धा मानव व अर्धा देव असा कल्पिलेला आहे. याचा आपल्या भवितव्याशीं संघर्ष होतो. याला मिळालेल्या भयंकर शिक्षेपुढें हा मान ताठ करून तिला धैर्यानें तोंड देतो. या दृश्याला अपरिहार्यपणेंच नाट्याचें स्वरूप प्राप्त होतें. या नाटकाचा स्थायी भाव धारदार उपरोध आणि सखोल चिंतन हा आहे. कारण प्रॉमेथेउस ज्या हालअपेष्टा भोगतो त्या मानवानें मानवाशीं वागतांना जो अमानुषपणा चालविलेला आहे त्याच्या प्रतीकस्वरूप आहेत.

*कथानक :* अगदींच क्षुद्र अशा मर्त्य मानवांना अग्नि मिळवून देण्याचा अपराध महासामर्थ्यशाली (टायटन) प्रॉमेथेउस यानें केला. या अपराधाबद्दल झ्यूस देवानें त्याला शिक्षा ठोठावली. या शिक्षेची अंमलबावणी करण्यासाठीं अग्निदेव हेफायेस्टस आपले दोन पाहरेकरी क्रॅटॉस आणि बिया यांच्या समवेत प्रॉमेथेउसला बरोबर घेऊन सिथियामधील एका ओसाड कड्याजवळ आला. या खडबडीत कड्याला तिघांनीं मिळून प्रॉमेथेउसला जखडून ठेवलें. त्याला जखडण्यासाठीं त्यांनीं वज्रासारखे अति मजबूत दोर उपयोगांत आणले. या बाबतींतील झ्यूसचे आदेश क्रॅटॉस आणि बिया या दोघांनीं खुषीनें पाळले. परंतु हेफायेस्टसची गोष्ट वेगळी होती. त्याला ही कामगिरी करतांना अतिशय दुःखाच्या वेदना अनुभवाव्या लागल्या.

कारण प्रॉमेथेउस हा त्याचा नातेवाईक होता. आपल्याच नातेवाईकाला वाऱ्यावादळांचे तडाखे खाणाऱ्या त्या कड्याला जखडून ठेवायला तो नाखूष होता. ओसाड प्रदेश. तिथें कुणी माणूस फिरकायचें नाहीं. मानवी प्राण्याचा आवाज तिथें प्रॉमेथेउसला कधींच ऐकायला मिळायचा नाहीं. मानवी प्राण्याचें रूप त्याला तिथें कधींच बघायला मिळायचें नाहीं. अशा परिस्थितींत हा महासामर्थ्यशाली टायटन प्रॉमेथेउस या निर्जन कड्याचा रखवालदार म्हणून राहण्याचें जिणें कायमचा कंठत बसणार, या गोष्टीचें हेफायेस्टसला फार दुःख

होत होतें. परंतु झ्यूस देवाच्या आदेशांपुढें त्याची मात्रा मुळींच चालण्याजोगी नव्हती.

म्हणून शेवटीं त्यानें एकदांचें प्रॉमेथेउसला तिथें पक्कें जखडून टाकलें. त्याचे हात साखळदंडांनीं पक्के बांधून टाकले. असे बांधून टाकले कीं ते अजिबात सोडवितां येऊं नयेत. वज्राची एक धारदार पाचर त्याच्या छातींतून सरळ आरपार ठोकून ठेवली. त्याच्या दोन्ही बगलांवर लोखंडाचे पाश गच्च बसविले. त्याच्या पायांभोंवतीं बेड्या पक्क्या ठोकून दिल्या. इतकें सगळें केल्यावर हेफायेस्टस आणि बिया हे दोघे निघून गेले. क्रॅटॉस मागें राहिला. त्याला प्रॉमेथेउसला उद्देशून एक शेवटचा टोमणा मारायचा होता. म्हणून जातां जातां त्यानें प्रॉमेथेउसला विचारलें: "काय रे, मानव जातीवर तूं येवढे उपकार केलेस, आतां ही मानव जात तुला सोडविण्यासाठीं तुझ्या मदतीला धांवून यायची शक्यता आहे काय? ज्या देवांनीं तुला 'दूर दृष्टीनें विचार करणारा' असं नांव दिलं, ते देव अगदीं मूर्ख होते बघ. कारण आतां तुझ्यासाठीं विचार करायला तुला जास्त वरच्या दर्जाच्या बुद्धीची जरूरी लागेल." असे टोमणे मारून क्रॅटॉसहि निघून गेला.

साखळदंडांनीं जखडलेला प्रॉमेथेउस आतां तिथें एकाकी राहिला. त्यानें वाऱ्यांना हांका मारल्या. सातां समुद्रांना हांका मारल्या. भूमातेला हांक मारली. सूर्याला हांक मारली. तो या सर्वांना उद्देशून म्हणाला: "माझ्याकडे बघा हो. देवदेवताच एका देवाला कसं छळ छळ छळताहेत तें तुम्हीच पाहून घ्या." दैवाचें सामर्थ्य अजिंक्य असल्यामुळें आपल्या वांट्याला जें आलेलें आहे तें आपण शक्य तितक्या उत्तम प्रकारें सोसलेंच पाहिजे हें त्याला मान्य होतें. तरी परंतु तो शरणागति पतकरायला अजूनहि तयार नव्हता. त्यानें आग्रहपूर्वक असें प्रतिपादन चालविलें कीं: "मी कसलाहि गुन्हा केलेला नाहीं. मी जर कांहीं केलं असेल तर तें येवढंच कीं मी मानव जातीवर प्रेम केलं आहे." मग त्याला एकेक जुन्या आठवणी होऊं लागल्या.

देवदेवतांनीं पहिल्या प्रथम क्रॉनॉसच्या राजवटीविरुद्ध बंड उभारून झ्यूसला गादीवर बसवायची योजना कशी तयार केली हें त्याला आठवलें. त्या वेळीं प्राचीन टायटन जमात आणि देवदेवता यांच्यामध्यें समंजस भूमिकेवरून समेट घडवून आणण्यासाठीं प्रॉमेथेउसनेंच प्रयत्नांची शिकस्त केली. त्यांत त्याला

यश आलें नाहीं. तेव्हां आणखी होणारे अत्याचार टळावेत म्हणून तो स्वतःच झ्यूस देवाच्या पक्षाला येऊन मिळाला. आणि मग प्रॉमेथेउसच्या सल्ला-मसलतीनुसार वागून झ्यूस देवानें क्रॉनॉसला पदच्युत केलें. एकदां गादीवर आल्यावर मात्र झ्यूस देवानें लहानसहान देवदेवतांना त्यांच्या वांट्याचा सत्तेचा हिस्सा एकेकाला देऊन टाकला, परंतु मर्त्य मानवाकडे अजिबात दुर्लक्ष केलें. असें करण्यांत त्याचा अंतिम हेतु हा होता कीं सगळी मानव जात पूर्णपणें नष्टच करून टाकायची आणि तिच्या जागीं झ्यूस देवापुढें लोटांगण घालणारी व त्याचा प्रत्येक शब्द शिरसावंद्य मानून झेलणारी नवी जात निर्माण करायची.

या हृदयशून्य योजनेला विरोध केला तो सगळ्या देवदेवतांपैकीं एकट्या प्रॉमेथेउसनें. केवळ त्याचेंच धैर्य, त्याचीच हिंमतबाज कृति, मानवाचा बचाव करायला उपयोगी पडली. केवळ त्याच्याच प्रभावामुळें हें घडलें. नाहीं तर मानव जात हेडीजमधील (पाताळ लोकांतील) अत्यंत खोल अशा काळ्याकुट्ट गर्तेत साफ गाडली गेली असती आणि तिचें नांवनिशाणहि या भूतलावर राहिलें नसतें. त्यानेंच मानवाला आपल्या हृदयांत आंधळ्या आशा-इच्छा-आकांक्षांची जागृति करण्याचें शिक्षण दिलें; त्यानेंच मानवाला अग्नि मिळवून दिला. या सगळ्या गोष्टी ज्या आपण करत आहोंत, त्यांचें महत्व त्याला समजत होतें. आणि म्हणूनच तो हीं सगळीं पापें करायला खुषीनें तयार झाला.

प्रॉमेथेउसचा भाऊ ओसियानस हा त्याला त्या ओसाड कड्यावर भेटायला आला. बंधुप्रेम आणि नात्याची भावना यांच्यामुळें त्याला मदत देऊं करण्याची प्रेरणा झाली. पण आल्याबरोबर प्रथम त्यानें प्रॉमेथेउसला उपदेशाचे डोस पाजायला सुरवात केली. झ्यूस देवाच्या संतापाला तोंड देण्यासाठीं त्यानें त्याला पड खाण्याचा सल्ला दिला. परंतु प्रॉमेथेउसनें आपली स्वाभिमानाची व आव्हानाची भूमिका कायमच ठेवली. त्यानें आपल्या भावाची मदत घेण्यास स्पष्ट शब्दांत नकार दिला. तो ओसियानसला म्हणाला : "अरे, तूं माझ्यासारख्या बंडखोराविषयीं सहानुभूति दाखवतोस हें सारं ठीक आहे. परंतु तुझ्या या धोरणाचा जर देवांना पत्ता लागला तर ते तुलाच भयंकर शिक्षा करतील त्याची वाट काय? म्हणून तूं असल्या भानगडींत बिलकुल पडूं नकोस. माझं मी सोसतों आहे. त्यांत आणखी तुला माझ्यापायीं त्रास कशाला?" त्याचा हा

युक्तिवाद ओसियानसला पटला आणि त्यानें मोठ्या दुःखानें आपल्या भावाचा निरोप घेतला.

पुन्हां प्रॉमेथेउसला जुन्या आठवणी होऊं लागल्या. एक काळ असा होता कीं त्या वेळीं मानवी प्राण्याला भाषाच नव्हती. तो सगळ्या बाबतींत अगदीं अज्ञानी होता. प्रॉमेथेउस भूतलावर आला आणि त्यानेंच मानवाला ताऱ्यांचे उदय आणि अस्त कसे होतात हें शिकविलें; आंकडे शिकविले; अक्षर-ओळख करून दिली; भारवाहक पशूंचा उपयोग कसा करून घ्यायचा याचें ज्ञान दिलें; जहाजांचा उपयोग काय असतो याची माहिती दिली; रोग बरे कसे करायचे, सुख कसें मिळवायचें, दबा धरून बसलेल्या दुष्ट प्रवृत्तीचा फडशा कसा पाडायचा, हें सारें त्यानें मानवाला शिकविलें; पृथ्वीच्या पोटांतून लोखंड, चांदी, तांबें व सोनें या धातू बाहेर काढून त्यांतून संपत्ति कशी निर्माण करायची हें त्यानेंच मानवाला शिकविलें.

म्हणून या वेळीं आपल्याला कितीहि हालहाल भोगावे लागत असले तरी आपणच सगळ्या कला मानवाला शिकविल्या या आठवणीनें प्रॉमेथेउसला धन्यता वाटली.

तेवढ्यांत इयो नामक एक तरुणी जिथें प्रॉमेथेउसला जखडून ठेवलेलें होतें त्या ठिकाणीं आली. तिला गाईचें रूप मिळालेलें होतें आणि एक गोमाशी तिला एकसारखी चावून त्रास देत होती. ही इयो म्हणजे इनाकस या नदी-देवाची कन्या होती. झ्यूस देवाचें तिच्यावर प्रेम होतें. झ्यूसची पत्नी हेरा हिच्या मनांत या तरुणीविषयीं असूया उत्पन्न झाली आणि तिनें या इयोली गाईचें रूप दिलें व शंभर डोळे असलेला राक्षस आर्गस याला तिच्यावर पाळत ठेवण्यासाठीं नेमला. झ्यूसनें या आर्गसला ठार मारून टाकलें. तेव्हां मग हेरानें एक गोमाशी इयोला चावे घेण्यासाठीं धाडून दिली आणि या गोमाशीच्या तावडींतून सुटण्यासाठीं इयो साऱ्या पृथ्वीभर भटकत सुटली.

प्रॉमेथेउसनें इयोची समजूत घातली. त्यानें तिचें भविष्य वर्तविलें. तो म्हणाला : "इयो, तूं अशीच भटकत भटकत पृथ्वीच्या अगदीं कडेच्या टोंकाला जाऊन पोंचशील. मग झ्यूस देव तुला पुन्हां तुझं मानवी स्वरूप परत मिळवून देईल. त्यानंतर झ्यूस देवाबरोबर तूं सुखानं कालक्रमणा करशील आणि त्याच्याकडून तुझ्या पोटीं एपाफस हा पुत्र गर्भवास करील." इयो खूष झाली

आणि जायला निघाली. ती जाण्यापूर्वी त्यानें स्वतःविषयींचें भविष्यहि तिला सांगून टाकलें. तो म्हणाला : "माझी सोडवणूक कोण करणार आहे तुला ठाऊक आहे ? हर्क्युलीस मला या यमयातनांतून सोडवील. माझ्या हृदयाचे नि मुख्य मुख्य अवयवांचे लचके तोडायला येणाऱ्या गरुडाला तो आपल्या धनुष्यबाणानें ठार मारून टाकील."

झ्यूसचा जासूद हर्मीज हा तिथें प्रॉमेथेउसला भेटायला आला. तो म्हणाला : "अरे ! तुझ्यावर झ्यूस देव आतां आणखीच संतापलेला आहे. तो तुला याहूनहि भयंकर अशा हालअपेष्टा भोगायला लावणार आहे. तूं काय समजलास ? आतांपर्यंत तुझा जो छळ झाला तो कांहींच नव्हे. याच्याहिपेक्षां तुझा अनन्वित छळ करण्याचं झ्यूस देवानं ठरवलं आहे, आणि तेंच मी तुला सांगायला आलोंय." परंतु त्याच्या या धमकावण्यांचा प्रॉमेथेउसवर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. त्यानें हर्मीजची हेटाळणी केली. तो म्हणाला : "अरे हर्मीज, देवांच्या दरबारांत तुझी किंमत ती काय ! तूं तर त्यांचा एक क्षुद्र चाकर आहेस. तुझ्या सारख्यांच्या बडबडीला मी मुळींच भीक घालणार नाहीं."

अकस्मात पृथ्वीच्या पोटांतून प्रचंड गडगडाटासारखे आवाज निघूं लागले. त्यांच्या जोडीला आकाशांत विजांचा चमचमाट सुरू झाला. मेघांच्या मोटमोठ्या गर्जना ऐकूं येऊं लागल्या. वादळी वारे सोसाट्यानें वाहत सुटले. जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. कारण झ्यूसनें कोपाविष्ट होऊन प्रॉमेथेउसला जखडणाऱ्या खडकावर आपल्या वज्राचा प्रहार केला आणि त्या खडकाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडविल्या. त्याबरोबर प्रॉमेथेउस तिथून थेट पृथ्वीच्या पोटांतील एका काळ्याकुट्ट अंधारमय गुहेंत फेंकला गेला. देवांना धुडकावून लावणारा अग्निवाहक प्रॉमेथेउस याची ही अशी भयंकर दुर्दशा झाली.

## प्रॉमेथेउस अन्बाउन्ड : मानवहितकर्त्या राक्षसाची मुक्तता

*वाङ्मयप्रकार :* काव्य. *लेखक :* पर्सी बिश शेले ( १७९२-१८२२ ). *कथानकाचा प्रकार :* भावपूर्ण नाटक. *काळ :* अतिप्राचीन काळ. *स्थळ :* आशिया. *प्रथम प्रकाशन :* १८२०.

*प्रमुख पात्रें :* **प्रॉमेथेउस**, टायटन जमातींतला एक महासामर्थ्यशाली

वीर. **पृथ्वी**, त्याची माता. **आशिया**, त्याची पत्नी. **ज्युपिटर**, देवांचा राजा. **डेमॉगॉरगॉन**, देवांवर अधिराज्य गाजविणारा सर्वसत्ताधीश. **मर्क्युरी**, देवांचा जासूद. **हर्क्युलीस**, सद्गुण आणि सामर्थ्य यांचा मूर्तिमंत अवतार असा वीर पुरुष. **पॅन्थिया**, आणि **आयोने**, सागर-देव ओसियानस याच्या दोघी कन्या—ओसियानाइडीज.

*समीक्षण :* कवीनें या काव्याला भावपूर्ण नाटक असें नामाभिधान दिलें आहे. तथापि या कवितेंत नाट्यापेक्षां भावपूर्णता अधिक आढळते. मात्र कवि शेले यानें ग्रीक नाटकांचा जो अभ्यास केला त्यांतूनच त्यानें ही अशा घाटाची काव्यनिर्मिति केली. यांतील पात्रेंहि ग्रीक पुराणांतूनच घेतलेलीं आहेत. मानव जातीच्या सगळ्या दुःखांचा परिहार करणारी एकमेव हेमगर्भ मात्रा म्हणजे विश्वव्यापी प्रेम हीच होय, या विचाराचा परिपोष नाट्य आणि काव्य अशा संयुक्त माध्यमांच्या द्वारां शेले या काव्यकृतीमध्यें आपल्यापुढें सादर करतो. शेलेचें तत्वज्ञान समजून घ्यायला "प्रॉमेथेउस अन्बाउन्ड?" हें काव्य अगदीं हुकुमी गुरुकिल्ली म्हणून उपयोगी पडणारें एक मौल्यवान साधन असून शिवाय एक कलाकृति म्हणून देखील त्याचा आस्वाद सतत घ्यावासा वाटतो.

*कथानक :* मानव जातीचा उपकारकर्ता अग्निवाहक प्रॉमेथेउस या प्रचंड शक्तिशाली टायटनच्या महान सामर्थ्याचा देवाधिदेव ज्युपिटर याला अतिशय हेवा वाटला. म्हणून ज्युपिटरच्या आदेशानुसार त्याला एका खडकाळ कड्याला जखडून ठेवण्यांत आलें. त्या ठिकाणीं थोडीं थोडकीं नव्हेत, भरपूर तीन हजार वर्षें प्रॉमेथेउसनें भयकर छळ सोसला. या शिवाय कडक ऊन, थंडीचा कडाका, आणि इतर अनेक हालअपेष्टांची त्याला जी बाधा झाली ती वेगळीच. एक गरुड येऊन झेंपांवर झेंपा घेत त्याच्या काळजाचे लचकेच्या लचके सतत तोडत होता. परंतु छळवादाची इतकी परमावधि झाली असतांना सुद्धां प्रॉमेथेउस अजूनहि ज्युपिटरच्या सामर्थ्याला धुडकावून लावत होता; ताठ मानेनें सारा छळ सोसत होता.

शेवटीं प्रॉमेथेउसनें सागर-देव ओसियानस याच्या दोघी ओसियानाइडीज कन्यका पॅन्थिया आणि आयोनें यांना सांगितलें कीं: "देवाधिदेव ज्युपिटर यानें अगदीं पहिल्या प्रथम ज्या वेळीं माझे हाल हाल करायला सुरवात केली,

त्या वेळीं मी त्याला उद्देशून एक शापवाणी उच्चारली होती. ही शापवाणी तुम्ही दोघी जणी मला पुन्हां म्हणून दाखवा." परंतु त्यानें कितीहि गयांवयां केलें तरी त्या दोघी ओसियानाइडीज त्याला कांहीं एक उत्तरच देईनात. त्याची आई पृथ्वी ही देखील गप्पच राहिली. मग खुद्द देवाधिदेव ज्युपिटर याची एक कल्पनामूर्ति तिथें प्रगट झाली आणि त्या मूर्तीनें ती शापवाणी प्रॉमेथेउसला पुन्हां म्हणून दाखविली. त्या शापवाणीचे शब्द ऐकून घेतल्याबरोबर त्यानें आतां तो शाप रद्दच करून टाकला.

त्यानें असा विचार केला कीं एवीं तेवीं आपण इतकीं हजार वर्षें छळवाद सोसल्यानंतर देखील आपला आत्मा अजून अजिंक्यच राहिला आहे. मग आपण सगळ्या जगाला दुःखमुक्त करण्याचें श्रेय कां घेऊं नये? म्हणून त्यानें अशी इच्छा प्रदर्शित केली कीं कोणत्याहि सजीव वस्तूला कसलीहि पीडा होऊं नये. तोंवर इकडे पृथ्वी आणि त्या दोघी ओसियानाइडीज बहिणी शापवाणी रद्द झाल्याबद्दल शोक करूं लागल्या. कारण त्यांची अशी समजूत झाली होती कीं अखेरीस ज्युपिटरनें प्रॉमेथेउसचा आत्मा जिंकला असला पाहिजे.

मग मर्क्युरी आपल्याबरोबर फ्यूरीज या भयंकर कजाग राक्षसिणी घेऊन तिथें आला. त्यानें प्रॉमेथेउसला सांगितलें कीं "ज्युपिटरचं भवितव्य तुला एकट्यालाच तेवढं ठाऊक आहे. तें काय आहे तें बऱ्या बोलानं चटकन सांगून टाक. तें रहस्य जर का तूं उघड करून सांगितलं नाहींस तर आम्ही तुला आणखी याहूनहि भयंकर यमयातना भोगायला लावूं." आपल्या भवितव्याचें रहस्य आगाऊ समजावून घेऊन आपल्यावर येऊं घातलेलें सर्वनाशाचें संकट टाळायचें असा ज्युपिटरचा डाव होता. कारण त्याला भवितव्याची भलतीच धास्ती बसलेली होती. म्हणून मर्क्युरी म्हणाला: "अरे प्रॉमेथेउस, तूं हें रहस्य चटकन उघड करून सांग. तें तूं सांगतांक्षणीं आम्ही तुझी सुटका करूं." पण प्रॉमेथेउसनें हें रहस्य उघड करून सांगायला साफ नकार दिला.

प्रॉमेथेउसनें येवढें मात्र कबूल केलें कीं ज्युपिटरचें राज्य संपुष्टांत येणार आहे, तो यावच्चंद्र दिवाकरौ देवांचा राजा म्हणून राहणार नाहीं, ही गोष्ट आपल्याला ठाऊक आहे. प्रॉमेथेउस म्हणाला: "ज्युपिटरची राजवट संपेपर्यंत मी आनंदानं सगळ्या हालअपेष्टा भोगायला तयार आहें." फ्यूरीजनीं आपण त्याचे किती भयंकर हाल करूं याचें अत्यंत परिणामकारक वर्णन करून

सांगितलें, परंतु त्यांनीं कितीहि भिवविण्याचा प्रयत्न केला तरी तो मुळींच भ्याला नाहीं. त्याच्या आत्म्यावर आपली अजिबात मात्रा चालत नाहीं हें त्या पुरेपूर जाणून होत्या.

फ्यूरीजनीं त्याला व मानवजातीला वेडावलें. त्यांनीं भूतलावर केवढा भयंकर रक्तपात माजलेला आहे, मानव जातीमध्यें केवढी घोर निराशा पसरलेली आहे, याचे सगळे देखावे त्याच्यासमोर उभे केले. येशू ख्रिस्ताला ज्या शेवटच्या यातना भोगाव्या लागल्या त्या त्यांनीं त्याला दाखविल्या. ख्रिस्तानें मानवांना प्रीतीचा संदेश दिला, त्याच्याकडे मानवी प्राणी कसें दुर्लक्ष करीत आहेत हेंहि त्यांनीं त्याला दाखवून दिलें. जिकडे तिकडे भीतीचें आणि दांभिकतेचें राज्य पसरलेलें असून जुलुमी राजांनीं जगांतलीं राजसिंहासनें बळकावून ठेवलेलीं आहेत हें त्यांनीं त्याला सविस्तर समजावून सांगितलें.

येवढ्यांत यक्षांची एक टोळी तिथें येऊन प्रगट झाली. प्रेम हेंच मानव जातीच्या सगळ्या दुःखांचा परिहार करील असें भविष्य त्यांनीं सांगितलें. प्रेमाचें अधिराज्य पृथ्वीवर आणून दुष्टपणाचें व दुःखाचें राज्य बंद पाडण्याचें कार्य प्रॉमेथेउस करूं शकेल असेंहि भविष्य त्यांनीं वर्तविलें.

यक्षांची टोळी निघून गेल्यावर प्रॉमेथेउसनें प्रेमाची महती मान्य केली. कारण त्याची पत्नी आशिया हिच्याविषयीं त्याला जें प्रेम होतें त्या प्रेमाच्या बळावरच त्याला शरणागति न पतकरतां सगळ्या हालअपेष्टांना तोंड देतां आलें.

इकडे आशिया आपल्या पतीची आपल्यापासून ताटातूट झाल्यामुळें एका सुंदर खोऱ्यामध्यें आकांत करीत एकटीच राहिलेली होती. पॅन्थिया तिला भेटायला आली. आपल्याला पडलेलीं दोन स्वप्नें पॅन्थियानें तिला सांगितलीं. एका स्वप्नांत तिला प्रॉमेथेउस बंधमुक्त झालेला दिसला आणि त्याबरोबर सारें जग मधुर आनंदांत डुंबत असलेलें त्याला दिसूं लागलें. दुसऱ्या स्वप्नांत तिला फक्त एक आदेश पाळायची आज्ञा मिळालेली होती. तेवढ्यांत खोऱ्यामधून प्रतिध्वनि निनादले. आणि तिथल्या शांततेचा भंग झाला. या प्रतिध्वनींनीं आशिया व पॅन्थिया या दोघींना आपल्या मागोमाग चालण्याचा आदेश दिला. त्या आदेशानुसार त्या दोघी त्या प्रतिध्वनींच्या मागोमाग चालूं लागल्या.

त्या प्रतिध्वनींच्या मागोमाग चालत चालत आशिया व पॅन्थिया या दोघी जणी सगळ्या देवांवर अधिराज्य गाजविणारा सर्वसत्ताधीश डेमॉगॉरगॉन

याच्या राज्यांत येऊन पोंचल्या. त्या प्रथम एका खडकाच्या शिखरावर थांबल्या. परंतु यक्षांनीं त्यांना खुणा करून खालच्या अंगाला डेमॉगॉरगॉन याच्या गुहेंत शिरण्यास पाचारण केलें. तिथें डेमॉगॉरगॉन त्यांना म्हणाला: "तुम्ही मला कोणतेहि प्रश्न विचारा. मी तुम्हांला त्यांचीं उत्तरं देईन." त्यांनीं विचारलें: "ही सजीव सृष्टि कोणी निर्माण केली?" तो उत्तरला: "ती परमेश्वरानें निर्माण केली." मग त्यांनीं विचारलें: "हें जें दुःख असतं आणि हा दुष्टपणा चालतो, त्यांची निर्मिति कोणी केली?"

तसें पाहिलें तर प्रॉमेथेउसनें मानव जातीला ज्ञानाची देणगी दिलेली होती. परंतु विज्ञानाच्या या सगळ्या देणग्या हाताशीं असून देखील मानवजातीला दुष्ट प्रवृत्तीचा नायनाट करायचें जमलें नाहीं. म्हणून त्या दोघांनीं विचारलें: "या सगळ्या आपत्तींचा उगम म्हणजे ज्युपिटर हाच तर नसेल? मानवावर दुष्टपणाचं अधिराज्य गाजविणारा म्हणजे हा ज्युपिटरच ना?"

डेमॉगॉरगॉन उत्तरला: "जें जें कांहीं दुष्ट प्रवृत्तींच्या उपयोगी पडत असेल, तें तें अधिराज्य मुळींच गाजवूं शकत नाहीं. कारण अमर प्रेम हेंच सर्वांवर अधिराज्य गाजवितें." मग आशियानें विचारलें: "प्रॉमेथेउसला स्वातंत्र्य केव्हां मिळेल? ज्युपिटरला जिंकायसाठीं तो जगांत प्रेमाचं राज्य केव्हां घेऊन येईल?" मग डेमॉगॉरगॉननें त्या दोघींना कालमापक तास एकामागून एक जात आहेत ते दाखविले. एक भयंकर तास गेला; तो ज्युपिटरच्या पदच्युतीचा निदर्शक होता. त्यानंतरचा दुसरा तास फारच सुंदर होता. तो प्रॉमेथेउसच्या मुक्ततेचा निदर्शक होता. आशिया व पॅन्थिया अशा दोघी जणींनीं या कालमापक तासाची सोबत घेतली. या तासानें आतां यक्षाचें रुप धारण केलेलें होतें. ती आतां आपल्या रथांतून त्या तासाला बरोबर घेऊन मार्गक्रमण करूं लागली. वाटेंत तिला वार्धक्य, प्रौढत्व, तारुण्य, बाल्य, आणी मृत्यु या सगळ्या अवस्था लागल्या आणि ती तशीच एका नव्या स्वर्गात जाऊन पोंचली.

दरम्यान ज्युपिटरनें नुकतेंच थेटिसशीं लग्न केलें. मानवी प्राण्याच्या आत्म्याखेरीज इतर सर्व गोष्टींवर आपली सर्वशक्तिमान सत्ता चालते हें दर्शविण्यासाठीं त्यानें मोठा उत्सव केला. त्याचं हें स्वतःच्या प्रौढीचें प्रदर्शन संपलें असेल नसेल येवढ्यांत डमॉगॉरगॉन तिथें प्रकट झाला आणि त्यानें ज्युपिटरला पदभ्रष्ट करण्याचा निवाडा तिथल्या तिथें देऊन टाकला. झालें.

ज्युपिटरनें दयेची याचना करण्यासाठीं मोठ्यानें आक्रोश केला, परंतु त्याची सत्ता खलासच झाली. त्याचा जो अधःपात झाला, त्यासरशीं तो खालीं, खालीं, काळोखांतून सर्वनाशाच्या गर्तेंत खोल खोल रुतत गेला.

त्याच वेळीं हर्क्युलीस चाल करून प्रॉमेथेउसजवळ गेला. आशिया, पॅन्थिया, यक्षरूप धारण केलेला कालमापक तास आणि भूमाता यांच्या समक्ष प्रॉमेथेउस बंधमुक्त झाला. प्रॉमेथेउसच्या आनंदाला उधाण आलें. आपण आपलें उरलेलें आयुष्य एकमेकांच्या सहवासांत प्रेमानें कसें घालवूं याचें कल्पना-चित्र त्यानें आशियासमोर रंगविलें. मग त्यानें यक्षरूप धारण केलेल्या कालमापक तासाला सांगितलें: "जा रे. माझी मुक्तता झाल्याचं शुभ वर्तमान साऱ्या मानव जातीसमोर जाहीर कर." त्यानें भूमातेचें चुंबन घेतलें. आणि पृथ्वीवरच्या प्राणिमात्रांमध्यें, वनस्पतींमध्यें आणि सप्त धातूंमध्यें प्रेमाचा संचार झाला. सर्वांभूतीं प्रेमभाव भरून राहिला.

आशियाला घेऊन प्रॉमेथेउस जिथें राहत होता, त्या गुहेंत पृथ्वीची कल्पनामूर्ति येऊन हजर झाली. मानव जातीमध्यें काय काय परिवर्तनें घडून आलीं आहेत याची सगळी हकीकत या कल्पनामूर्तीनें त्या दोघांना निवेदन केली. संताप, चढेलपणा, निष्ठेचा अभाव, हे आणि इतर सगळे मानवाच्या वृत्तींतले हीन विकार विलयाला गेले. इतर अनेक जे अजब प्रकार घडले ते यक्षरूप घेतलेल्या कालमापक तासानें निवेदन केले. राजसिंहासनें ओस पडलीं. प्रत्येक मानव स्वतःपुरता राजा झाला. गुन्हेगारी व दुःख यांतून मानवाला मुक्तता मिळाली. परंतु अजूनहि मानवाच्या ठिकाणीं तीन मोठ्या उणीवा शिल्लक होत्या. त्या म्हणजे योगायोग, मृत्यु, आणि परिवर्तनशीलता. त्या जर नसत्या तर त्यानें जगांतील आपल्या नियत स्थानावरून केवढ्या तरी उंच भराऱ्या मारल्या असत्या.

मागाहून पॅन्थिया व आयोने या दोघींच्या दिव्य दृष्टीसमोर एक देखावा उभा राहिला. जगांतील सगळ्या अनिष्ट गोष्टी कशा मरण पावून सडत पडलेल्या आहेत हें त्यांना या देखाव्यामध्यें दिसलें. पृथ्वीला मिळत असलेल्या सुखाला तर मर्यादाच नव्हती. या गोष्टीची जाणीव चंद्राला देखील आली. कारण चंद्रलोकांतील उदासवाण्या ओसाड चांद्र पर्वतांवरील बर्फ पृथ्वीवरून येणाऱ्या प्रेमकिरणांच्या प्रभावानें वितळूं लागलें. द्वेष, भय आणि दुःख यांनीं मानवजातीच्या पाठीमागचा आपला ससेमिरा कायमचा सोडून दिला म्हणून

धरित्रीला अपार आनंद झाला. मानव आतां आपल्या भवितव्याचा धनी झाला. पृथ्वीच्या पोटांतील सगळीं रहस्यें आतां त्याच्या कह्यांत आलीं.

## कालिटी स्ट्रीट

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जेम्स एम्. बॅरी ( १८६०-१९३७ ). *कथानकाचा प्रकार :* शिष्टाचारांवर आधारलेली सुखान्तिका. *काळ :* नेपोलियन-युगांतील युद्धांची धामधूम. *स्थळ :* इंग्लंडच्या राजधानीपासून दूर अशा परगण्यांतील एक खेडें. *पहिला प्रयोग :* १९०२.

*प्रमुख पात्रें :* **मिस फोएबी थ्रॉस्सेल**, एक प्रौढ कुमारिका. **मिस सूसन थ्रॉस्सेल**, तिची बहीण. **व्हॅलेन्टिन ब्राउन**, याच्यावर फोएबीचें प्रेम असतें.

*समीक्षण :* युद्धकाळांत प्रेमांत सांपडलेले दोन प्रेमी जीव एकमेकां-पासून दहा वर्षें दुरावतात व या मुदतींत उभयतांमध्यें बाह्यात्कारीं बदल होतो. अशा प्रेमिकांच्या प्रश्नाबाबत फारशी भेदक नसली तरी तीव्र टीका या नाटकांत सादर केलेली आढळते. नायिका आपल्या प्रियकराला ताळ्यावर आणण्यासाठीं कसा यशस्वी प्रयत्न करते, यावरच नाटकांतील बहुतेक घटना आधारलेल्या आहेत. सबंध नाटकामध्यें नाट्यात्मक उपरोधाचें हत्यार बॅरीनें चांगल्याच परिणामकारक रीतीनें वापरलेलें आढळतें. आणि लहानशा खेड्यांतील लोकांच्या जीवनामध्यें खासगीपणा अत्यल्प प्रमाणांत कसा असतो याचें दिग्दर्शन चांगल्याच हास्यकारक रीतीनें केलेलें दिसतें.

*कथानक :* नेपोलियन-युगांतील युद्धांच्या काळांत फोएबी व सूसन थ्रॉस्सेल या दोघी बहिणी इंग्लंडमधील राजधानीपासून दूर अशा एक परगण्यां-तील खेड्यांत क्वालिटी स्ट्रीट नामक रस्त्यावरील एका लहानशा घरांत राहत होत्या. दोघीहि अविवाहित. दोघीहि स्वरूपसुंदर. एके दिवशीं दोघींनीं निळ्या व पांढऱ्या रंगांनीं सुशोभित केलेल्या आपल्या सुंदर दिवाणखान्यांत भरतकाम करणाऱ्या महिलांना उपाहार दिला. त्या वेळीं हजर असलेल्या एका महिलेनें गांवांत पसरलेली एक अफवा सांगितली. गांवांतल्या एका सद्गृहस्थानें लढाईवर जाण्यासाठीं आपलें नांव लष्करांत नोंदविलें आहे अशी ती अफवा होती. हा सद्गृहस्थ कोण असावा याचें रहस्य सगळ्यांनाच कळायला हवें होतें.

फोएबी आपल्या बहिणीला म्हणाली : “ दोन वर्षांपूर्वी आपल्या गांवीं राहायला आलेले तडफदार डॉक्टर व्हॅलेन्टाइन ब्राऊन हे तुला ठाऊक आहेतच. ते मला रस्त्यांत भेटले. माझ्या बरोबर रस्त्यांतून चालले. मला कांहीं तरी महत्वाची गोष्ट सांगायचा त्यांचा विचार त्यांनीं मला बोलून दाखविला. मी घरींच चाललयें होत्यें. रात्रीं झोंपीं जायची वेळ होती. मी त्यांना ‘ आमच्या घरीं या नि काय तें सांगा ’ असं म्हणाल्यें. ”

दोघी बहिणी असें गृहीत धरून चालल्या कीं डॉ. ब्राऊन जो येणार तो फोएबीला लग्नाची मागणी घालायला येणार. हा निष्कर्ष तसा संभवनीयहि होता. कारण या दोघींनीं शिल्लक ठेवलेले पैसे डॉ. ब्राऊननें एका धंद्यांत गुंतविले आणि तो धंदा बुडाला. म्हणून या दोघींच्या हिताची जबाबदारी आपल्यावर आहे असें त्याला वाटणें साहजिकच होतें. त्याच्याकडून ही लग्नाची मागणी येणारच असें गृहीत धरून सूसननें आपली बहीण फोएबी हिला एक लगीन-साडा भेटी दाखल दिला. हा लग्नाचा पोशाख सूसननें स्वतःच्या लग्नांत घालण्यासाठीं तयार केलेला होता. परंतु नंतर तें लग्न कधींच न झाल्यामुळें तो तसाच पडून होता.

परतु डॉ. ब्राऊननें लग्नाबद्दल फोएबीजवळ एक अवाक्षरहि काढलें नाहीं. तिची घोर निराशा झाली. आपली भयंकर मानखंडना झाली असें तिला वाटलें. लग्नाच्या मागणी ऐवजीं त्यानें निराळीच गोष्ट सांगितली. तो म्हणाला : “ लढाईवर जाण्यासाठीं ज्या गृहस्थानं लष्करांत नांव दिलंय असं गांवांतले लोक बोलतात ना, तो गृहस्थ मीच. तुम्हां दोघी बहिणींविषयीं मला फार आपलेपणा वाटतो. तुमचा हा निळ्या-पांढऱ्या रंगांनीं सजवलेला छोटासा दिवाणखाना मला फार आवडतो. ” इतकें सगळें चऱ्हाट त्यानें वळलें, पण फोएबीनें त्याला अगोदरच आपलें अंतःकरण देऊन टाकलें असतांना देखील तो तिच्याविषयीं आपल्याला कसलीहि प्रेमभावना असल्याचें सूचित देखील करीना.

उलट पक्षीं फोएबीनेंच उपरोधिकपणें आपली निराशा त्याच्या जवळ उघड करून दाखविली. ती म्हणाली : “ मला तर असं वाटल कीं तुम्ही आपलं लग्न ठरल्याची बातमी आम्हांला सांगायला आले असाल. आणि ही भाग्यवान

तरुणी कोण असेल, तिचं नांव तरी आम्हांला कळावं याबद्दल आम्हांला कुतूहल वाटत होतं. पण तुम्ही त्यांतलं कांहींच सांगितलं नाहीं. "

तशा दोघी बहिणी मोठ्या स्वाभिमानी होत्या. आपण डॉ. ब्राऊनच्या धंद्यांत घातलेले सगळे पैसे बुडाल्यामुळें आपण जवळ जवळ सर्वस्व गमावून बसलों आहोंत याची त्यांनीं त्याला अजिबात दखल दिली नाहीं. त्यांनीं आपल्या घरींच एक शाळा चालू करायची योजना आंखली.

या गोष्टीला दहा वर्षें लोटलीं. सूसन व फोएबी या दोघी अजूनहि ती शाळा चालवीत होत्या. शिक्षकिणी या दृष्टीनें त्यांच्यांमध्यें अनेक उणीवा असून देखील त्यांची शाळा भरभराटीस आलेली होती. त्यांच्यावर मोठ्या मुलांचें प्रेम असलें तरी या मुलांना त्यांच्याविषयीं आदर जवळ जवळ मुळींच वाटत नव्हता. नृत्य म्हणा, आणि सभ्य सुसंस्कृत जीवनाला लागणाऱ्या अशाच इतर गोष्टी म्हणा, त्या मोठ्या आनंदानें शिकवीत असत. परंतु लॅटिन भाषा शिकवायचा त्यांना भारी तिटकारा वाटे. आणि बीजगणित तर त्यांच्या विद्यार्थ्यांच्या पालकांनीं विनंति केली म्हणजेच त्या शिकवीत असत. त्यांतल्या त्यांत मोठ्या मुलांना चाबकाचे फटके मारायचा तर त्यांना कधीं धीरच करवत नसे. अशा बहुतेक मुलांची उलट त्यांनाच भीति वाटे.

शेवटीं एकदांच्या लढाया संपल्या. वॉटर्लूच्या लढाईचा विजयोत्सव लोक सगळीकडे साजरा करीत होते. त्या रात्रीं क्वालिटी स्ट्रीटवर एका ग्रामीण नृत्यसमारंभाची तयारी करण्यांत सगळे गांवकरी गढून गेलेले होते. फक्त सूसन आणि फोएबी या दोघीच तेवढ्या या तयारींत भाग घेत नव्हत्या. फोएबी घरांत नव्हती. येवढ्यांत कॅप्टन व्हॅलेन्टाइन ब्राऊन आपल्या जुन्या मैत्रिणींना भेटायला त्यांच्या घरीं आला. युरोपच्या रणांगणावरील एका लढाईत त्याचा डावा हात तुटून गेलेला होता. त्या घरांत येऊन तो पाहतो तों तिथला निळ्या-पांढऱ्या रंगांनीं सुशोभित केलेला आनंददायक दिवाणखाना त्याला जाग्यावर दिसेना. यामुळें त्याची चांगलीच निराशा झाली. त्यानें मिस सूसनला अभिवादन केलें आणि 'कुरळ्या केसांची व नाचऱ्या डोळ्यांची फोएबी ताई कुठं आहे?' अशी चौकशी केली. आपल्याला तिची भेट घ्यायला हवी आहे असें त्यानें सांगितलें. तेवढ्यांत फोएबी घरीं परत आली.

परंतु फोएबीच्या रूपांतील परिवर्तन बघून कॅप्टन ब्राऊन चकितच झाला.

हें आश्चर्य त्याला लपवूनहि ठेवतां आलें नाहीं. आतां फोएबी म्हणजे एक कळाहीन उंदीरतोंडी निबरट कुमारी दिसूं लागलेली होती. त्यानें आपल्या मनांत आलेले विचार इतक्या उघडपणें प्रगट केल्यामुळें फोएबीच्या भावना दुखावल्या. त्यांत भरीला भर म्हणजे त्यानंतर त्याच दिवशीं आणखी थोड्या वेळानें तिच्या भावना आणखी दुखावणारा दुसरा एक प्रसंग घडला. तिचा एक माजी विद्यार्थी आणि आतां लष्करांत हुद्देदार असून नुकताच लढाईवरून परत आलेला एन्साइन ब्लेड्स यानें तिला आपल्याबरोबर नृत्यसमारंभाला हजर राहायला जरबेनेंच सांगितलें. तिला या गोष्टीचा फार विषाद वाटला आणि तिनें हजर राहायला नकार दिला.

परंतु फोएबीचें वय तसें फार नव्हतें झालेलें. ती अवघी तीस वर्षांची होती. त्यांत पुन्हां तिला शिकवायच्या कामाचा अगदीं कंटाळा आलेला होता. तिला सूसननें आणि तिच्या घरची मोलकरीण पॅट्टी या दोघींनीं खूप स्फूर्ति दिली. मग तिनें यथास्थित मेहनत करून आपला कायापालटच करून घेतला. दहा वर्षां-पूर्वीं ती जशी दिसत होती तसें आपलें सगळें रंगरूप तिनें ठीकठाक करून घेतलें. ब्राऊन पुन्हां तिच्या घरीं आला तर त्याला ही फोएबी आहे असें ओळखतां देखील आलें नाहीं. मग दोघी बहिणींनीं त्याला चांगलेंच बनविलें. ही आमची भाची आमच्याकडे आलेली आहे अशी सूसननें थाप ठोकून दिली.

ब्राऊन सपशेल फसला. तो या नव्या "मिस लिव्ही" वर भलताच खूष झाला. त्यानें तिला आपल्याबरोबर नृत्यसमारंभाला येण्याची विनंति केली. "लिव्ही"नें त्याचे केंस पांढरे झाले आहेत याची त्याला आठवण करून देऊन चांगलेंच सतावलें व बेचैन करून सोडलें.

विजयोत्सवानिमित्त नंतर जे नृत्यसमारंभ नि भोजनसमारंभ झाले, त्या प्रसंगीं खेड्यांतल्या सगळ्या तरुणांचीं मनें "लिव्ही"नें जिंकून घेण्याचा सपाटा चालविला. फोएबीला ही जी एकदां फोएबी व एकदां "लिव्ही" अशी दुहेरी भूमिका करायला लागायची, त्यांत येणाऱ्या अडचणींवर अशी तोड निघे कीं फोएबी किंवा "लिव्ही" या दोघींपैकीं एक जण घरीं तरी नसायची किंवा आजारी तरी असायची.

अशाच एका नृत्यसमारंभाच्या वेळीं शेतकऱ्यांनीं "लिव्ही"च्या भोंवतालीं सतत गर्दी केली. परंतु कॅप्टन ब्राऊननें तिची सोबत कांहीं केल्या

सोडली नाहीं. या दोघी बहिणींच्या शेजारीं पाजारीं राहणाऱ्या यांच्याच सारख्या ज्या प्रौढ कुमारिका होत्या, त्यांना या "लिव्ही" प्रकरणाचा संशय येऊं लागला. कुटाळकी करायला मिळावी म्हणून त्या संधि शोधतच होत्या.

त्या कुटाळ शेजारणी समोरच राहत असल्यामुळें या दोघी बहिणींचीं जाणीं येणीं त्यांच्या नजरेंतून सुटत नव्हतीं. नृत्यसमारंभाच्या वेळीं तर त्यांनीं फोएबीची बनवाबनवी उघड करण्याचा अगदीं बेत केलेला होता. परंतु सूसननें दुसऱ्या एका तरुणीला "लिव्ही" चा ओव्हरकोट उसना देऊन बाजू कशीबशी सांवरून धरली.

कॅप्टन ब्राऊननें "लिव्हीला" एकटी गांठून आपलें फोएबीवर कसें प्रेम आहे याची हकीगत सांगितली. तो म्हणाला: "पूर्वी एका काळीं फोएबी जशी दिसत होती, तशीच तूं दिसतेस, तिच्या व तुझ्या तोंडवळ्यांत बराच सारखेपणा आहे म्हणून या नृत्यसमारंभांत तुझ्या प्रेमांत मी सांपडलोंय." परंतु "लिव्ही" पक्की बनेल. तिनें कॅप्टन ब्राऊनला त्याच्या स्वतःच्या वयाची जाणीव करून दिली. ती म्हणाली: "तुम्ही आतां पंचवीस वर्षं वयाचे तरुण राहिलां नाहींत. तुम्हांला ती शांत स्वभावाची, भिडस्त व मागं मागं राहणारी फोएबीच आवडायची. माझ्यावरचं तुमचं प्रेम आपलं वरवरचंच."

शाळेला सुटी झाली. उन्हाळ्याच्या सुटींत दिवाणखान्याची पुन्हां पूर्वीप्रमाणें निळ्या व पांढऱ्या रंगांत सजावट झाली. फोएबीला आपल्या दुहेरी भूमिकेचा कंटाळा आला. तिनें जाहीर करून टाकलें कीं "लिव्ही" आजारी पडली. आणि ती थकल्या भागलेल्या मास्तरणीच्या आपल्या खऱ्या स्वरूपांत वावरूं लागली. तिला भेटायला येणाऱ्या कुटाळ शेजारणीला आणखीच संशय येऊं लागला. कारण "लिव्ही" आजारी म्हणावी, तर तिला तपासायला डॉक्टर कुणीच आलेला दिसला नाहीं. आजाऱ्याच्या खोलींत कुणीच नाहीं असा या कुटाळ शेजारणींनीं जवळ जवळ शोधहि लावला. परंतु त्यांनीं खोलीच्या अर्धवट उघड्या असलेल्या दरवाज्याच्या पलीकडे जाऊन आंत डोकावून बघण्याइतका आगाऊपणा तेवढा केला नाहीं.

त्या दिवशीं कॅप्टन ब्राऊन या दोघी बहिणींच्या घरीं फोएबीला लग्नाची मागणी घालायला आला. दोघी जणी क्षणभर दिवाणखान्याच्या बाहेर गेल्या आहेत अशी संधि साधून त्यानें आजाऱ्याच्या खोलींत प्रवेश केला. बघतो तर

ती रिकामी! मग त्याला मोलकरीण पॅट्टी हिच्याकडून एकंदर हकीकत कळली. ती ऐकून कॅप्टन ब्राऊनला मोठी मौज वाटली. परंतु त्यानें त्यांची ही बतावणी आपल्याला कळून आल्याचें त्यांना मुद्दामच दर्शविलें नाहीं. थोड्या वेळानें "लिव्ही" आजाऱ्याच्या खोलींतून बाहेर आली आणि तिनें आपण खडखडीत बरी झालों असल्याचें सांगितलें. मग "लिव्हीला" वीस मैल अंतरावर तिच्या घरीं पोंचवून यायला आपण तयार आहोंत असें कॅप्टन ब्राऊननें सांगितल्यावर दोघी बहिणी अगदीं सुन्नच झाल्या. त्या घाईघाईनें आपसांत सल्लामसलत करण्यासाठीं दिवाणखान्यांतून जरा बाहेर गेल्या, पण कॅप्टन ब्राऊनला आपल्या रहस्याचा पत्ता लागला आहे हें तेवढ्यांतच त्यांना कळून चुकलें. कारण उशांचा ढीग रचून व त्यांना शाल गुंडाळून तयार केलेल्या "लिव्ही"शीं तो बोलत असल्याचें त्यांना ऐकूं आलें. बाहेर गाडी उभी होती. शेजारचा कुटाळकंपू तिथें काय काय चाललें आहे तें आपापल्या खिडक्यांतून बघत होता. मग त्यानें "लिव्ही"ला गाडींत नेऊन बसविलें. या बनवाबनवीमुळें कुटाळकंपूचें मात्र समाधान झालें.

मिस सूसन थ्रॉस्सलनें आपली भगिनी फोएबी हिचा विवाह कॅप्टन व्हॅलेन्टाइन ब्राऊन याजबरोबर लवकरच होणार असल्याचें जाहीर केलें. शाळा परत चालू करायचें दोघी अजिबात विसरूनच गेल्या.

## द रायव्हल्स

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* रिचर्ड ब्रिन्स्ले शेरिडन (१७५१-१८१६). *कथानकाचा प्रकार :* शिष्टाचारांवर आधारलेली सुखान्तिका. *काळ :* अठरावें शतक. *स्थळ :* बाथ, इंग्लंडमधील एक उत्तम पाण्याचें ठिकाण. *पहिला प्रयोग :* १७७५.

*प्रमुख पात्रें :* **कॅप्टन जॅक ॲब्सोल्यूट,** (एन्साइन बेव्हर्ली), एक तरुण लष्करी अधिकारी; याचें लिडिया लॅंग्विश हिच्यावर प्रेम असतें. **सर ॲन्थनी ॲब्सोल्यूट,** त्याचे वडील. **फॉकलॅंड,** त्याचा स्नेही; याचें ज्युलिया हिजवर प्रेम असतें. **बॉब एकर्स,** एक जमीनदार सरदार. **सर ल्युसियस ओ'ट्रिगर,** एक ज्वलज्जहाल आयरिश गृहस्थ. **लिडिया लॅंग्विश,** एका श्रीमंत घराण्याची

वारसदारीण. **मिसेस मॅलाप्रॉप,** तिची मावशी. **ज्युलिया मेल्व्हिल,** तिची चुलत बहीण.

*समीक्षण :* शिष्टाचारांवर आधारलेल्या ज्या सुखान्तिका इंग्रजी भाषेंत अत्यंत लोकप्रिय झालेल्या आहेत, त्यांमध्यें 'द रायव्हल्स' या नाटकाची गणना होते. स्वभावचित्ररेखाटनामध्यें हें नाटक अत्यंत यशस्वी ठरलें आहे. सगळ्या मोठमोठ्या स्वभावचित्रांचें संमेलनच जसें कांहीं या नाटकांत जमलेलें आढळतें. यांतली मिसेस मॅलाप्रॉप ही व्यक्ति घ्या. शब्दांचा चुकीचा उपयोग करण्यांत हिचा हातखंडा. म्हणून "मॅलाप्रॉपिझम" या नव्या शब्दाची देणगी इंग्रजी भाषेला मिळाली. बॉब एकर्स हा भांडकुदळ जमीनदार सरदार सदोदित आपलेंच घोडें पुढें दामटीत असतो; सभ्य गृहस्थासारखें वागायची याची खटपट चालू असते; बाकी याच्याहि अंगीं लोकांना आपलेपणा वाटण्याजोगें कांहीं तरी आहेच. तशीच ती नायिका, अद्भुतरम्यतेंत रंगून जाणारी लिडिया लॅंग्विश; प्रचलित कादंबऱ्यांतील सगळीं खुळें हिच्या डोक्यांत ठांसून भरलेलीं असतात.

शेरिडननें हें नाटक आपल्या काळांतील आढ्यताखोरी आणि भावनाविवशता यांचा उपहास करण्यासाठीं लिहिलें. हा उपहास आमच्या स्वतःच्या काळालाहि अनेक बाबतींत लागू पडतो.

*कथानक :* स्वरूपसुंदर आणि श्रीमंत तरुणी लिडिया लॅंग्विश हिची बौद्धिक जोगवण अद्भुतरम्य कादंबऱ्यांच्या वाचनावरच झाली. तिच्या मतें ज्याचें समाजांतील स्थान आपल्या स्थानाच्या संपूर्णपणें विरोधी प्रकारचें असेल त्यालाच आपला प्रियकर म्हणून मानणें योग्य ठरत होतें. याच उद्देशानें ती बेव्हर्ले नामक एका निर्धन तरुण एन्साइनच्या प्रेमांत सांपडली. परंतु याच बेव्हर्लेच्या बाबतींत मिसेस मॅलाप्रॉप ह्या तिच्या मावशीनें गंभीर प्रकारचा आक्षेप घेतला. तरुण मिस्टर बेव्हर्लेविषयीं या बाईला येवढा वैरभाव वाटायचें अंशतः कारण म्हणजे या इन्साइननें लिडियाला लिहिलेल्या पत्रांतील तिच्याविषयींचे उल्लेख. मावशीबाईचें वय आणि तिची चर्या यांची खूप चेष्टा करणारा मजकूर या पत्रांतून असे. मिसेस मॅलाप्रॉपबाईना त्या पत्रांतील मजकुरामुळें कधीं कधीं अत्यंत वैताग येई. अशा प्रसंगीं त्या स्वतःला विचारीत: "बेव्हर्लेनं

माझी तुलना राक्षसिणीशीं केलेली आहे. पण मी खरोखरीच तशी दिसत असेन का ?"

खुद्द मिसेस मॅलाप्रॉप ही देखील एका विक्षिप्त आयरिश गृहस्थाच्या इतकी भयंकर प्रेमांत गुरफटलेली होती कीं त्यांतून ती बाहेर पडेल अशी मुळींच आशा नव्हती. या गृहस्थाचें नांव सर ल्युसियस ओ'ट्रिगर. ही स्वारी तिच्या प्रेमाला प्रतिसाद देत होती असें गृहीत धरून चालायचें. वस्तुतः त्यानें तिला कधीं बघितलेलेंच नव्हतें. ती काळी होती का गोरी होती हेंहि त्याला ठाऊक नव्हतें. परंतु या प्रकाराला कारणीभूत होती त्याची एक मोलकरीण. या मोलकरणीनें ओ'ट्रिगर-साहेबाच्या डोळ्यांत चांगलीच धूळफेंक केलेली होती. आपण ज्या रोमँटिक व्यक्तीशीं प्रेमपत्रांची देवघेव करीत आहोंत ती खुद्द लिडियाच आहे अशी या स्वारीची समजूत त्या मोलकरणीनें करून दिलेली होती.

या सगळ्या परिस्थितींत आणखी एक गुंतागुंत झालेली होती. तिचें कारण खुद्द बेव्हर्ले हाच. वस्तुतः हा होता कॅप्टन जॅक ॲब्सोल्यूट. सर ॲन्थनी ॲब्सोल्यूट यांचा पुत्र. खुद्द लिडियाच्या बरोबरीनें श्रीमंत आणि तिच्याच-सारख्या सरदार घराण्यांतला.

परंतु जॅक पडला मोठा धोरणी माणूस. आपल्या स्वतःच्या खऱ्या स्वरूपांत अपण जर रोमँटिक लिडियाचा अनुनय केला तर आपल्याला अजिबात यश मिळणार नाहीं हें त्यानें फार लवकर हेरलें. म्हणून लिडियाच्या सुंदर परंतु मूर्ख डोक्यामध्यें चालू कादंबऱ्यांच्या नायकांविषयींचें जें वेड खच्चून भरलेलें होतें, तसल्याच एका नायकाशीं जवळ जवळ जुळणारी अशी भूमिका त्यानें मुद्दामच धारण केली.

जॅकचा मित्र फॉकलँड याची प्रेम करायची रीत त्याच्या अगदींच उलट प्रकारची होती. तरीहि त्याची अवस्था जॅकपेक्षां अधिक चांगली होती असें मुळींच म्हणतां येण्याजोगें नव्हतें. लिडियाची चुलत बहीण ज्युलिया मेल्व्हिल हिचा रोमँटिक अनुनय या फॉकलँडनें चालविलेला होता. वस्तुतः त्याच्या या प्रेम प्रकरणाची अवस्था जॅकच्या पेक्षांहि अधिक दुर्धर होती असें म्हणायला काय प्रत्यवाय नव्हता. कारण हा फॉकलँड आपण व आपली प्रियतमा यांच्या मीलनामध्यें कसले तरी काल्पनिक अडथळे सतत निर्माण करून ठेवायचा. हें त्याचें धोरण जॅकच्या धोरणाच्या नेमकें उलट होतें. ज्युलिया व फॉकलँड यांची

जराशी जरी ताटातूट झाली तरी त्यांची पुन्हां भेट होईपर्यंतच्या काळामध्यें फॉकलँड म्हणायचा: " आतां ही कसची मला पुन्हां भेटते! हिच्यावर काय काय भयंकर संकटं आलीं असतील, त्यांची मला कल्पना सुद्धां करवत नाहीं. झालं. आमच्या उभयतांच्या प्रेमाचं स्वप्न पार विलयाला गेलं." आणि पुढच्या भेटीच्या वेळीं ती जिवंत नि चांगली धडधाकट आहे असें त्याला आढळून आल्यावर तो म्हणे: " हिचं माझ्यावर प्रेम नसलं पाहिजे. येरव्हीं माझ्याशीं ताटातूट झाली असतांना सुद्धां ही इतकी आनंदांत कशी राहूं शकली असती?"

आपल्या मित्राच्या या अशा हास्यास्पद वागण्यामुळें अखेरीस जॅक ॲब्सोल्यूट याचाहि धीर सुटला आणि ज्युलिया देखील आपल्या प्रियकराच्या निराधार हेवेखोरीला जराशी कंटाळली. आणि प्रेमाच्या या विचित्र गुंतागुतीनें अरिष्टाची अगदीं परमावधि गांठली ती सर अँन्थनी ॲब्सोल्यूट यांनीं आपल्या मुलाला सांगितलेल्या बातमीनें. ते जॅकला म्हणाले: " तुझ्यासाठी वधू म्हणून मी एक मुलगी पसंत करून ठेवली आहे. जर का तिच्याशीं लग्न करायला नकार दिलास, तर याद राख; माझ्या इस्टेटींतून तुला एक पेनीहि मिळायचा नाहीं असा बंदोबस्त करून मी तुझा संबंधच तोडून टाकीन."

आपल्या वडिलांनीं आपल्यासाठीं कशा प्रकारची वधू निवडून काढली असेल याची बिचाऱ्या जॅकला काडीइतकीहि कल्पना येईना. ती कोण असेल याचा त्याला थांगपत्ताच लागेना. एखादी श्रीमंत घरगुती वळणाची वारसदारीण आपल्या इच्छेविरुद्ध आपले वडील आपल्यावर लादण्याच्या विचारांत आहेत अशी कल्पना करून घेऊन जॅकनें वडिलांविरुद्ध बंडाचा झेंडा उभारला. त्यानें जाहीरच करून टाकलें कीं " परिणाम कांहींहि होवोत. माझ्या वडिलांनीं पसंत केलेल्या वधूकडे मी ढुंकून देखील बघणार नाहीं."

सर अँन्थनी ॲब्सोल्यूट हे तसे मोठे रसिक गृहस्थ होते. स्वतःच्या तरुणपणीं सुंदर स्त्रियांची त्यांना चांगलीच पारख होती. आणि आतां म्हातारपणीं देखील सुंदरींच्या आकर्षणाचा त्यांच्यावर अजिबात परिणाम होत नव्हता अशांतलाहि प्रकार नव्हता. आपल्या मुलावर एखादी दिसायला सुमार अशी पत्नी लादावी असा त्यांचा विचार मुळींच नव्हता. खरी गोष्ट अशी होती कीं मिसेस मॅलाप्रॉप हिच्याशींच त्यांनीं तिची भाची आपल्या मुलाला करून घेण्याचा करार पक्का केलेला होता. या करारामुळें मिसेस मॅलाप्रॉप देखील

आपल्या परीनें खूष झाली. कारण बेव्हर्लेशीं लग्न करण्याचा मूर्खपणा करायला लिडियाला आतां वावच राहिला नाहीं. या संकटांतून लिडिया आपोआप वांचली म्हणून तिचा आनंद गगनांत मावेना. परंतु जॅकनें जेव्हां आपण स्वतः पसंत न केलेल्या कोणत्याहि मुलीशीं लग्न करायचें साफ नाकारलें तेव्हां सर ॲन्थनी यांच्या संतापाला सीमाच राहिली नाहीं. "वधू कशीहि असली तरी हें लग्न झालंच पाहिजे" असा आपला ठाम निश्चय त्यांनीं जाहीर केला.

परंतु योगायोग असा कीं सर ॲन्थनी यांनीं आपली सून म्हणून पसंत केलेली मुलगी लिडिया लॅंग्विश हीच आहे याचा पत्ता जॅकला लागला. म्हणजे एन्साइन बेव्हर्ले असें सोंग घेऊन जिचा अनुनय आपण स्वतःच करीत होतों तीच आपली वधू होणार हें त्याला कळून चुकलें. मग त्यानें आपला पवित्रा एकदम बदलला. "तुम्हीं माझ्यासाठीं जी कोण वधू पसंत केलेली असेल तिच्याशीं मीं खुषीनें लग्न करायला तयार आहें," असें त्यानें आपल्या वडिलांना आश्वासन देऊन टाकलें. जॅक असा एकदम सुतासारखा सरळ कसा आला, याचें सर ॲन्थनी यांना जरा कोडेंच पडलें. त्यांना संशय आला, आणि जराशी काळजीहि वाटूं लागली. तरी परंतु त्यांनीं आपला मुलगा व त्याची भावी वधू यांची भेट करून देण्याची व्यवस्था केली. आतां यामुळें मात्र जॅकसमोर एक सरळ पेंचप्रसंग उभा राहिला.

लिडियासमोर जर आपण सर ॲन्थनी ॲब्सोल्यूट यांचा मुलगा म्हणून हजर झालों तर ती आपल्याला नक्कीच धुडकावून लावील हें जॅकच्या ध्यानांत येऊन चुकलें. शेवटीं यांतून त्यानें एक तोड काढली. या तथाकथित एन्साइन बेव्हर्लेनें लिडियाची भेट घेऊन तिला अशी थाप सांगितली: "हें बघ, तुझ्या मावशीच्या घरीं यायला मिळावं म्हणून मी जॅक ॲब्सोल्यूट आहे अशी मला बतावणी करणं भाग आहे."

लिडियाला आणखीहि एका स्थळाकडून मागणी आलेली होती. या गृहस्थाचें नांव होतें बॉब एकर्स. हा एक श्रीमंत जमीनदार सरदार होता आणि सर ॲन्थनीचा हा शेजारीच होता. आपण शहरी चालीरीतींचा माणूस म्हणून समाजांत चमकावें अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. सर ॲन्थनी आपल्या मुलासाठीं मिसेस मॅलाप्रॉपकडे तिच्या भाचीला मागणी घालायला येण्यापूर्वी मावशीबाईनें बॉब एकर्स हा लिडियाला एक बऱ्यापैकीं वर आहे असें मनांत

योजून ठेवलें होतें. एन्साइन बेव्हर्ले हा आपला प्रतिस्पर्धी आहे हें जेव्हां एकर्सच्या निदर्शनास आलें तेव्हां त्याची घोर निराशा झाली. एकर्सचा मित्र सर ल्युसियस ओ ' ट्रिगर यानें त्याला उत्तेजन दिलें आणि त्याच्या जोरावर एकर्सनें बेव्हर्लेला द्वंद्व युद्धाचें आव्हान दिलें. पण त्यानें बेव्हर्लेला कधीं पाहिलेंच नव्हतें. म्हणून बेव्हर्लेचा स्नेही जॅक ॲब्सोल्यूट याच्या मार्फत हें आव्हान रवाना झालें.

जॅकच्या प्रेमप्रकरणांतील मोठें अरिष्ट म्हणजे आपल्या वडिलांसमवेत लिडियासमोर जाणें त्याला भाग पडणें हें होतें. या वेळीं त्याचें खरें स्वरूप उघड झालें, आणि त्यामुळें एका निर्धन एन्साइन बरोबर पळून जाण्याचें स्वप्न-रंजन लिडिया करीत होती, त्या तिच्या स्वप्नांचा चक्काचूर झाला. तिनें जॅकला स्पष्ट नकार दिला आणि आयुष्यांत पुन्हां त्याचें तोंड पाहायचें नाहीं अशी प्रतिज्ञा केली. अशा रीतीनें आपली तडकाफडकीं बोळवण झाल्यामुळें जॅकचा भयंकर हिरमोड झाला. म्हणून त्याच तिरीमिरीच्या भरांत सर ल्युसियस ओ ' ट्रिगर याचें दुसऱ्या द्वंद्व युद्धाचें आव्हान त्यानें स्वीकारून टाकलें. त्याच दिवशीं संध्याकाळीं सहा वाजतां किंग्ज मीड फील्ड्स या ठिकाणीं हें द्वंद्व युद्ध सर ल्युसि-यसनें ठरवून टाकलें. कारण त्याच ठिकाणीं व त्याच वेळीं कुणा एन्साइन बेव्हर्ले याजबरोबर त्याचा मित्र एकर्स याचें द्वंद्व युद्ध व्हायचें होतें आणि तो एकर्सचा पुरस्कर्ता म्हणून तिथें हजर राहणारच होता.

आपल्या पायीं जॅक द्वंद्व युद्धाला तयार झाला हें कळतांक्षणीं लिडियाची त्याच्याविषयींची वृत्ति एकदम पालटली. तिच्या दृष्टीनें तो आतां वेगळाच माणूस झाला, आणि कसेंहि करून तें द्वंद्व युद्ध थांबविलें पाहिजे म्हणून ती आपल्या मावशीला बरोबर घेऊन किंग्ज मीड फील्ड्स या ठिकाणीं घाईघाईनें जाऊन पोंचली. दरम्यान ल्युसियस ओ ' ट्रिगरनें द्वंद्व युद्धांविषयींच्या एकेक रक्तपाती कहाण्या सांगून एकर्सला चांगलें घाबरवून सोडलें. याचा परिणाम असा झाला कीं आपला प्रतिस्पर्धी दुसरा तिसरा कोणी नसून आपला जुना स्नेही जॅक ॲब्सोल्यूट हाच आहे अशी ओळख पटतांक्षणीं त्यानें सुटकेचा स्पष्ट निश्वास सोडला. द्वंद्व युद्धाचा कार्यक्रम कुठच्या कुठें गडपच झाला.

लिडिया आणि मिसेस मॅलाप्रॉप या दोघी जणी त्या ठिकाणीं येऊन पोंचल्यावर एकंदर परिस्थितीचा भराभर उलगडा होत गेला. त्या वेळीं सर

ल्युसियस याला एक गोष्ट लक्षांत घेणें भाग पडल्यामुळें त्याचा तर भलताच फजीतवाडा झाला. आपण जिला येवढीं जीव तोडून प्रेमपत्रें लिहीत होतों ती लिडिया नसून मिसेस मॅलाप्रॉपच आहे आणि ही मिसेस मॅलाप्रॉपच आपल्याला उत्तरादाखल अगदीं हळुवार प्रेमपत्रें लिहीत होती हें त्याला एकदांचें कळून चुकलें.

फॉकलँडला एकदांचें ज्युलियाचें संपूर्ण आत्मसमर्पणनिष्ठ प्रेम लाभलें आणि तें स्वीकारून तो धन्य झाला.

लिडियालाहि शेवटीं एन्साइन बेव्हर्ले व जॅक ॲब्सोल्यूट या दोन अलग व्यक्ति नसून तीं एकाच माणसाचीं दोन रूपें आहेत आणि या माणसावरच आपलें प्रेम आहे हें दिसून आलें.

आणि बॉब एकर्स? त्याला आपल्याला कुणाशींच द्वंद्वयुद्ध करावें लागणार नाहीं याचाच खूप आनंद झाला. आणि म्हणून त्यानें बाथ नगरींतील एकूण एक फॅशनेबल दिवाणखान्यांत फिडलवादनाच्या व करमणुकीच्या मैफली भरविण्याच्या ऑर्डरी देऊन टाकल्या.

## रोमियो अँड ज्युलियेट

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* विल्यम शेक्स्पियर ( १५६४-१६१६ ). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* पंधरावें शतक. *स्थळ :* व्हेरोना, इटली. *पहिला प्रयोग :* १५९५.

*प्रमुख पात्रें :* **रोमियो**, मॉंटेग घराण्यांतला मुलगा. **ज्युलियेट**, कॅप्युलेट घराण्यांतली मुलगी. **फ्रायर लॉरेन्स**, एक फ्रॅन्सिस्कनपंथीय गोसावी. **मर्क्यूशियो**, रोमियोचा मित्र. **टायबाल्ट**, लेडी कॅप्युलेटचा पुतण्या.

*कथानक :* ही दोघां दुर्दैवी प्रेमी जीवांची कहाणी म्हणजे शेक्स्पियरची सगळ्यांत जास्त हळुवार अशी नाट्यकृति. रोमियो आणि ज्युलियेट यांजविषयीं शेक्स्पियरला खूपच सहानुभूति असल्याचें उघड दिसतें. त्यांच्या शोकान्तिकेला त्यांच्या स्वभावांतील एखाद्या दोषापेक्षां दैवच अधिक जबाबदार असल्याचें दर्शवून नाटककारानें त्यांना पूर्णतेच्या अगदीं परमोच्चपदानजीक नेऊन बसविलें. त्या उभयतांच्या ठिकाणीं कळकळ, प्रेमळपणा, शौर्य, निष्ठा आणि सच्छीलपणा

हे गुण असून त्यांचें एकमेकांवर नितान्त प्रेम आहे. आणि त्यांची शोकान्तिका अधिक मोठी ठरते, कारण तीं दोघेंहि निष्पाप आहेत.

उभय प्रेमिकांच्या कुळांचें आपसांतलें हाडवैर हेंच या कथेंत दैवाची भूमिका करतें, आणि त्याच्यावर मात करण्याचें सामर्थ्य रोमियो आणि ज्युलियेट यांच्या अंगीं कुठून असणार ? या नाटकाचें वैशिष्ट्य म्हणजे तारुण्यसुलभ आणि साधासुधा शृंगार रस; आणि त्यालाच काव्यरूप देऊन कवीनें तो आपल्या समोर मूर्तिमंत उभा केलेला आढळतो.

*कथानक :* फार पूर्वींच्या काळीं इटलींतील व्हेरोना शहरीं दोन प्रख्यात कुळांचें वास्तव्य होतें. त्यांतल्या एका कुळाचें नांव होतें मॉंटेग, आणि दुसऱ्याचें कॅप्युलेट. या दोन्ही कुळांचें आपसांत हाडवैर होतें. त्यांचें वैर एकमेकांना कठोर शब्दांत वाक्ताडन करण्यावरच थांबत नसे. या वैराची मजल रक्तपाती द्वंद्व युद्धापर्यंत, आणि कधीं कधीं तर खुनापर्यंतहि पोंचत असे.

वृद्ध मॉंटेगचा पुत्र रोमियो याला असें वाटलें कीं रोझालिन या चढेल सुंदर तरुणीवर आपलें प्रेम बसलें आहे. परंतु तिनें त्याच्या प्रेमाला प्रतिसाद दिला नाहीं. पुढें त्याच्या कानांवर असें आलें कीं कॅप्युलेट मंडळींच्या घरीं एका मोठ्या मेजवानीला रोझालिन हजर राहणार आहे. म्हणून रोमियो आणि त्याचा विश्वासू स्नेही मर्क्यूशियो या दोघांनीं चेहऱ्यांवर मुखवटे धारण केले आणि निमंत्रित पाहुणे म्हणून त्यांनीं कॅप्युलेट मंडळींच्या मोठ्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. परंतु रोमियो तिथल्या नृत्यालयांत गेला असेल नसेल येवढ्यांत कॅप्युलेट कन्यका स्वरूप सुंदरी ज्युलियेट हिच्याकडे त्याची नजर गेली. आणि तत्क्षणीं त्याला त्याचा तिरस्कार करणारी रोझालिन हिचा विसरच पडला.

रोमियोनें पूर्वीं कधींहि ज्युलियेटला पाहिलेलें नव्हतें. त्यानें तिचें नांव विचारलें. त्याबरोबर कॅप्युलेट कुळांतला गरम डोक्याचा टायबाल्ट याच्या मनांत संशय जागृत झाला. टायबाल्टनें तिथल्या तिथें आपली तरवार उपसली आणि तो रोमियोवर चालून गेला. परंतु वृद्ध कॅप्युलेट तेवढ्यांत त्या दोघां तरुणांजवळ आला आणि त्यांना एकमेकांपासून अलग करून वयोमानानुसार अंगीं येणाऱ्या सौम्यतेनें म्हणाला : "या मेजवानीच्या प्रसंगीं तरी रक्तपात करूं नका अशी माझी तुम्हांला नम्र विनंति आहे." तथापि मॉंटेग कुळांतल्या एका माणसानें कॅप्युलेट कुळांतल्या मेजवान्यांत भाग घ्यावा या गोष्टीचा

टायबाल्टला भयंकर राग आला आणि मागाहून त्यानें याबद्दल रोमियोविषयीं मनांत डूक ठेवला.

रोमियोनें अत्यंत सौजन्यानें लगच्या लगेच ज्युलियेटशीं बोलणें केलें. त्यानें तिला विचारलें: "मी तुझ्या हाताचें चुंबन घेऊं का?" तिनें त्याला आपल्या हाताचें चुंबन घेण्याची परवानगी दिली. या अज्ञात तरुणाला तिच्या-विषयीं वाटत असलेलें प्रेम अगदीं उघड दिसत होतें. त्याचा तिच्यावर मोठा प्रभाव पडला. मग रोमियोनें काकुळतीला येऊन तिच्या ओठांचे चुंबन घेण्याची तिच्याजवळ अनुमति मागितली. त्याला विरोध करायला तिच्या तोंडून शब्दहि निघेना. तिचा श्वास रुद्ध झाला. त्या बरोबर त्यानें तिला आपल्या हृदयाशीं कवळून धरलें. त्यांच्या या प्रणयमीलनांत ज्युलियेटच्या वृद्ध दाईनें अडथळा आणला. तिनें या तरुणीला आपल्या आईकडे धाडून दिलें.

ती निघून गेल्यावर रोमियोला याच दाईकडून कळलें कीं ज्युलियेट ही कॅप्युलेट कुळांतली आहे. हें ऐकून तो सुन्नच झाला. कारण यामुळें या प्रेम-प्रकरणांत आपल्या प्राणांवर बेतणार याबद्दल त्याची खात्रीच होऊन चुकली. तिचा नाद सोडून देणें त्याला कधींच शक्य नव्हतें. ज्युलियेटचेंहि रोमियोवर प्रथम दर्शनीं प्रेम बसलें. तो आपल्या कुळाचें हाडवैरी असलेल्या मॉंटेग कुळांतला आहे याचा तिलाहि पत्ता लागला.

त्या रात्रीं रोमियो प्रेमानें पुरताच पछाडला गेल्यामुळें घरीं जाऊन झोंपायच्या मनःस्थितींत नव्हता. तो चोरून ज्युलियेटच्या वाड्याकडे गेला आणि तिच्या खोलीबाहेरच्या सज्जाखालीं बागेंत उभा राहिला. आणि काय आश्चर्य! त्याच्या वरच्या अंगाकडील कठड्यावर रेलून उभी असलेली ज्युलियेट त्याला दिसली. तिला वाटलें कीं आपण एकटीच उभी आहोंत; आपलें बोलणें ऐकायला आसपास कुणीच हजर नाहीं. म्हणून ती स्वतःशींच मोठ्यानें ओरडून म्हणाली: "रोमियो मॉंटेग कुळांतला नसता तर किती छान झालं असतं!" हे शब्द ऐकून रोमियोलाहि अतःपर स्वतःवर ताबा ठेवून गप्प राहणें अशक्य झालें. तोहि तिच्याशीं बोलला. प्रथम कोण बोलतें आहे हें न कळल्यामुळें ती घाबरली. आणि तो कोण आहे हें पाहिल्यावर ती गोंधळली; आणि त्यानें आपली मनची गोष्ट चोरून ऐकली म्हणून तिला भारी लाज वाटली.

परंतु त्या काळांतल्या प्रेमीजनांच्या फॅशनप्रमाणें नाखुषीचें ढोंग करायला

आतां तिला मुळीं अवसरच राहिलेला नव्हता. ज्युलियेटनें खुल्या दिलानें आपलें प्रेम उघड उघड कबूल केलें आणि उभयतांनीं आपण परस्परांवर अनुरक्त झालों असल्याच्या आणाभाका घेतल्या. ज्युलियेटनें रोमियोला सांगितलें : " आपण उद्यांच विवाहबद्ध होऊं या. लग्नाची व्यवस्था करण्यासाठीं उद्यां सकाळीं नऊ वाजतां मी तुम्हांला निरोप धाडीन."

मग रोमियो तिथून जो निघाला तो फ्रायर लॉरेन्स या गोसाव्याच्या मठांतील ओवरींत जाऊन हजर झाला. या लग्नसमारंभासाठीं फ्रायर लॉरेन्सची त्यानें मदत मागितली. रोमियोच्या एकनिष्ठ प्रेमानें हा सज्जन फ्रायर चांगलाच प्रभावित झाला. मॉंटेग रोमियो व कॅप्युलेट ज्युलियेट यांच्या या विवाह-मीलनामुळें उभय कुळांतलें वैर नष्ट होईल असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें रोमियो व ज्युलियेट या दोघांचें लग्न लावून द्यायचें वचन दिलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रोमियो आपले दोघे मित्र बेन्व्होलियो व मर्क्यूशियो यांच्या समवेत गप्पा मारीत बसलेला होता. तेवढ्यांत त्याला ज्यूलियेटचा निरोप मिळाला. तिची दाई तो निरोप घेऊन आलेली होती. त्यानें त्या म्हातारीला आपण फ्रायर लॉरेन्सकरवीं काय काय व्यवस्था केली आहे तें सांगितलें आणि आपला निरोप ज्युलियेटकडे परत पोंचविण्याची कामगिरी तिच्यावरच सोंपविली. दाईनें संपूर्ण गुप्तता राखून हा निरोप आपल्या मालकिणीकडे नेऊन पोंचता केला. ठरलेल्या वेळीं ज्युलियेट फ्रायरच्या ओवरींत येऊन दाखल झाली. तिथें तिचें आणि रोमियोचें लग्न लागलें. पण वेळ फार थोडा होता आणि ज्युलियेटला घाईघाईनें घरीं परतणें भाग होतें. ती जाण्यापूर्वी रोमियोनें तिला वचन दिलें कीं " आज रात्रीं अंधार पडल्यावर तुझ्या बागेंत तुझ्या खिडकीच्या सज्जाखालीं मी तुला जरूर भेटेन."

त्याच दिवशीं रोमियोचे दोघे स्नेही मर्क्यूशियो आणि बेन्व्होलियो हे उगीचच रस्त्यांतून भटकत होते. तेवढ्यांत टायबाल्ट कॅप्युलेट कुळांतल्या आणखी कांहीं तरुणांसह तिथें आला. टायबाल्टच्या मनांत रोमियोविषयींचा डूक अजून कायमच होता. त्यानें मर्क्यूशियोवर आरोप केला : " काय रे ए मर्क्यूशियो ! तूं त्या दुष्ट नीच हलकट मॉन्टेग तरुणाशीं दोस्ती ठेवतोस नाहीं का रे ?" मर्क्यूशियोला आपली रोमियोशीं मैत्री असल्याचा फार अभिमान होता. त्याला ही अपमानास्पद भाषा दुर्लक्ष करण्याजोगी वाटेना. कारण कुणी चिडविलें

तर तो टायबाल्टइतकाच गरम डोक्याचा होता. दोघांची खूप जोरांत भांडा-भांडी सुरू झाली. तेवढ्यांत आपलें लग्न उरकून नुकताच परत आलेला रोमियो त्या ठिकाणीं हजर झाला.

एकंदर परिस्थिती बघून त्याच्या तोंडचें पाणीच पळालें. कारण ज्युलियेटला आपला चुलत भाऊ टायबाल्ट याच्याविषयीं फार आपुलकी वाटते हें रोमियोला ठाऊक होतें. म्हणून आपल्या पत्नीच्या माहेरच्या माणसांना कसलीहि इजा पोंचूं नये अशी त्याची इच्छा होती. दोघांमधला वाद सामोपचारानें मिट-विण्याचा त्यानें प्रयत्न करून बघितला. रोमियोची ही गुळमट भाषा ऐकून मर्क्यूशियो आणखीच भडकला. मग टायबाल्टनें रोमियोला "नीच हलकट इसम" अशी शिवी दिली. तेव्हां मर्क्यूशियोनें तरवार उपसली आणि तो आपल्या मित्राच्या समर्थनार्थ पुढें सरसावला. परंतु टायबाल्ट हा अधिक चांगला तरवारबहाद्दर होता. त्यानें या झटापटींत मर्क्यूशियोला प्राणांतिक जखम केली.

गोष्टी येवढ्या थराला गेल्यावर रोमियोला या झगड्याकडे दुर्लक्ष करणें अशक्य झालें. आपल्या मित्राच्या मृत्यूमुळें त्याचा संताप आधींच अनावर झालेला होता. तो तरवार उपसून टायबाल्टच्या अंगावर तडकाफडकीं चालून गेला आणि झटक्यासरशीं त्यानें टायबाल्टला तिथल्या तिथें ठार केलें. या झगड्यामुळें लगेच तिथें लोकांची खूप गर्दी जमली. या दंगलींत भाग घेतल्या-बद्दल रोमियोला व्हेरोनाहून हद्दपार होण्याची शिक्षा मिळाली.

रोमियोला या एकंदर प्रकारानें फार दुःख झालें. तो पोलिसांना झुकांडी देऊन फ्रायर लॉरेन्सच्या ओवरींत आश्रयार्थ गेला. फ्रायरनें त्याला असा सल्ला दिला कीं "आज रात्रीं तूं आपल्या पत्नीकडे चोरून जा. आणि मग उद्यां पहांटे तूं हें शहर सोडून मॅन्टुआला पळून जा. दरम्यान मी योग्य संधि बघून तुझ्या लग्नाची बातमी जाहीर करतों. तोंपर्यंत तूं इकडे येऊंच नकोस." रोमियोनें या चांगल्या सल्ल्यानुसार वागण्याचें कबूल केलें. अंधार पडल्यावर तो ज्युलियेटला भेटायला गेला. पहांट झाल्यावर अत्यंत जड अंतःकरणानिशीं रोमियोनें शहर सोडलें आणि मॅन्टुआची वाट धरली.

दरम्यान ज्युलियेटच्या वडिलांनीं असें ठरविलें कीं आपली मुलगी लग्नाला योग्य झालेली आहे म्हणून तिचें लग्न करून टाकायचें. त्यांना तिचें रोमियोवर

प्रेम असल्याची गंधवार्ताहि नव्हती. म्हणून म्हाताऱ्यानें तिला फर्मावलें कीं "पॅरिस हा देखणा व श्रीमंत तरुण तुला मागणी घालायला आलेला आहे, त्याला तूं होकार दे." आपल्या वडिलांचा हा मनसुबा ऐकून ज्युलियेटच्या अंगावर भीतीनें कांटाच उभा राहिला. परंतु आपलें रोमियोशीं लग्न झालें असल्याची बातमी उघडपणें वडिलांना सांगायची तिला हिंमत झाली नाहीं. कारण रोमियोच्या हातूनच टायबाल्ट मारला गेलेला होता. आपल्या कुळांतल्या लोकांना जर रोमियोशीं आपलें लग्न झाल्याचें कळलें तर ते ताबडतोब त्याला तो असेल नसेल तिथून शोधून काढून ठार करतील अशी तिला भीति वाटली.

प्रथम तिनें कांहीं तरी सबबी सांगून आपल्या वडिलांना हा विचार लांबणीवर टाकायला लावायचा प्रयत्न करून बघितला. परंतु त्यांचें मन कांहीं तिला वळवितां येईना. मग तर ती फारच घाबरली. आतां काय करायचें ? शेवटीं निरुपायानें ती फ्रायर लॉरेन्सला भेटायला गेली आणि "यांतून कांहीं मार्ग निघूं शकतो का बघा" अशी तिनें त्या सज्जन गोसाव्याला विनंति केली.

फ्रायर म्हणाला : "मुली, घाबरूं नकोस. हिंमत धर. मी तुला ही लहानशी पातळ औषधाची कुपी देतों. पॅरिसशीं लग्न व्हायच्या आदल्या रात्रीं तूं या कुपींतलं औषध पिऊन टाक. या औषधामुळं तूं ठराविक मुदतीपर्यंत अगदीं मेल्यासारखी पडून राहशील. मग तुझं हें वरकरणीं निर्जीव झालेलं शरीर एकदोन दिवस उघड्या कबरींत ठेवतील. तेवढ्या मुदतींत मी रोमियोला बोलावून घेईन. या औषधाच्या जबरदस्त प्रभावांतून मुक्त होऊन तूं जागी झाल्यावर तो तुला सोडवून घेऊन जाईल. मग तुम्हां दोघांना व्हेरोना सोडून पळून जातां येईल." या विलक्षण साहसाला हात घालायच्या कल्पनेनेंच ज्युलियेटचा धीर जवळ जवळ सुटला. परंतु तिनें फ्रायरच्या आदेशाप्रमाणें वागायचें वचन दिलें. घरीं जातांना वाटेंत तिला पॅरिस भेटला. त्याला तिनें शालीनतेला शोभेशा रीतीनें त्याची वधू होण्याचें अभिवचन दिलें.

कॅप्युलेट कुळासारखें थोर घराणें. त्याला शोभेसा लग्नाचा थाटमाट. परंतु या सगळ्या साहित्याची जुळवाजुळव होते न होते येवढ्यांत लग्नाच्या मांडवांतच स्मशानयात्रेची तयारी करावी लागली. कारण ज्युलियेटनें त्या प्रभावी औषधाचा डोस घेऊन टाकल्यामुळें ती मेल्यासारखी निर्जीव पडून राहिली. तिच्या

कुलबांधवांच्या दुःखाला पारावार राहिला नाहीं. त्यांनीं तिचा देह कबरीमध्यें नेऊन ठेवला.

दरम्यान फ्रायर लॉरेन्सनें आपली योजना लिहून कळविणारें पत्र रोमियोला धाडून दिलें. मॅन्टुआ मुक्कामीं तें पत्र रोमियोला मिळाल्यावर त्यानें परत यायचें आणि मग उभय प्रेमिकांनीं व्हेरोनाहून पळून जायचें असा सगळा बेत त्या पत्रांतून कळविलेला होता. परंतु रोमियोला हें पत्र पोंचायच्या अगोदरच ज्युलियेटच्या मृत्यूची बातमी त्याच्या कानावर येऊन थडकली.

रोमियोनें असा निर्धार केला कीं व्हेरोनाला परत जायचें, आपल्या प्रियतमेचें शव जिथें कबरीमध्यें असेल तिथें जाऊन तिचा अखेरचा निरोप घ्यायचा, आणि जातांना एका औषधविक्र्याकडून बरोबर घेतलेलें विष प्राशन करून तिथल्यातिथं आपल्या पत्नीच्या शेजारींच मरून पडायचें.

रोमियो रात्रीं आपल्या पत्नीच्या कबरीपाशीं गेला. तिथें एका तरुण इसमाला बसलेला बघून त्याला आश्चर्यच वाटलें. हा तरुण म्हणजे पॅरिस होता. आपल्याला विवाहाआधींच सोडून गेलेल्या वधूचें शेवटचें दर्शन घ्यायला हा शोकविव्हल तरुण तिथें आलेला होता. रोमियो हा कुणी तरी प्रेतांवरच्या वस्तू चोरणारा दरवडेखोर असावा अशा समजुतीनें पॅरिसनें आपली तरवार उपसली. रोमियोला वाटलें कीं आपलें वैर करणाऱ्या कॅप्युलेट कुळांतला हा कुणी तरी असावा. पॅरिस तिथें आला अशी त्याला कल्पनाच नव्हती. म्हणून त्यानें बजावलें : "याद राख. मी जीवावर उदार झालेलों आहें. आणि मी शस्त्रसज्जहि आहें."

परंतु ज्युलियेटशीं इमान राखायचें म्हणून पॅरिस त्याच्यावर तुटून पडला. परंतु जिवावर उदार झालेल्या रोमियोनें सर्व शक्ति एकवटून त्याच्यावर हल्ला चढविला आणि त्याला तिथल्या तिथें ठार केलें. मग कंदिलाच्या उजेडांत त्यानें त्याचें तोंड पाहिलें. बघतो तों तो पॅरिस. त्यानें त्याला ओळखलें. त्याचेंहि ज्युलियेटवर प्रेम असल्याचें बघून त्याला त्याची दया आली आणि तोहि तिच्याजवळ असावा म्हणून त्यानें त्याचें प्रेत ओढत ओढत ज्युलियेटच्या पार्थिव देहाशेजारीं तिच्या कबरींत नेऊन ठेवलें. मग रोमियो आपल्या स्वरूपसुंदर पत्नीच्या उघड्या शवपेटिकेपाशीं गेला., तिचें चुंबन घेऊन त्यानें

तिचा अखेरचा निरोप घेतला. त्यानंतर त्यानें आपल्याबरोबर आणलेलें विष प्राशन केलें आणि लवकरच तो तिच्या शेजारीं मरून पडला.

ज्युलियेट आपल्या मरणसदृश झोंपेंतून जागी व्हायची वेळ जवळ आली. इकडे रोमियोला आपलें पत्र मुळीं मिळालेंच नाहीं असें फ्रायरला कळलें. तेव्हां तो स्वतःच ज्युलियेटला तिच्या कबरींतून जागी करून घेऊन यायला कबरस्तानांत गेला. तो तिथें जाऊन बघतो, तों रोमियो तिथें मरून पडलेला त्याला आढळला. तितक्यांत ज्युलियेट जागी झाली आणि आपला पति कुठें आहे असें तिनें फ्रायरला विचारलें. मग तो आपल्या जवळच हातांत रिकामा कप घेऊन पडलेला तिला दिसतांक्षणीं त्यानें काय केलें असेल हें तिनें ताबडतोब हेरलें. त्याच्या ओठांवर शिल्लक राहिलेलें थोडेंसें विष तिनें भराभर चुंबून घेतलें. हेतु हा कीं त्या विषानेंच आपल्यालाहि ताबडतोब मरण यावें. परंतु तेवढ्या विषानें आपल्याला मरण येत नाहीं असें दिसतांक्षणीं तिनें त्याच्या कमरेचा खंजीर म्यानांतून उपसला आणि कसलेहि आढेवेढे न घेतां आपल्या छातींत खुपसून घेतला.

या वेळेपर्यंत एक पाहरेवाला तिथें येऊन पोंचला. त्या प्रेमिकांचीं प्रेतें व त्यांच्याच शेजारीं पॅरिसचें शव बघून तो घाबरून कासावीस झाला आणि ही भयंकर बातमी गांवभर सांगण्यासाठीं तो धांवतच सुटला. कॅप्युलेट व मॉंटेग या दोन्ही कुळांतलीं माणसें त्या कबरीपाशीं जमा झालीं. मग फ्रायरनें रोमियो व ज्युलियेट या दोघांवर ओढवलेल्या दुर्दैवी प्रसंगाची कहाणी सांगितली. तो म्हणाला : " या दोघांनीं एकच पाप केलं. आणि तें म्हणजे त्यांनीं एकमेकांवर प्रेम केलं. " त्यानें त्यांच्या हळुवार व नितांत सुंदर अद्भुत प्रेमाची जी कहाणी सांगितली, ती ऐकून उभय कुळांतील लोकांनीं शरमेनें माना खालीं घातल्या. आपल्या दिवंगत आप्तांच्या शवांवर हात ठेवून व त्यांच्या स्मृतीला साक्षी ठेवून त्यांनीं अशा शपथा घेतल्या कीं आम्ही आमचें आपसांतलं अनेक वर्षांचें वैर या पुढें कायमचें सोडून देऊं.

## द स्कूल फॉर स्कॅन्डल : कुटाळकीचें विद्यालय

*वाङ्मयप्रकार : नाटक. लेखक : रिचर्ड ब्रिन्स्ले शेरिडन (१७५१-१८१६).*

*कथानकाचा प्रकार :* शिष्टाचारांवर आधारलेली सुखान्तिका. *काळ :* अठरावें शतक. *स्थळ :* लंडन. *पहिला प्रयोग :* १७७७.

*प्रमुख पात्रें :* **सर पीटर टीझल**, एक वयस्क सरदार. **लेडी टीझल**, त्याची तरुण पत्नी. **मारिया**, सर पीटरची आश्रित. **सर ऑलिव्हर सर्फेस**, सर पीटरचा मित्र. **जोसेफ सर्फेस** आणि **चार्ल्स सर्फेस**, सर ऑलिव्हरचे पुतणे. **लेडी स्नीयरवेल**, लेडी टीझलची मैत्रीण. **रौली**, सर पीटरचा नोकर.

*समीक्षण :* इंग्लंडमध्यें १६४८ सालीं पार्लमेंटनें राजाला फांशीं देऊन जगांतील पहिली लोकशाही क्रान्ति झाल्यानंतर पुन्हां १६६० सालीं राजेशाहीचें जें पुनरुज्जीवन झालें त्या "रेस्टोरेशन"च्या काळामध्यें विशिष्ट प्रकारचीं सुखान्त नाटकें अनेक निर्माण झालीं. त्या नाटकांचे कांहीं गुणधर्म प्रस्तुत 'द स्कूल फॉर स्कॅन्डल' या नाटकांत आढळतात. त्यांच्या जोडीला नाजुक भावनांवर आधारलेल्या सुखान्तिकेंतील नेहमींचा भावनाशीलपणाहि यामध्यें आहे. या नाटकांत दोन कथानकें आहेत. लेडी स्नीयरवेल हिचें चार्ल्सवर असलेलें प्रेम, लेडी टीझलविषयीं ती सांगत असलेल्या निंदाखोर कहाण्या आणि लेडी टीझलचे जोसेफशीं असलेले नाजुक संबंध—या तीन धाग्यांचें मिळून एक कथानक; आणि आपल्या दोन पुतण्यांपैकीं अधिक लायक कोण याचा शोध लावण्यासाठीं सर ऑलिव्हर सर्फेस यांनीं चालविलेल्या कसोट्या, हें दुसरें कथानक. नाटककार शेरिडन हीं दोन्ही कथानकें मोठ्या प्रतिभाकौशल्यानें या नाटकांतल्या सुप्रसिद्ध 'पडद्याच्या' प्रवेशामध्यें एकत्र आणतो. सुखान्त नाटकें लिहिण्यांतील त्याचें हातखंडा कसब या प्रवेशामुळें सप्रयोग सिद्ध होतें.

तत्कालीन पोशाखांचें प्रदर्शन करणारें नाटक म्हणून 'द स्कूल फॉर स्कॅन्डल' या नाटकाचें पुन्हां पुन्हां पुनरुज्जीवन होत असतें. सर्व ठिकाणच्या प्रेक्षकांना याच्याविषयीं वाटत असलेली गोडी अजूनहि कायम आहे.

*कथानक :* लेडी स्नीयरवेल ही स्वतःच्या तरुणपणीं लोकनिंदेचा विषय झालेली होती. तिनें आतां आयुष्यभर एकच मार्ग पतकरायचें ठरविलें. तो मार्ग असा कीं इतर स्त्रियांच्या अब्रूचें खोबरें करायचें आणि त्यांच्या अब्रूची पातळी आपल्या स्वतःच्या अब्रूच्या बरोबर आणून ठेवायची. या कामीं तिची एक अंतरंग मैत्रीण स्नेक हिची मदत घेऊन तिनें एकदम चार कारस्थानें आरंभलीं. टीझल मंडळींना कसल्या तरी निंदास्पद भानगडींत गुंतवायचें;

जोसेफ सर्फेसचा खरा स्वभाव उजेडांत आणायचा; चार्ल्स आणि मारिया या उभयतांच्या प्रेमामध्यें बिब्बा घालायचा; आणि सर ऑलिव्हरच्या इस्टेटीसकट स्वतःसाठीं चार्ल्सची प्राप्ति करून घ्यायची—अशीं हीं एकंदर चार कारस्थानें.

जगांत निंदेखेरीज व निंदास्पद कारस्थानांखेरीज अन्य कांहीं असतच नाहीं अशी तिची भावना. आणि आपला हा दृष्टिकोन खरा करून दाखविण्यासाठीं तिनें आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त चालविली. परंतु तिनें जेव्हां चार्ल्स सर्फेसवर शिव्यांची लाखोली वाहिली, तेव्हां सर पीटर टीझल यांची आश्रित तरुणी मारिया हिनें तिचें ऐकून घ्यायला साफ नकारच दिला. त्या ऐवजीं मारियानें विश्वासानें आपलें मन लेडी कॅन्डरजवळ उघड करून सांगितलें. यामुळें तर निकालच लागला. कारण लेडी कॅन्डरचा लौकिक असा होता कीं कुणाच्याहि इभ्रतीचें तिनें समर्थन केलें कीं ती इभ्रत संपूर्णपणें नष्ट झाली असें हमखास समजून चालावें.

कधीं कधीं सर पीटर टीझल यांच्या मनांत असा संभ्रम निर्माण होई कीं आपण लेडी टीझल हिच्याशीं लग्न करण्यांत शहाणपणा केला का मूर्खपणा केला. वयस्क ब्रम्हचाऱ्यानें तरुण स्त्री आपली पत्नी म्हणून पतकरण्याचा निर्णय कितपत सयुक्तिक आहे अशी त्यांना शंका येई. लेडी टीझल ही खेड्यांत लहानाची मोठी झालेली होती. तिनें लंडनमधील जीवनाचा भरपूर उपभोग घेण्यासाठीं पैशाची वारेमाप उधळपट्टी चालविली.

सर ऑलिव्हर यांना आपल्या दोघां पुतण्यांची काळजी वाटत होती. आपली अफाट संपत्ति कशी वांटून द्यावी हा त्यांच्यापुढें प्रश्न होता. सर ऑलिव्हर आदलीं पंधरा वर्षें परदेशांतच होते. आपल्या दोघां पुतण्यांचे खरे स्वभाव आपल्याला ठाऊक नाहींत असें त्यांना वाटलें. कांहीं तरी क्लृप्ति लढवावी, त्यांना नकळत अकस्मात कसल्या तरी प्रकरणांत मुद्देमालासकट पकडावें आणि त्यांच्या स्वभावाची कसोटी घ्यावी असा सर ऑलिव्हर यांनीं विचार करून ठेवला.

एके दिवशीं सर पीटर आणि लेडी टीझल यांचें भांडण झालें. कारण लेडी टीझल चालली होती लेडी स्नीयरवेल हिच्या घरीं, आणि याला सर पीटर यांनीं भयंकर जोरदार हरकत घेतली. लेडी टीझल चिडली. ती म्हणाली: "तुम्ही माझं सगळं स्वातंत्र्य हिरावून घेऊं इच्छितां. खरं सांगायचं म्हणजे

तुम्हीच मला बरोबर घेऊन लेडी स्नीयरवेलच्या घरीं जायचं वचनं दिलं होतं. पण तें तुम्ही साफ विसरूनच गेलांत." यावर सर पीटर ताडकन उत्तरले: "मी हें लेडी स्नीयरवेलकडे जायचं काम फक्त एकाच कारणासाठीं करीन. आणि तें कारण म्हणजे माझी स्वतःची इज्जत संभाळणं." शेवटीं दोघं एकदांचीं लेडी स्नीयरवेलच्या घरीं दाखल झालीं. तोंवर तिच्या घरीं भेटायला आलेल्या पाहुण्यांची भरपूर गर्दी झालेली होती. जमलेली सगळी मंडळी आपल्या शत्रूंविषयीं बदनामीकारक उद्गार काढत होती आणि आपल्या मित्रांविषयीं तर त्याहूनहि वाईट प्रलाप त्यांच्या मुखांतून निघत होते. या सगळ्या घोंटाळ्यांतून सर पीटर शक्य तितक्या लवकर सटकले.

लेडी स्नीयरवेलचे बाकीचे पाहुणे पत्ते खेळायच्या दुसऱ्या खोलींत गेले आणि मारिया व जोसेफ ही जोडीच तेवढी मागें शिल्लक राहिली. त्या संधीचा फायदा घेऊन जोसेफनें पुन्हां मारियाला आपल्याशीं लग्न करण्याबद्दल काकुळतीनें गळ घातली. "तुझं चार्ल्सवर प्रेम आहे आणि तें प्रेम करण्यापायीं तूं सर पीटर यांच्या इच्छेशीं प्रतारणा चालविलेली आहेस," असें ध्वनित करायलाहि त्यानें कमी केलें नाहीं. जोसेफ गुडघे टेंकून आपल्या प्रामाणिक प्रेमाच्या आणाभाका करीत होता, येवढ्यांत लेडी टीझल तिथं आली आणि तिनें या प्रेमसंवादांत अडथळा आणला. तो देखावा बघून लेडी टीझल आश्चर्यचकित झाली. तिनें मारियाला कुणी तरी शेजारच्या खोलींत बोलावतें आहे असें सांगून मारियाची बोळवण केली. मग तिनें जोसेफला त्याच्या वर्तनाचा खुलासा विचारला.

जोसेफ पक्का बनेल. त्यानें तिला सांगितलें: "अहो, तुमच्याविषयीं माझ्या मनांत नाजुक भावना आहेत ना? त्या तिनं सर पीटर यांना सांगूं नयेत म्हणून मी तिची मनधरणी चालविलेली होती."

सर ऑलिव्हर यांनीं सर पीटर यांचा चाणाक्ष आणि मार्मिक निरीक्षण करणारा नोकर रौली याचा सल्ला घेतला. आपल्या पुतण्यांच्या स्वभावांविषयीं अधिक माहिती कळावी अशी जी त्यांची खटपट चाललेली होती, तिचाच हाहि एक भाग होता. रौली म्हणाला: "साहेब, माझं स्वतःचं मत विचाराल तर मी असं सांगेन कीं जोसेफच्या बाह्य लौकिकावरून दिसतं त्या मानानं त्याचं चारित्र्य

कमी चांगलं आहे; आणि चार्ल्सचं चारित्र्य त्याच्या बाह्य लौकिकावरून दिसतं त्याच्यापेक्षां अधिक चांगलं आहे."

या बाबतींत सर ऑलिव्हर यांनीं सर पीटर यांचेंहि मत घेतलें. सर पीटर यांनीं ठांसून सांगितलें कीं "जोसेफच्या इज्जतीसाठीं मी माझे स्वतःचे प्राण पणाला लावायला तयार आहें." म्हणूनच मारियानें जोसेफशीं लग्न करायला पुन्हां नकार दिल्यावर ते चांगलेच बेचैन झाले.

सर ऑलिव्हर यांच्या या दोघांहि पुतण्यांच्या लायकीची पारख करण्याचा बेत सर पीटर, सर ऑलिव्हर आणि रौली या तिघांनीं मिळून ठरवून टाकला.

चार्ल्स नेहमींप्रमाणें पैशाच्या भयंकर अडचणींत होता. मोझेस नांवाचा एक ज्यू चार्ल्सला भेटायला येणार होता. म्हणून सर ऑलिव्हर यांनीं मिस्टर प्रीमियम असें नांव धारण केलें आणि ते या मोझेससमवेत चार्ल्सला भेटायला गेले. योजना अशी होती कीं हा मिस्टर प्रीमियम चार्ल्सला हवे तेवढे पैसे देण्याइतका ऐपतवान आहे असें मोझेसनें सांगायचें.

दोघे चार्ल्सच्या बिऱ्हाडीं आले. त्या वेळीं तिथें मद्यपानाची पार्टी चाललेली होती. कांहीं पाहुणे जुगार खेळत होते. चार्ल्सचा हुजऱ्या ट्रिप हा तर आपण कुणी तरी शहरी वस्तीला सरावलेले फॅशनेबल गृहस्थ आहोंत असा आव आणीत होता. ट्रिपच्या या वर्तनाची छाप तर सर ऑलिव्हर यांजवर अजिबात पडली नाहीं.

या ठिकाणीं सर ऑलिव्हर यांना असा पत्ता लागला कीं चार्ल्सनें आपल्या पूर्वजांच्या पूर्णाकृति चित्रांखेरीज बाकीच्या सगळ्या वारसाहक्कानें आलेल्या मालकीच्या वस्तूंचें रोख पैशांत रूपांतर करून टाकलेलें आहे. या प्रकारावरून चार्ल्स हा उडाणटप्पू इसम आहे अशी सर ऑलिव्हर यांची खात्री झाली. त्यांनीं मिस्टर प्रीमियमचें सोंग अजून तसेंच चालू ठेवलेलें होतें. या मिस्टर प्रीमियमनें तीं चित्रें विकत घ्यायचें कबूल केलें. चार्ल्स एकेक चित्र या मिस्टर प्रीमियमला दाखवीत होता आणि तो तें खरेदी करीत होता. होतां होतां खुद्द सर ऑलिव्हर यांचें चित्र पुढें आलें. तें मात्र आपल्याला कुणी कितीहि पैसे देऊं केले तरी आपण विकणार नाहीं असें चार्ल्सनें निक्षून सांगितलें. हें ऐकून सर ऑलिव्हर खूष झाले आणि चार्ल्सचा उधळ्या म्हणून जो लौकिक होता त्याला त्यांनीं कांहीं किंमत दिली नाहीं. चार्ल्सला या चित्र-

विक्रीच्या व्यवहारांत आंठशें पौंड मिळाले आणि त्यांतले शभर पौंड त्यानें ताबडतोब आपल्यापेक्षांहि अधिक ओढघस्तीच्या अवस्थेंत असलेल्या स्टॅन्ले नामक आपल्या एका गरीब नातेवाइकाकडे धाडून दिले.

लेडी टीझल अशीच एकदां जोसेफच्या घरीं गेली. दोघें त्याच्या लायब्ररींत गप्पा मारीत बसलीं. त्यानें तिला या वेळीं असा उपदेश केला : " कांहीं कारण नसतांना तुझ्या यजमानांनीं तुझा मत्सर करावा यांत कांहींच अर्थ नाहीं. त्यांना तुझा मत्सर वाटेल अशीं सबळ कारणं तूं त्यांना निर्माण करून दिलीं पाहिजेस. तुला तुझी अब्रू वांचवायची असेल तर ती वांचवायचा उत्तम मार्ग म्हणजे तिचा सत्यानाश करून टाकणं हाच आहे. आणि या कामीं तुला मदत करायला माझ्या इतका उत्तम माणूस नाहीं मिळायचा. " लेडी टीझल यावर म्हणाली : " तुझं हें तत्वज्ञान भलतंच विलक्षण दिसतंय रे. "

दोघांचा हा सुखसंवाद चाललेला असतांना सर पीटर तिथें अनपेक्षितपणें आले. लेडी टीझलला पडद्याआड लपावें लागलें. हा पडदा जोसेफनें मुद्दाम खिडकी-समोर लावून घेतला. सर पीटर आंत आले त्या वेळीं जोसेफ आपण वाचनांत गर्क आहांत अशी बतावणी करीत बसलेला होता. सर पीटर म्हणाले : " मी या वेळीं तुला मुद्दाम भेटायला आलों तो एका विशेष उद्देशानं आलोंय. मला असा संशय येतोय कीं लेडी टीझलनं चार्ल्सशीं चोरून सलगी चालविलेली असावी. "

येवढें बोलल्यावर त्यांनीं आपल्याबरोबर आणलेले दोन दस्तऐवज त्याला दाखविले. हीं दोन दानपत्रें होतीं. एका अन्वयें लेडी टीझलला तिच्या स्वतंत्र खासगी खर्चासाठीं सालिना आठशें पौंड मिळावेत अशी त्यांनीं तरतूद करून ठेवलेली होती. दुसऱ्या अन्वयें त्यांनीं आपलीं बहुतेक सगळी इस्टेट आपल्या मृत्यूनंतर तिला मिळावी अशी व्यवस्था केलेली होती. सर पीटर यांच्या समोर जोसेफनें पोटांत एक व ओठांत एक अशा प्रकारचें चालविलेलें वर्तन आणि सर पीटर यांची लेडी टीझलविषयींची उदार वृत्ति या दोन्ही गोष्टी लेडी टीझलच्या मनावर या प्रसंगानें चांगल्याच ठसल्या.

येवढें सगळें बोलून झाल्यावर मग मारियाशीं लग्न करण्याच्या बाबतींत जोसेफचा विचार काय आहे याबाबत सर पीटर बोलूं लागले. तेव्हां मग

पडद्याआड उभ्या असलेल्या लेडी टीझलच्या हेंहि ध्यानांत येऊन चुकलें कीं जोसेफनें आपल्याला आतांपर्यंत सपशेल फसविलें.

वरच्या मजल्यावर हें बोलणें चालू असतांनाच चार्ल्स भलती वेळ साधून तिथें आला आणि आपल्या भावाला भेटायसाठीं ताबडतोब देवडीवाल्या-जवळ त्यानें प्रवेश मागितला. आपण इथें आहोंत हें चार्ल्सला कळूं नये अशी सर पीटर यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं जोसेफला विचारलें: "मी कुठं लपून बसूं?" तेवढ्यांत पडद्याआड परकराचा घोळ सर पीटर यांना चुकून थोडासा दिसला. पण जोसेफनें त्यांना सांगितलें: "आपण भलता सलता संशय मुळींच घेऊं नका. ती एक फ्रेंच शिंपीण आहे, आणि मला एकसारखा त्रास द्यायला येत असते." मग सर पीटर एका कपाटाआड दडले. लेडी टीझल पडद्याआड तशीच उभी राहिली.

चार्ल्स आल्यावर तो आणि जोसेफ यांनीं लेडी टीझलविषयीं, आणि सर पीटर यांना चार्ल्स तिचा प्रियकर असल्याबद्दल जो संशय होता त्या-विषयीं चर्चा केली. चार्ल्स म्हणाला: "मी तर असं समजतोंय कीं तूच तिचा लाडका आहेस." आणि आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ त्यानें एका मागून एक अशा बारीक सारीक घटनांची सबंध मालिकाच्या मालिकाच त्याच्या समोर सादर केली.

संभाषणाला मिळालेल्या या विलक्षण वळणामुळें जोसेफ चांगलाच पेंचांत सांपडला. त्यानें चार्ल्सचें बोलणें मध्येंच अडवून त्याला सांगितलें: "अरे, असलं भलतं सलतं कांहीं बोलूं नकोस. सर पीटर आपलं हें सगळं संभाषण ऐकताहेत." आतां चार्ल्स अडचणींत सांपडला. त्यानें प्रांजळपणें सर पीटर-जवळ असा खुलासा केला: "माफ करा हं. मी हें जें बोललों तें जोसेफची केवळ थट्टा करायच्या उद्देशानं बोललों. आपण तें मनावर घेऊं नये."

सर पीटर यांनाहि जोसेफची थट्टा करायला विषय मिळालेला होता. ते म्हणाले: "अरे, एक फ्रेंच शिंपीण जोसेफच्या मागं लागलेली आहे, हें नाहीं का तुला ठाऊक? आणि ती या वेळीं इथंच आहे!" ही शिंपीण कशी दिसते हें बघायचा चार्ल्सनें निश्चयच केला आणि पडदा बाजूला सारला. जोसेफची सपशेल फटफजिती झाली. कारण त्यानें सांगितलेली एकहि सबब लेडी टीझलनें मान्य करण्याचें साफ नाकारलें. तिनें रागारागानें जोसेफच्या एकंदर

हेतूंचें संपूर्ण स्वरूप आपल्या पतिराजांना सादर केलें आणि ती तिथून निघून गेली. सर पीटरहि तिच्या पाठोपाठ गेले. जोसेफला आपल्या सदसद्विवेक-बुद्धीशीं सल्ला मसलत करायला त्यांनीं तिथेंच सोडून दिला.

आतां मिस्टर स्टॅन्ले हें नांव घेऊन सर ऑलिव्हर यांनीं जोसेफच्या बिऱ्हाडांत प्रवेश मिळविला. या स्टॅन्लेला मदत करायचें जोसेफनें साफ नाकारलें. तो म्हणाला : “ मला सर ऑलिव्हर यांजकडून फार थोडे पैसे मिळतात. आणि माझ्याजवळ जी कांहीं पुंजी होती ती सगळी मी चार्ल्सला उसनी देऊन टाकली. ” सर ऑलिव्हर निघून गेल्यावर रौली आला. तो या सगळ्या कार-स्थानांत पहिल्यापासूनच सामील होता. त्यानें जोसेफला सांगितलें : “ साहेब, सर ऑलिव्हर गांवांत आले आहेत. ”

सर ऑलिव्हर पुन्हां जोसेफला भेटायला गेले. त्याची बिचाऱ्याची अजून अशीच समजूत होती कीं हा मिस्टर स्टॅन्लेच आपल्याला पुन्हां सतावायला आला आहे. तो या मिस्टर स्टॅन्लेला घराबाहेर हांकलून देत होता येवढ्यांत चार्ल्स आंत आला. आपल्या भावाच्या बिऱ्हाडीं मिस्टर प्रीमियम आलेले बघून त्याला आश्चर्यच वाटलें. चार्ल्सनेंहि मिस्टर प्रीमियमला ताबडतोब तिथून तोंड काळें करायला फर्मावलें. परंतु त्याच क्षणीं सर पीटर टीझल आले आणि त्यांनीं सर ऑलिव्हर यांना त्यांच्या खऱ्या नांवानें हांक मारली.

सर ऑलिव्हर आणि सर पीटर या दोघांनाहि आतां जोसेफच्या खऱ्या चारित्र्याची माहिती झाली. चार्ल्सनें आपल्या वागणुकींत सुधारणा करण्याचें आश्वासन दिलें आणि त्याला मारिया मिळाली व तिच्याबरोबर आपल्या काकांचा वारसाहि मिळाला.

मग लेडी स्नीयरवेलचीं सगळीं बिंगें स्नेक बाईनें चव्हाट्यावर आणलीं. खरें सांगण्यासाठीं स्नेक बाईला दुप्पट पैसे मिळाले. आणि लेडी टीझलनें ‘ द स्कूल फॉर स्कॅन्डल ’ या संस्थेची अध्यक्ष लेडी स्नीयरवेल हिच्याकडे आपल्याला या संस्थेकडून मिळालेला डिप्लोमा परत देऊन टाकला. सगळीं सुखी झालीं. अपवाद फक्त लेडी स्नीयरवेल आणि जोसेफ सर्फेस हीं दोघेंच.

## शी स्टूप्स टु कॉंकर : वर-परीक्षा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ऑलिव्हर गोल्डस्मिथ ( १७२८-१७७४ ).

*कथानकाचा प्रकार* : विशिष्ट परिस्थितीवर आधारलेली सुखान्तिका. *काळ :* अठरावें शतक. *स्थळ :* इंग्लंड. *पहिला प्रयोग :* १७७३.

*प्रमुख पात्र :* **मिस्टर हार्डकॅसल**, एक इंग्रज सद्गृहस्थ. **मिसेस हार्डकॅसल**, त्याची पत्नी. **टोनी लम्पकिन**, मिसेस हार्डकॅसल हिचा पुत्र. **केट हार्डकॅसल**, मिस्टर हार्डकॅसलची कन्या. **कॉन्स्टन्स नेव्हिल**, टोनीचा मावस भाऊ. **मार्लो**, केटला नाखुषीनें लग्नाची मागणी घालणारा. **हेस्टिंग्ज**, कॉन्स्टन्सच्या प्रेमांत असलेला. **सर चार्ल्स**, मार्लोचे वडील.

*समीक्षण :* या चटकदार नाटकानें पावणेदोनशें वर्षांहून अधिक काळपर्यंत प्रेक्षकांचें मनोरंजन केलें आहे. या सुखान्तिकेला आधारभूत असलेली समाजस्थिती फार पूर्वीच अस्तित्वांतून गेली. परंतु कथानकाचा खेळकरपणा आणि झणझणीत संवाद अजूनहि प्रेक्षकांची भरपूर करमणूक करतात. गोल्डस्मिथच्या काळांतील भावनाप्रधान सुखान्त नाटकांचा उपहास करण्यासाठीं रचलेलें प्रस्तुत "शी स्टूप्स टु कॉंकर" हें नाटक लेखकाच्या समकालीन रंगभूमीवरील अतिशयोक्तिपूर्ण भावनाशीलतेपेक्षां खूपच अधिक चमकदार आहे.

*कथानक :* मिसेस हार्डकॅसल ही मिस्टर हार्डकॅसलची दुसरेपणाची पत्नी. तिला पहिल्या पतीपासून टोनी लम्पकिन हा मुलगा झालेला होता. टोनी हा आळशी व लाडावलेला मुलगा असला तरी त्याची आई तो रोगिष्ट असल्याची कल्पना करून घेऊन त्याच्या दुर्वर्तनाकडे दुर्लक्ष करी. आपला सावत्र पुत्र निरोगीपणाचा आदर्श दिसावा अशी मिस्टर हार्डकॅसलनें प्रतिज्ञाच केली.

मिस्टर हार्डकॅसलची मुलगी केट हार्डकॅसल ही महा हट्टी. आपण कुणी तरी प्रतिष्ठित पुरन्ध्री व्हावें ही तिची इच्छा. तिच्या डोक्यांतला हा विचार काढून टाकण्यासाठीं मिस्टर हार्डकॅसलनें तिच्याशीं एक करार केला. या करारानुसार असें ठरलें कीं दिवसांतील कांहीं तास तिनें खेडवळ मुलीची भूमिका करायची. ती ठराविक मुदत संपल्यावर तिला सुंदर पोशाखांत मिरवायची मुभा मिळाली. होतां होतां आपल्या मुलीचें लग्नाचें वय झालें हें मिस्टर हार्डकॅसलला कळून चुकलें. मग त्यानें आपल्या अत्यंत जिवलग मित्राचा पुत्र मार्लो याला केटची भेट घेण्यासाठीं बोलावणें धाडलें. आपल्या वडिलांनीं या तरुणाच्या एकंदर रूपगुणांचें जें वर्णन केलें तें ऐकून केट खूष झाली. मात्र तिला त्याच्यांत फक्त

एकच वैगुण्य सांपडलें. त्याला लोक लाजाळू आणि भिडस्त स्वभावाचा समजतात ही गोष्ट तिला अजिबात आवडली नाहीं.

मिसेस हार्डकॅसलनें आपली आश्रित नि केटची अत्यंत जिवलग मैत्रीण कॉन्स्टन्स नेव्हिल हिच्याशीं आपला पुत्र टोनी याचें लग्न जमवायचा मनसुबा रचला. त्या दोघांना एकमेकांविषयीं भयंकर द्वेष वाटत होता, परंतु मिसेस हार्डकॅसलच्या मर्जीखातर त्यांनीं एकमेकांविषयीं आपलेपणा दर्शविण्याचें निव्वळ ढोंग चालविलेलें होतें. मार्लो ज्या दिवशीं यायचा, त्या दिवशीं कॉन्स्टन्सनें हा भावी वर म्हणजे आपला खरोखरीचा प्रियकर हेस्टिंग्ज याचाच मार्लो म्हणून जो मित्र तोच हा, हें ओळखलें. कॉन्स्टन्सनें त्याचें आगाऊ वर्णनहि करून टाकलें. ती म्हणाली : "हा मार्लो फॅशनेबल तरुण स्त्रियांसमोर भारी लाजतो. परंतु खालच्या दर्जाच्या तरुणींशीं त्याचं वागणं अगदीं वेगळ्या प्रकारचं असतं."

इकडे हेस्टिंग्ज आणि मार्लो ही मित्रांची जोडी हार्डकॅसल मंडळीच्या घराकडे यायला म्हणून निघाली. वाटेंत त्यांचा रस्ता चुकला आणि ते दोघे एका दारूच्या गुत्त्यांत येऊन दाखल झाले. तिथें टोनी आपल्या दोस्तांना जमवून यथेच्छ मद्यपान करीत असलेला त्यांना दिसला. या दोघांना टोनीनें लगेच ओळखलें आणि आपल्या सावत्र वडिलांना चांगलेंच बनवायचें असें त्यानें ठरवून टाकलें. हेस्टिंग्ज आणि मार्लो या दोघांनीं त्याला हार्डकॅसल मंडळीच्या घराची वाट विचारली. टोनी त्यांना म्हणाला : "तुमचा रस्ता भलताच चुकला आहे हो. आतां असं करा. याच रस्त्यानं थोडे पुढं जा. तिथं एक खानावळ लागेल त्या खानावळींत तुम्ही तूर्त मुक्काम करा. येवढा शहाणपणा अगोदर करा. पुढचं पुढं मग बघूं या."

मार्लो नि हेस्टिंग्ज त्या ठिकाणीं येऊन पोंचले. त्यांना वाटलें कीं टोनीनें वर्णन केलेली खानावळ हीच असावी. त्यांच्या या चुकीच्या समजुतीचा मिस्टर हार्डकॅसलला कसलाच थांगपत्ता नव्हता. त्यानें या दोघांची पाहुणे म्हणून उत्तम सरबराई केली. हेस्टिंग्ज आणि मार्लो हे मात्र त्याला खानावळवाला समजून त्याच्याशीं तसेच वागले. याचा परिणाम असा झाला कीं मिस्टर हार्डकॅसल हे दोघे अत्यंत उर्मट इसम आहेत असें समजूं लागला आणि याच्या उलट हे दोघे मित्र हा अत्यंत उर्मट खानावळवाला आहे असें समजूं लागले. मार्लो ही व्यक्ति म्हणजे एक अगदीं भिडस्त माणूस आहे असें जें त्याचें वर्णन

आपल्याजवळ चाललेलें होतें त्या वर्णनाच्या अगदीं विरुद्ध वृत्तीचा हा मार्लो दिसतो असें मिस्टर हार्डकॅसलनें तर ठरवूनच टाकलें.

हेस्टिंग्ज आणि कॉन्स्टन्स यांची भेट झाल्यावर या सगळ्या घोटाळ्यामध्यें टोनीचाच हात असला पाहिजे हें तिनें चटकन ओळखलें. परंतु हेस्टिंग्ज आणि कॉन्स्टन्स या दोघांनीं हें रहस्य इतर कुणाला उघड करून सांगायचें नाहीं असा निर्णय घेतला. यांतून काय काय गमती निर्माण होतात हें त्या दोघांना बघायचें होतें. म्हणून हेस्टिंग्जनें मार्लोजवळ असा खुलासा केला कीं "या दोघी तरुणी तुला दिसताहेत ना, त्या खेड्यावरून लांबचा प्रवास करून या खानावळींत मुक्कामाला आलेल्या आहेत." टोनीची स्वारी घरीं आल्यावर त्याला बाजूला बोलावून घेऊन हेस्टिंग्जनें सांगितलें : "मला कॉन्स्टन्सशीं लग्न करायचंय. मी तिलाच मागणी घालायला आलोंय." त्या बदमाशाला हा बेत अगदीं समाधानकारक वाटला. त्यानें या प्रेमी जोडप्याला मदत करायचें आश्वासन दिलें. याच्याहि पुढें जाऊन तो म्हणाला : "हिचे दागिने आईच्या ताब्यांत आहेत. तेहि मी तुम्हांला मिळवून द्यायचा प्रयत्न करीन." सौदा तर ठरला. मग टोनी सरळ आपल्या आईच्या खोलींत गेला आणि तिथून ते दागिने चोरून घेऊन आला. हे दागिने त्यानें हेस्टिंग्जच्या हवालीं करून टाकले.

कॉन्स्टन्सनें आपल्या दागिन्यांची मागणी मिसेस हार्डकॅसलजवळ केली. तेव्हां टोनी हळूच आपल्या आईच्या कानांत कुजबुजला : "आई, हे दागिने हरवले असं तूं कॉन्स्टन्सला सांगून टाक." ही योजना फार नामी आहे असें समजून मिसेस हार्डकॅसलनें आपल्या दिवट्या चिरंजिवांच्या सूचनेनुसार कॉन्स्टन्सला सांगायचें कबूल केलें. परंतु मागाहून तिला असा पत्ता लागला कीं हे दागिने खरोखरीच बेपत्ता झालेले आहेत.

दरम्यान केटनें आपल्या वडिलांशीं केलेल्या करारानुसार साधा पण गोड असा पोशाख केला.

आपण एका सभ्य गृहस्थाच्या घरीं आलेलों नसून एका खानावळींत आपला मुक्काम आहे अशी मार्लोची चुकीची समजूत झाली असल्याचें केटला कळलें. तिनें त्याची ही चुकीची समजूत तशीच राहूं द्यायची असें ठरविलें. साधासुधा पोशाख केलेल्या केटला बघून मार्लोला असें वाटलें कीं ही या खानावळींतली वाढपीण असावी. म्हणून आपण खोट्या प्रेमाचा बहाणा करणारे

अक्कडबाज इसम आहोंत असें त्यानें आपलें स्वरूप तिच्या समोर उघड करून दाखविलें. तो तिचें चुंबन घ्यायचा प्रयत्न करूं लागला. येवढ्यांत मिस्टर हार्डकॅसल त्या खोलींत आला. त्याबरोबर मार्लोनें तिथून पळच काढला.

त्याचा हा प्रताप बघून मिस्टर हार्डकॅसल म्हणाला: "ए केट, आतां तरी तुझी खात्री झाली ना? हा मार्लो म्हणजे एक भिडस्त तरुण नाहीं याचा प्रत्यंतर पुरावा तुला उघड उघड मिळालाय आतां." यावर केट आपल्या वडिलांना उद्देशून प्रतिज्ञापूर्वक म्हणाली: "बाबा; मार्लो यांचं चारित्र्य तुम्हांला नि मला दोघांनाहि आवडेल अशाच प्रकारचं आहे याबद्दल मी तुमची खात्री करून देईन." तरीहि मार्लोचा उद्धटपणा त्या घरांत तसाच चालूं राहिला. शेवटी मिस्टर हार्डकॅसलला त्याचें हें वागणें अगदीं असह्य झालें; त्याला त्याची इतकी अनावर चीड आली कीं त्यानें त्याला घरांतून चालता व्हायला सांगितलें.

आपल्या भावी वराची झाली येवढी फसगत पुरी झाली, आतां त्याला खरा प्रकार सांगायला हरकत नाहीं, असा केटनें विचार केला, आणि टोनीनें कसकशा थापा मारल्या हे तिनें मार्लोला सांगितलें, परंतु केट ही खरोखरी कुणाची कोण याचा मार्लोला अजून पत्ताच नव्हता. तिच्या प्रेमांत आपण जास्त-जास्तच गुरफटत आहोंत असें त्याला आढळून येऊं लागलें. इकडे केटलाहि हा फारच छान आणि प्रामाणिक इसम आहे असा शोध लागत होता.

टोनीनें आपली आई मिसेस हार्डकॅसल हिच्या ताब्यांतले जे दागिने चोरले, ते हेस्टिंग्जच्या स्वाधीन केले आणि हेस्टिंग्जनें ते आपला जिवलग मित्र मार्लो याच्याजवळ दिले. या मौल्यवान वस्तु नीट संभाळून ठेवायला हव्यात. आणि मिसेस हार्डकॅसल ही तर खानावळवाल्याची पत्नी आहे असें मार्लो समजत होता. म्हणून हे दागिने त्यानें मिसेस हार्डकॅसलकडेच नीट संभाळून ठेवण्यासाठीं धाडून दिले. या सगळ्या प्रकाराचा अर्थच त्या बाईला उमगेना. ती हैराण झाली. तेव्हां टोनीच्या सांगीवरून नोकरांनीं असा खुलासा केला कीं घरांतल्याच आवराआवरींत कांहीं घोटाळा झाल्यामुळें हे दागिने गळबटले होते आणि ते पुन्हां सांपडले. हा खुलासा ऐकल्यावर त्या बिचारीचा जीव एकदांचा भांड्यांत पडला.

तेवढ्यांत कॉन्स्टन्सला घेऊन पळून जाण्याचा बेत हेस्टिंग्जनें केला आहे असा मिसेस हार्डकॅसलला पत्ता लागला. त्याबरोबर ती भयंकरच संतापली. याबद्दल

शिक्षा म्हणून कॉन्स्टन्सला तिनें तिची मावशी पेडिग्री हिच्या भेटीला पाठवायचें ठरविलें. या गोंधळांत भरीला भर म्हणूनच कीं काय, मार्लोचें वडील सर चार्ल्स हे हार्डकॅसल मंडळीच्या भेटीला यायला निघाले आहेत अशी बातमी आली.

मिसेस हार्डकॅसलची गाडी हांकायचें काम टोनीनें आपल्या अंगावर घेतलें. परंतु मिसेस हार्डकॅसल व कॉन्स्टन्स या दोघींना पेडिग्री मावशीच्या घरीं सरळ न्यायच्या ऐवजीं टोनीनें तीन तास त्याच त्याच वाटेनें सतत चकरा चालू ठेवल्या. त्यामुळें मिसेस हार्डकॅसलला असें वाटलें कीं आपला रस्ता चुकला. मग टोनीनें आईला गाडींतून उतरविलें आणि तिला बिचारीला घाबरलेल्या स्थितींत एका झुडुपाआड लपवून ठेवलें. मग टोनी तसाच कॉन्स्टन्सला परत हेस्टिंग्जकडे घेऊन गेला. परंतु आपले दागिने घेतल्याशिवाय हेस्टिंग्जकडे जायचें नाहीं असा कॉन्स्टन्सचा पक्का निश्चय होता. शेवटीं टोनीची ही कृति मिसेस हार्डकॅसलला कळली. मग तिचा जो काय संताप झाला, त्याला कांहीं सुमारच राहिला नाहीं.

सर चार्ल्स एकदांचे हार्डकॅसल मंडळींच्या घरीं आले. मार्लोच्या हातून जी चूक झाली, तिची हकीकत मिस्टर हार्डकॅसलनें सांगितली. ती ऐकून सर चार्ल्स यांना खूपच मौज वाटली. मात्र मार्लोचें प्रेम केटवर आहे याबद्दल सर चार्ल्स यांची मिस्टर हार्डकॅसलनें खातरजमा केली. परंतु आपल्याला मिस हार्डकॅसलशीं कांहीं एक कर्तव्य नाहीं असें मार्लोनें चक्क सांगून टाकलें. यामुळें दोघां भावी व्याह्यांची भलतीच पंचाईत झाली. तेव्हां केटनें उभयतांना असें आश्वासन दिलें कीं “ मार्लोचं माझ्यावर प्रेम आहे हें मी तुम्हांला सप्रमाण सिद्ध करून दाखवितें. तुम्ही दोघे जरा इकडे बाजूला लपून बसा. आणि मी मार्लोशीं बोलणं करत्यें. ”

बिचारा मार्लो! त्याची अजूनहि अशी समजूत होती कीं केट ही वाढपीणच आहे. त्यानें तिला सांगून टाकलं कीं “ माझं तुझ्यावर फार प्रेम आहे; मला तुझ्याशींच लग्न करायचंय. ” हें ऐकतांक्षणीं सर चार्ल्स व मिस्टर हार्डकॅसल हे दोघे आपापल्या गुप्त जागेंतून पुढें सरसावले. त्यांचें समाधान झालें. लग्न ठरणार याबद्दल त्यांच्या मनांत आतां कसलाच किंतु राहिला नाहीं. मात्र जिला वाढपीण समजून आपण इतका वेळ येवढें मोकळेपणानें वागलों ती

बाढवीण नसून खरोखरी मिस हार्डकॅसलच आहे हें कळल्यावर मार्लो भलताच बेचैन झाला. पण त्याला आतां इलाज नव्हता. गोष्टी फार पुढें गेलेल्या होत्या.

मिसेस हार्डकॅसलनें आपल्या यजमानांना एका गोष्टीची आठवण करून दिली. ती म्हणाली : "टोनी वयांत आल्यावर त्यानं कॉन्स्टन्सबरोबर लग्न करी-पर्यंत तिच्या सगळ्या इस्टेटीवर माझा संपूर्ण ताबा आहे. परंतु त्यानं जर तिच्याशीं लग्न करायचं नाकारलं तर मात्र कॉन्स्टन्सची सगळी इस्टेट तिच्या ताब्यांत देऊन टाकायला हवी."

पण टोनीनें आपलें चारित्र्य सुधारावें या आशेनें त्याचें खरें वय या लोकांनीं लपवून ठेवलें होतें असा येवढ्यांतच उलगडा झाला. टोनी वयांत आलेला आहे हें आतां त्याला कळलें, त्याबरोबर त्यानें कॉन्स्टन्सशीं लग्न करायला स्वच्छ नकार दिला. मग सर चार्ल्स यांनीं मिसेस हार्डकॅसलची समजूत काढली. ते म्हणाले: "तुम्ही कॉन्स्टन्सबद्दल कांहीं एक काळजी करूं नका. हेस्टिंग्ज तसा फार चांगला मुलगा आहे." आणि कॉन्स्टन्सला तिची पालक मिसेस हार्डकॅसल हिच्याकडून तिचे दागिने ताबडतोब मिळाले.

अशा प्रकारें केटनें मार्लोशीं लग्न केलें; कॉन्स्टन्सनें हेस्टिंग्जशीं लग्न केलें. आणि टोनीला त्याच्या आईच्या तावडींतून स्वतंत्र व्हायला मिळालें.

## स्ट्राइफ : संपलढा

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* जॉन गाल्सवर्दी (१८६७-१९३३). *कथानकाचा प्रकार :* सामाजिक टीका. *काळ :* विसाव्या शतकाचा आरंभ. *स्थळ :* लंडन नजीकचें औद्योगिक शहर. *पहिला प्रयोग :* १९०९.

*प्रमुख पात्रें :* **जॉन ॲन्थनी**, ट्रेनार्था टिन प्लेट वर्क्स या कंपनीचा अध्यक्ष. **एडगर ॲन्थनी**, त्याचा पुत्र. **फ्रॅन्सिस अंडरवुड**, कारखान्याचा व्यवस्थापक. **एनिड अंडरवुड**, त्याची पत्नी आणि जॉन ॲन्थनीची कन्या. **सायमन हार्नेस**, एक ट्रेडयुनियन अधिकारी. **डेव्हिड रॉबर्ट्स**, संपाचा पुढारी. **ॲनी रॉबर्ट्स**, डेव्हिडची पत्नी.

*समीक्षण :* कामगारांचे हक्क अमुक अमुक आहेत असें सांगायला नुकती कुठें सुरवात झाली होती अशा काळांत गाल्सवर्दीनें हें नाटक लिहिलें.

संपाच्या प्रश्नाच्या दोन्हीं बाजूंचें चित्र ' स्ट्राइफ ' हें नाटक सादर करतें. कारण गाल्सवर्दीनें सतत निःपक्षपाती वास्तववादाचीच भूमिका घेतली. हें नाटक त्यांतील सामाजिक आशयामुळें जसें ठळकपणें नजरेंत भरतें, तसेंच त्यांतील कित्येक अगदीं खऱ्याखुऱ्या व प्रभावी स्वभावचित्रांमुळेंहि तें लक्षांत राहतें. या स्वभावचित्रांतच रॉबर्ट व वृद्ध ॲन्थनी यांचाहि प्रामुख्यानें समावेश केला पाहिजे.

*कथानक :* ट्रेनार्था टिनप्लेट वर्क्स या कारखान्यांतील संप एकसारखा चालूच राहिला. तो मिटण्याचें कांहीं एक लक्षणच दिसेना. शेवटीं डायरेक्टरांना आपल्या कंपनीला डिव्हिडंड वाटतां येईल का नाहीं याची धास्ती वाटूं लागली. कामगारांच्या विनंतीवरून सगळे डायरेक्टर मॅनेजर अंडरवुड याच्या घरीं जमले होते. सुरवातीला तडजोडीचें कांहीं तरी बोलणें चालू होतें. परंतु सगळ्यांच्या समोर डायरेक्टर बोर्डाचा पंचाहत्तर वर्षें वयाचा अध्यक्ष जॉन ॲन्थनी याची मूर्ति उभी राहिली. त्यानें तडजोडीची कसलीहि योजना विचारांतच घ्यायला नकार दिला.

ॲन्थनी हा जुन्या जमान्यांतला धंदेवाला होता. काळाची पावलें ओळखून प्रगति करायला त्यानें साफ नकार दिला. त्याच्या लेखीं कारखान्याचा मालक एकच असूं शकत होता. आणि तो मालक म्हणजे खुद्द जॉन ॲन्थनी हाच. डायरेक्टर बोर्डाचा चेअरमन म्हणून आपल्या बत्तीस वर्षांच्या कारकीर्दींत त्यानें चार संप मोडून काढले होते. आणि या वेळींहि आणखी थोडीशी चिकाटी धरली तर या वेळीं देखील म्हणजे पांचव्यांदा संपवाल्यांचा पराभव होईल अशी त्याला खात्री वाटत होती.

त्यानें तडजोडीचीं बोलणीं करायला कडवेपणानें नकार दिल्यामुळें बाकीचे डायरेक्टर लोक जरासे अस्वस्थ झाले. संपावर असलेल्या कामगारांचे व त्यांच्या कुटुंबियांचे किती भयंकर हाल चाललेले होते, त्यांच्यावर पांघरूण घालायचा प्रयत्न कारखान्याचा मॅनेजर अंडरवुड यानें आपल्या रिपोर्टांत अजिबात केला नाहीं. संप जर आणखी असाच चालू राहिला तर कंपनीचे शेअरहोल्डर जोंर-जोरांत निषेध प्रदर्शन करायला लागतील हेंहि डायरेक्टर जाणून होते.

युनियननें संपवाल्यांना आपला असलेला पाठिंबा काढून घेतलेला होता, कारण त्यांच्या मागण्यांपैकीं दोन मागण्या चालू परिस्थितीच्या आटोक्यांत

बसण्याजोग्या नव्हत्या. तरी देखील युनियननें आपला एक अधिकारी सायमन हार्नेस याला मुद्दाम डायरेक्टर बोर्ड व कामगार यांच्या दरम्यान मध्यस्थी करण्यासाठीं धाडून दिलें. ॲन्थनीच्या अडमुठेपणामुळें डायरेक्टरांबरोबरच्या त्याच्या मुलाखतींतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. संपवाल्या कामगारांचे प्रतिनिधी आणि डायरेक्टर यांची भेटहि तितकीच निष्फळ ठरली. जसा ॲन्थनी माघार घ्यायला तयार नव्हता, तसाच संपवाल्या कामगारांचा पुढारी रॉबर्ट्स हाहि तितकाच ताठ होता; तोहि माघार घ्यायला मुळींच तयार नव्हता. उभय पक्षांपुढील पेंचप्रसंग तसाच कायम राहिला.

कामगारांची हलाखी इतकी भयंकर झालेली होती कीं त्यांतले बरेचसे या हलाखीपायीं मालकांना शरण जायला तयार झाले. परंतु रॉबर्ट्सचा निश्चय अढळ होता.

मिसेस रॉबर्ट्स मरायला टेंकली. संपानें सगळ्यांवरच लादलेली उपासमार व थंडी तिच्या आधींच अधू असलेल्या हृदयाला झेपेना. एका काळीं ती मॅनेजर अंडरवुड याच्या घरीं मोलकरीण म्हणून कामावर होती. म्हणून एके दिवशीं तिसऱ्या प्रहराच्या सुमारास एनिड अंडरवुड तिच्या समाचाराला गेली. मिसेस अंडरवुडनें मिसेस रॉबर्ट्ससाठीं जेवण पाठवायचा प्रयत्न करून बघितला होता. परंतु संपवाल्यांचा पुढारी रॉबर्ट्स हा भलताच स्वाभिमानी नि भलताच हट्टवादी माणूस होता. जॉन ॲन्थनीच्या मुलीनें दिलेली मदत स्वीकारणें त्याला बिलकुल प्रशस्त वाटलें नाहीं. मिसेस अंडरवुडनें रॉबर्ट्सची समजूत घालायचा प्रयत्न केला. निदान स्वतःच्या पत्नीसाठीं तरी माघार घे नि संप मिटवून टाक असें तिनें त्याला सांगून बघितलें. परंतु शेवटीं कामगार आपल्या मागण्या मान्य करायला मालकांना भाग पाडूं शकतील अशी त्याला बालंबाल खात्री वाटत होती. या बाबतींत तो फारच कट्टर होता.

संपवाले कामगार व ट्रेड युनियनचा अधिकारी हार्नेस यांची एक बैठक झाली. युनियनच्या सूचना मान्य करायला आणि तडजोडीला बहुतेक संपवाले तयार आहेत ही गोष्ट या बैठकीच्या वेळीं उघड दिसून आली. मागाहून रॉबर्ट्स या बैठकींत आला, तर कामगार त्याचें भाषण ऐकून घ्यायला देखील तयार नसलेले दिसले. परंतु रॉबर्ट्स हा प्रभावी वक्ता होता. "तुम्ही आतां जर शरणागति पतकरायचें नाकारलंत तर तुम्हांला अंतिम विजय नक्की

मिळवितां येईल" हें जेव्हां त्यानें त्यांना पुन्हां समजावून सांगितलें तेव्हां त्यांचा उत्साह पूर्ववत द्विगुणित झाला आणि त्याच्या वक्तृत्वामुळें त्यांची सगळ्या बाबतींत खात्री पटली.

त्याचें भाषण चालू असतांनाच एक तरुणी व्यासपीठाजवळ आली. तिनें त्याला सांगितलें कीं "तुमची पत्नी वारली." या घटनेमुळें संपाचें पारडें फिरलें. आपण जर असाच प्रतिकार चालू ठेवला तर आपल्यावर देखील असाच प्रसंग ओढवल्याखेरीज राहणार नाहीं अशी या शोककारक उदाहरणावरून कामगारांची खात्री पटली आणि त्यांनीं युनियननें सुचविलेल्या तडजोडीच्या अटींना मान्यता देण्याचें ठरविलें.

मिसेस रॉबर्ट्सच्या मृत्यूची बातमी हा कंपनीच्या डायरेक्टरांवर मोठाच आघात होता. एडगर ॲन्थनीला आपल्या वडिलांविषयीं कितीहि आदर असला तरी आतां त्यानें आपल्या सहकाऱ्यांच्या तोंडावर असा आरोप केला कीं "या बाईच्या दुर्धर परिस्थितीला आणि मृत्यूला तुम्ही जबाबदार आहांत." त्याचें हें म्हणणें जवळ जवळ सत्यच आहे असें डायरेक्टरांना देखील वाटलें आणि त्यामुळें ते फार बेचैन झाले. वृद्ध ॲन्थनीनें मात्र स्वतःची प्रकृति अशक्त झालेली असतांना व त्याला स्वतःला आजारपण आलेलें असतांना देखील कंपनीनें माघार घेतां कामा नये असा आग्रह चालूच ठेवला. परंतु डायरेक्टरांनीं त्याच्या प्रतिकूल मताला न जुमानतां कांहीं तरी मार्ग काढायचा निश्चयच केला. आपण जर युनियनच्या तडजोडीच्या अटी मान्य करण्याचें ठरविलें तर ॲन्थनी आपल्या अध्यक्षपदाचा राजिनामा दिल्याखेरीज राहणार नाहीं हें मात्र ते पुरतेपणीं जाणून होते.

त्या दिवशीं संध्याकाळीं संपवाले कामगार, युनियनचा पुढारी हार्नेस आणि डायरेक्टर बोर्डाचे सभासद यांची जी संयुक्त सभा झाली ती अत्यंत क्लेशकारक ठरली. ॲन्थनीच्या सहकाऱ्यांनीं त्याच्याविरुद्ध बहुमत करून निर्णय घेतला. थकल्या भागल्या अवस्थेंत ॲन्थनीनें पराभव मान्य केला आणि आपल्या अध्यक्षपदाचा राजिनामा दिला.

रॉबर्ट्स सकाळीं जो सभेंतून निघून गेलेला होता, त्यानंतर कामगारांनीं काय कृति करायचें ठरविलें यांतलें त्याला कांहीं एक ठाऊक नव्हतें. युनियन पुढारी हार्नेस तडजोडीचा मसुदा पुरा करीत असलेला बघायला तो आतां योग्य

वेळीं मॅनेजर अंडरवुडच्या घरीं हजर झालेला होता. संप सुरू होण्यापूर्वी उभय पक्षांना उद्देशून युनियननें ज्या अटी सुचविलेल्या होत्या त्याच आतां उभयपक्षीं मान्य झालेल्या अटी म्हणून पुढें आल्या. परंतु या तंट्यांतला हा समेट होण्यासाठीं कित्येक महिने कामगारांना भयंकर हाल अपेष्टांना तोंड द्यावें लागलें.

कामगारांचा नेता रॉबर्ट्स व मालकांचा नेता एडगर ॲन्थनी हे दोघे पुढारी एकमेकांकडे रोखून बघूं लागले. दोघांनाहि आपापल्या अनुयायांनीं सोडून दिलें होतें. दोघांचाहि या तडजोडीनें पराभव केलेला होता.

आपण जो धैर्यशाली लढा दिला, त्याची ओळख दोघांना पटली. परस्परांविषयीं त्यांना वाटत असलेल्या द्वेषाचें रूपांतर एकमेकांविषयींच्या कौतुकांत झालें. त्यांना हें आवडत होतें अशांतला भाग नव्हता. परंतु त्यांना एकमेकांविषयीं आदर वाटूं लागला.

## टाम्बुर्लेन द ग्रेट

*वाङ्मयप्रकार :* नाटक. *लेखक :* ख्रिस्टॉफर मार्लो (१५६४-१५९३). *कथानकाचा प्रकार :* अद्भुतरम्य शोकान्तिका. *काळ :* चौदावें शतक. *स्थळ :* आशिया खंड. *पहिला प्रयोग :* १५८७.

*प्रमुख पात्रें :* **टाम्बुरलेन,** सिथियन विजेता. **झेनोक्रेट,** त्याची पत्नी. **बजाझेथ,** तुर्कांचा बादशहा. **काल्लापिने,** त्याचा पुत्र. **मायसेटीस,** इराणचा राजा. **कोस्त्रो,** त्याचा भाऊ. **थेरिडामास, तेचिल्लीस** आणि **उसुमकासाने,** टाम्बुरलेनचे अनुयायी.

*समीक्षण :* सतत पुढें जाण्याची प्रेरणा देणारी महत्वाकांक्षा, या विषयाचा अभ्यास ‘ टाम्बुरलेन द ग्रेट ’ या नाटकांत सादर केलेला असून कवि मार्लो याच्या काव्यरचनेची प्रगल्भता व सुंदरता या गुणांमुळेंहि हें नाटक नजरेंत भरतें. या नाटकांतील काव्य गुणांचें आणखी अधिक विशेषत्वानें कौतुक करायला पाहिजे. कारण इंग्रजी भाषेंत मुक्तच्छंदात्मक काव्यरचनेला जो आरंभ झाला त्यांतल्या पहिल्या वहिल्या कृतींमध्यें या नाटकाची गणना होते. मार्लोचें लेखन इतकें छान वठलें, त्याच्या लेखनांत स्वतंत्र प्रतिभेचे येवढे बहुविध उन्मेष आढळून आले कीं आज शेक्सपियरचीं म्हणून समजलीं जाणारीं कांहीं

नाटकें मार्लोच्याच लेखणींतून उतरलीं असावींत असें अनेक विद्वानांचें मत झालें. निदानपक्षीं शेक्स्पियरपूर्वीच्या नाटककारांमध्यें मार्लो श्रेष्ठ ठरतो येवढें तरी बिनधोकपणें म्हणायला हरकत नाहीं.

*कथानक :* मायसेटीस इराणचा राजा झाला. त्याचा भाऊ कोस्रो यानें बेलाशक नव्या राजाच्या तोंडावर सांगून टाकलें कीं "तूं या राज्यपदाला लायक नाहींस." मायसेटीसला सगळ्यांत जास्त काळजी वाटत असलेल्या गोष्टींपैकीं एक गोष्ट म्हणजे टाम्बुरलेनचे हल्ले ही होती. हा सिथियन लुटारू इराणी जनतेवर हल्ल्यामागून हल्ले चढवीत होता.

हा लुटारूंचा प्रमुख साऱ्या पूर्वेवर राज्य करण्याच्या महत्वाकांक्षेनें प्रेरित झालेला आहे अशा अफवा जिकडे तिकडे पसरल्या म्हणून त्याचें पारिपत्य करण्यासाठीं आणि खुद्द टाम्बुरलेन यालाच पकडून आणण्यासाठीं मायसेटीसनें एक हजार सैनिक बरोबर देऊन थेरिडामास याला मोहिमेवर धाडलें. दुसरा एक सरदार मेनाफोन यालाहि थेरिडामासच्या पाठोपाठ कूच करण्याची त्यानें आज्ञा दिली. तेव्हां राजा मायसेटीस याला उद्देशून कोस्रो कुत्सितपणें म्हणाला : "अरे, मेनाफोन यानं बॅबिलोन प्रांतांतच राहायला हवं. तुझ्यासारख्या नालायक राजाविरुद्ध त्या प्रांतांतले लोक तर बंड करून उठायच्या बेतांत आहेत." ही अपमानास्पद भाषा मायसेटीसला सहन झाली नाहीं. त्यानें आपल्या भावाचा सूड घेण्याची व त्याला चांगली अद्दल घडविण्याची प्रतिज्ञा केली.

"अहो, तुम्हांला राजेसाहेबांच्या धमकीची भीति नाहीं का वाटत ?" असा प्रश्न कोस्रोसमोर मेनाफोननें उपस्थित केला. परंतु कोस्रोनें या इराणी सरदाराला निराळेंच आश्वासन दिलें. तो म्हणाला : "इराणचं राजघराणं पूर्वी साऱ्या जगाला धाकांत ठेवत होतं. अशा राजघराण्याकडे आतां तुच्छतेनं बघायची जी प्रवृत्ति दिसते, ती पाहून मला अतिशय वेदना होतात. म्हणून मलाच आशिया खंडाचा बादशहा करायचं एक कारस्थान चालू झालेलं आहे." त्यानंतर लवकरच एक बंड झालें आणि बंडखोर सरदारांनीं कोस्रोला इराणचा राजमुकुट देऊं केला. कोस्रोनें आपला भाऊ मायसेटीस याचें पारिपत्य करण्यासाठीं थेरिडामासचे हजार सैनिक आपल्या ताब्यांत घेण्याच्या उद्देशानें कूच केलें.

दरम्यान, एका सिथियन टेकडीवर टाम्बुरलेन उभा होता. ईजिप्तच्या सुल्तानाची कन्या झेनोक्रेट हिला त्यानें धरून आणलेली होती. पूर्वी धनगर असलेला हा टाम्बुरलेन आपण यापुढें कोणकोणतीं राज्यें जिंकणार आहोंत याबाबतच्या एकेक भव्य योजना तिला समजावून सांगत होता.

त्याचे अनुयायी तेचिल्लेस आणि उसुमकासाने हे त्याच्या बढायांना प्रतिसाद देत होते. "जिवंत जीव असे तोंवर आम्ही तुमचेच अनुयायी राहूं" अशा आणाशपथा ते टाम्बुरलेनसमोर घेत होते. महत्वाकांक्षी टाम्बुरलेननें आपली सगळी संपत्ति व आपल्या राज्याचें सगळें सामर्थ्य झेनोक्रेट हिच्या चरणीं अर्पण करण्याचें अभिवचन दिलें. तो तिच्या पुरताच प्रेमांत सांपडलेला होता.

अकस्मात मायसेटीसच्या एक हजार घोडेस्वारांनीं टाम्बुरलेनच्या पांचशें पायदळ सैनिकांवर हल्ला चढविला. या लढाईत थेरिडामास व एका काळीं धनगर असलेला टाम्बुरलेन या दोघांची समोरासमोर गांठभेट झाली. टाम्बुरलेनच्या व्यक्तिमत्वाचा विलक्षण प्रभाव थेरिडामासवर पडला. टाम्बुरलेननें त्याला आपला सहकारी होण्याचें आवाहन केलें. मोठमोठ्या राज्यांचा आपल्याला उपभोग घ्यायला मिळेल, अमाप सत्ता आपल्या हातीं येईल, अशा मनोराज्यांत दंग होऊन थेरिडामास त्याचा सहकारी व्हायला कबूल झाला.

टाम्बुरलेननें मिळविलेला हा ताजा विजय आणि त्याचें व्यक्तित्व यांची चर्चा कोस्रो मोठ्या खुषींत येऊन करीत होता. त्यानें आरारिस नदीच्या कांठीं टाम्बुरलेन व थेरिडामास यांना सामील होण्यासाठीं फौज पाठविण्याची तयारी चालविलेली होती. तिथें मायसेटीसच्या फौजांशीं त्यांना सामना द्यायचा होता. या बंडाव्यामुळें मायसेटीस संतापानें नुसता फणफणत होता.

मायसेटीसचा एक अनुयायी मीआन्डर याच्या डोक्यांत एक कल्पना आली. जो कोणी टाम्बुरलेनला जिंकील त्याला आल्बानिया या प्रांताचें राज्य देऊन टाकावें आणि जो कोणी थेरिडामासला पकडून आणील त्याला मेडियाचें राज्य बहाल करावें, अशी ती कल्पना होती. परंतु कोस्रोला जिवंत पकडून आणण्यावर मायसेटीसनें अधिक भर दिला. लुटारू टाम्बुरलेननें आपले अनुयायी पहिल्या प्रथम त्यांना लांचलुचपत देऊं करूनच वश करून घेतले आहेत; त्या

अर्थी त्याच्या या अनुयायांना पुन्हां लांच देऊं करून त्याच्यापासून फोडून अलग करतां येईल अशी मायसेटीसला खात्री वाटत होती.

कोस्रो व टाम्बुरलेन यांची भेट झाली. सिथियन टाम्बुरलेननें आपल्या महान भवितव्याच्या बढाया त्याच्यासमोर मारल्या. टाम्बुरलेनच्या कर्तृत्वावर आपला विश्वास आहे हें कोस्रोला सूचित करायची कामगिरी थेरिडामासनें पार पाडली. टाम्बुरलेनच्या मदतीनें आपल्याला नक्की विजय मिळणार अशी खात्री पटून तेचिल्लेस व उसुमकासाने या दोघां टाम्बुरलेनच्या सरदारांना कोस्रोनें त्यांच्या पराक्रमांबद्दल खास बक्षिसें देण्याचें अभिवचन दिलें.

अपेक्षेप्रमाणें मायसेटीसचा पराभव झाला. या विजयानंतर टाम्बुरलेननें निराळाच डाव रचला. त्यानें कोस्रोवरच हल्ला चढविण्याचें ठरविलें. "तुम्ही जर कोस्रोवर स्वारी केलीत तर मी तुम्हांला वेगवेगळीं स्वतःचीं स्वतंत्र राज्यं बहाल करीन" असें आमिष त्यानें थेरिडामास, तेचिल्लेस व उसुमकासाने या तिघांनाहि दाखवून या लांचेच्या बळावर त्या तिघांना वश करून घेतलें. टाम्बुरलेनचें हें उर्मट साहस बघून कोस्रो तर थक्कच झाला. त्यानें लढाईची तयारी केली. या लढाईत कोस्रो जायबंदी झाला. टाम्बुरलेनला सहजासहजीं विजय मिळाला. या विजयानंदानें बेहोष होऊन त्यानें स्वतःच्याच नांवानें इराणचा राजा म्हणून ग्वाही फिरविली.

अल्जीयर्सच्या दरबारांत फेझ, मोरोक्को व अल्जीयर्स या तीन देशांचे राजे जळफळत आपसांत मसलत करीत होते. ग्रीकांच्या कॉन्स्टान्टिनोपल शहराला आपण दिलेला वेढा आतां आपल्याला उठविणें भाग पडणार असें त्यांना दिसूं लागलें. कारण इराणचें राज्य जिंकून घेणारा हा लुटारू टाम्बुरलेन त्यांना तशी धमकी देत होता. तुर्कांचा राजा बजाझेथ यानें टाम्बुरलेनकडे निरोप धाडला. "तूं जर आफ्रिकेच्या भूमीवर पाऊल ठेवायचं साहस केलंस तर याद राख," अशी त्यानें या निरोपांतून टाम्बुरलेनला धमकी दिली. दरम्यान आफ्रिकन राजांनीं ग्रीसला वेढा देऊन ग्रीस जिंकून घ्यायचा बेत ठरवून टाकला.

झेनोक्रेटला आतां हळू हळू टाम्बुरलेनचें वाढतें कौतुक वाटायला लागलें होतें. तो आतां तुर्की राजांचीं राज्यें जिंकायची कारस्थानें करूं लागला. बजाझेथ राजाची राणी झाबिना हिनें झेनोक्रेटविषयीं तुच्छता दर्शविली आणि तिला

टाम्बुरलेनची रखेली म्हणून संबोधलें. टाम्बुरलेननें तुर्कांचा पराजय केल्यावर झाबिनाला गुलाम केलें आणि तिला झेनोक्रेटची दासी बनविलें.

सिथियन टाम्बुरलेनच्या सत्तापिपासेचा यानंतरचा बळी म्हणजे ईजिप्तचा सुल्तान. या सुल्तानाचीच मुलगी झेनोक्रेट. टाम्बुरलेननें आपल्या सामर्थ्याचें प्रदर्शन करण्यासाठीं बजाझेथला एका पिंजऱ्यांत कोंडून ठेवलें आणि या कैद्याच्या पिंजऱ्याचा उपयोग आपल्या पायांना आधारादाखल स्टूल म्हणून करून त्यानें या तुर्की राजाची अत्यंत हीन विटंबना चालविली. असें असून देखील बजाझेथ आणि झाबिना यांनीं अत्यंत धैर्यशालीपणानें आपल्या धन्याला तुच्छ लेखणारे उद्गार त्याच्या तोंडावर फेंकून आणि त्याला धमक्या देऊन त्याची मानखंडना सतत चालू ठेवली.

टाम्बुरलेनच्या फौजा दमास्कस शहर जिंकून घ्यायच्या तयारीला लागल्या. झेनोक्रेटनें हळूंच आपल्या प्रियकराला सुचविलें कीं "माझ्या वडिलांच्या या शहराशीं जरा दयाळूपणानें वागा." परंतु टाम्बुरलेननें या गोष्टीला साफ नकार दिला. झेनोक्रेटला या गोष्टीचें फार दुःख झालें. शेवटीं टाम्बुरलेननें तिला असें वचन दिलें कीं "दमास्कसचा पाडाव केल्यानंतर तुझ्या वडिलांच्या केंसालाहि धक्का लागणार नाहीं अशी खबरदारी मी घेईन."

आतां या सिथियन विजेत्याचें झेनोक्रेटवर खूपच प्रेम बसलें होतें. त्यानें दमास्कसहून आलेल्या तिघां राजदूतांना ठार मारून टाकण्याचा आदेश दिला आणि त्याच वेळीं आपल्या प्रियतमेच्या सौंदर्याचा व नाजुकपणाचा विचार मनांत येऊन त्याच्या अंतःकरणाला गोड गुदगुल्या झाल्या. इकडे खुद्द झेनोक्रेट-चीहि मनःस्थिति द्विधा झालेली होती. एकीकडे आपल्या प्रियकराच्या क्रूर वर्तनाबद्दल तिच्या सदसद्विवेकबुद्धीला भयंकर चीड वाटत होती, तर दुसरीकडे त्याच्याविषयींच्या प्रेमानें ती अगदीं विव्हल होत होती.

टाम्बुरलेननें ईजिप्तच्या सुलतानाला झेनोक्रेटसमोर हजर केलें. विजेत्यानें सुलतानाचें राज्य त्याला परत देऊन टाकण्याचें वचन दिलें. परंतु त्यासाठीं एक अट घातली. झेनोक्रेटनें ईजिप्तची राणी ही पदवी स्वीकारली पाहिजे ही ती अट. ही अट तिनें खुषीनें तत्काळ मान्य केली आणि मग टाम्बुरलेननें आपलें झेनोक्रेटशीं लग्न लावून घेण्याचा बेत पक्का ठरविला.

तुर्की राजा बजाझेथ आणि त्याची राणी झाबीना यांना टाम्बुरलेननें ज्या

पिंजऱ्यांत कोंडून कैदेंत ठेवलें होतें त्या पिंजऱ्याच्या गजांवर डोकीं आपटून घेऊन दोघांनीं प्राण दिले.

नाटोलियाचा राजा ओर्कानेस हा हंगेरीचा राजा सिगिसमुंड याच्याशीं लढाई करायची तयारी करीत होता. तेवढ्यांत त्याला कळलें कीं टाम्बुरलेननें आपल्यावर हल्ला करण्यासाठीं फौजांची जमवाजमव चालविलेली आहे. तेव्हां त्यानें युरोपमधील सगळ्या ख्रिस्ती राजांना निमंत्रण धाडलें. या सिथियन विजेत्याच्या स्वारीला सगळ्यांनीं मिळून एकजुटीनें तोंड द्यावें असें ठरलें. मुसलमान ओर्कानेस व ख्रिस्ती सिगिसमुंड हे एका काळचे वैरी. परंतु यांनीं एकमेकांशीं मैत्रीचा तह केला आणि बुडा व बोहेमिया या देशांच्या राजांना त्यांनीं या तहामध्यें सामील करून घेतलें.

तुर्कस्तानचा राजा बजाझेथ याचा पुत्र काल्लापिने हा टाम्बुरलेनच्या कैदेंत होता. आपल्यावर पाहरा करणारा आल्मेडा याला या तरुण राजपुत्रानें लांच देऊं केली. "मला इथून पळून जायला जर तूं मदत केलीस तर मी तुला श्रीमंत करीन, तुला सत्ता देईन" अशीं आमिषें त्यानें आल्मेडापुढें ठेवली.

टाम्बुरलेनला एव्हां तीन पुत्र झाले. कालिफास, आमिरास आणि सेलेबिनुस अशीं या तिघांची नांवें. कालिफासनें आपली आई झेनोक्रेट हिच्या सहवासांत शांततेनें जीवन जगण्याची इच्छा प्रदर्शित केली.

टाम्बुरलेनच्या विरुद्ध युरोपमधील राजे लोकांनीं केलेला मैत्रीचा तहनामा टिकला नाहीं. मुसलमान राजा ओर्कानेस यानें ख्रिस्ती राजांशीं लढणाऱ्या आपल्या फौजा मागें घेतल्याबरोबर सिगिसमुंड यानें आपल्या ख्रिस्ती दोस्त राजांना ओर्कानेसवर हल्ला करायची चिथावणी दिली. यामुळें ओर्कानेस चांगलाच कोंडींत सांपडला; कारण तो त्याच वेळीं टाम्बुरलेनवरील स्वारीची तयारी करीत होता. ख्रिस्ती राजांनीं दगा दिलेल्या या मुसलमान ओर्कानेस राजानें आपल्या शत्रूंचा धर्म-संस्थापक जो येशू ख्रिस्त त्याचीच करुणा भाकली आणि या दगाबाजांचा पराभव करण्यासाठीं येशू ख्रिस्ताची मदत मागून त्यानें स्वतःच्या बचावाची तयारी केली. पुढें झालेल्या लढाईत ख्रिस्ती सिगिसमुंड मारला गेला आणि मुसलमान ओर्कानेस विजयी झाला.

झेनोक्रेट आजारी पडली. त्या दुखण्यांत तिचा अंत झाला. तिच्या

वियोग-दुःखानें टाम्बुरलेन इतका वेडापिसा झाला कीं स्वतःला मरण येईपर्यंत तिच्या शवपेटिकेचें दफन करायचें नाहीं असा त्यानें हुकूम सोडला.

तुर्की राजपुत्र काल्लापिने हा आल्मेडाच्या मदतीनें तुरुंगांतून पळाला. त्यानें आपल्या वडिलांच्या राज्यांत परत जाऊन टाम्बुरलेनचा पराभव करण्यासाठीं व आपले वडील बजाझेथ यांच्या मृत्यूचा बदला घेण्यासाठीं दोस्तांची जमवाजमव चालू केली. काल्लापिनेच्या फौजांना तोंड देण्यासाठीं टाम्बुरलेनें तयारी चालविली. सिथियन विजेत्याचे दोघे मुलगे आमिरास आणि सेलेबिनुस हे लढायला उत्सुक झालेले होते. परंतु कालिफासला आपल्या वडिलांची रक्तपाती कारकीर्द बिलकुल आवडत नव्हती. कालिफासनें या लढाईत सामील व्हायला साफ नकार दिला.

टाम्बुरलेन आपल्या तुर्की शत्रूंचा धुव्वा उडवून परत आपल्या शिबिरांत आला. हा सारा वेळ कालिफास आपल्या तंबूतच मुक्काम करून होता. टाम्बुर-लेनला पुत्राच्या या निष्क्रियतेची चीड आली आणि त्यानें त्याला सुरा भोंसकून ठार केलें. मग त्यानें तुर्की राजांना, घोड्यांना लगाम घालतात तसे लगाम घातले, आणि त्यांना आपल्या रथाला जुंपून चाबकाचे फटकारे लगावीत आपला रथ ओढायला लावलें.

नंतर या सिथियन विजेत्यानें बॅबिलोन शहर सर करण्याची योजना आंखली. हें शहर जिंकल्यावर शहरांत लुटालूट, खून व बलात्कार यांचा भयंकर हैदोस माजला. टाम्बुरलेन आतां सत्तामदानें अगदीं धुंद झालेला होता. त्याला विरोध करायला काल्लापिने हा एकटाच अद्याप खुला राहिलेला होता.

कसल्या तरी रहस्यमय दुखण्यानें टाम्बुरलेन आजारी झाला. त्याच्या हकिमानें त्याला सांगून टाकलें कीं "या दुखण्यांतून तूं आतां वांचत नाहींस. तुझी घटका भरत आली." मरायला टेंकलेल्या या विजेत्यानें आपला पुत्र आमिरास याला आपल्या साम्राज्याच्या गादीवर बसविलें आणि मग त्यानें झेनोक्रेटची शवपेटिका मागविली. आपल्या पुत्राला सत्तेनें राज्यकारभार चाल-विण्याचा आदेश देऊन टाम्बुरलेननें—परमेश्वरानें जगांतील मानवांचा छळ करायला धाडून दिलेल्या या विजेत्यानें—आपली प्रियतमा झेनोक्रेट हिच्या शवपेटिकेवर अंग टाकून प्राण सोडला.

# चार्ल्स ओ'माली

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* चार्ल्स लिव्हर (१८०६-१८७२). *कथानकाचा प्रकार :* चित्रविचित्र घटनांनीं नटलेली अद्भुतरम्य कथा. *काळ :* १८०८-१८१२. *स्थळ :* आयर्लंड आणि युरोप खंड. *प्रथम प्रकाशन :* १८४१.

*प्रमुख पात्रें :* **चार्ल्स ओ'माली**, आयरिश रिसालदार. **गॉडफ्रे ओ'माली**, त्याचा चुलता. **विल्यम कॉन्सिडाइन**, या कुटुंबाचा स्नेही. **कॅप्टन हॅमर्स्ली**, ओ'माली याचा प्रतिस्पर्धी. **जनरल डॅशवुड. ल्यूसी डॅशवुड**, त्याची कन्या.

*समीक्षण :* 'चार्ल्स ओ'माली' अर्थात् 'द आयरिश ड्रॅगून ही आयरिश अद्भुतरम्य शैलीनें नटलेली हलकीफुलकी कादंबरी आहे. नांवापुरतें कथानक आणि कशी तरी केलेली रचना हें तिचें वैशिष्ट्य. आयरिश वीरांचे पराक्रम आणि त्यांचा कावेबाजपणा यांचें वर्णन करणाऱ्या विपुल कहाण्या व आख्यायिका, आणि नेपोलियनच्या काळांतील लढायांचें अत्यंत अद्भुतरम्य चित्रण, यांमुळें या कादंबरीला महत्व आलें. खोकडाची शिकार आणि मेजवानी यांच्या संमिश्रणासारखेंच युद्ध हें देखील या आयरिश रिसालदाराच्या लेखीं एक गमतीशीर व साहसमय प्रकरण ठरतें. वाचकाचें निव्वळ मनोरंजन करण्यासाठीं लिहिलेल्या ग्रंथांमध्यें या कादंबरीचा नंबर बराच वरचा लागतो.

*कथानक :* उंची भरपूर, खांदे रुंद, निशाणबाजी अचूक आणि घोड्यावरील मांड पक्की, अशी चार्ल्स ओ'माली याची तयारी सतरा वर्षांच्या वयालाच झाली. गॉडफ्रे ओ'माली याचा पुतण्या म्हणून शोभावा असें औदार्य आणि इज्जतीची चाड हे गुण त्याच्या अंगीं भरपूर प्रमाणांत होते. गाल्वे येथील ओ'माली किल्ल्याचा मालक गॉडफ्रे हा अजूनहि चांगला घोडेस्वार व उदार मद्यपी म्हणून प्रख्यात होता. शानॉन नदीला लागूनच त्याचा हा मोडकळीला आलेला जुना किल्ला असून आपल्या कुळांचें एकनिष्ठ प्रेम त्यानें संपादन केलेलें होतें.

वृद्ध गॉडफ्रे हा आयरिश पार्लमेंटच्या निवडणुकीला उभा राहिला. निवडणूक मोहिमेच्या काळांत घर सोडणें न जमल्यामुळें त्यानें आगामी निवडणुकींत

आपल्याला पाठिंबा देण्याची मागणी करण्यासाठीं ब्लेक नामक आपल्या एका दूरच्या नातलगाला भेटायला चार्ल्स याला धाडून दिलें. परंतु ब्लेक पडला विरोधी पक्षांतला माणूस. आणि आपल्या चुलत्याला पाठिंबा मिळविण्यासाठीं चार्ल्स यानें आपल्या परी प्रयत्नांची शिकस्त केली असली तरी एकंदर परिस्थिती कशी हाताळावी हें कांहीं त्याला विशेषसें कळलें नाहीं.

ल्यूसी डॅशवुड ही या बिकट परिस्थितीला अंशतः कारणीभूत झाली. ती आणि तिचे वडील जनरल डॅशवुड अशीं दोघें त्याच वेळीं ब्लेक याजकडे आलीं. जनरल साहेब गाल्वे येथें एखादी चांगली इस्टेट विकत घ्यायच्या खट-पटींत होते. जनरल साहेबांचा ए. डी. सी. कॅप्टन हॅमर्स्ली हा ल्यूसीच्या पुढें पुढें करीत होता म्हणून त्याच्याविषयीं चार्ल्स याच्या मनांत असूया उत्पन्न झाली. खोक-डाच्या शिकारींत प्रथम चार्ल्सनें आघाडी मारली परंतु हॅमर्स्ली यानें त्याला गांठलें. एका भिंतीवरून उडी घेतांना चार्ल्सचा घोडा मागें पडला. प्रशांत बेडरपणानें चार्ल्स आपला घोडा दामटीत राहिला आणि दोन्ही बाजूंना दगडी बांधकाम असलेल्या एका नाल्यावरून त्यानें आपला घोडा पार केला. आपणहि कांहीं कमी नाहीं हें दर्शविण्यासाठीं हॅमर्स्ली यानें त्याच नाल्यावरून उड्डाण केलें खरें, पण तो धाडकन खालीं आदळला. शिकार साधण्यांत चार्ल्स यानें पहिला नंबर पटकावला, पण तो आणि हॅमर्स्ली या दोघांनाहि कित्येक दिवस बिछान्यांत पडून राहावें लागलें.

एके रात्रीं भोजनाच्या प्रसंगीं पाहुण्यांपैकीं एकानें गॉडफ्रे ओ'माली यांजविषयीं उपमर्दकारक उद्गार काढले. त्याबरोबर चार्ल्सनें दारूचा पेला त्याच्या तोंडावर फेंकून मारला. गाल्वे येथील अन्य कोणाहि आयरिश माणसा-पेक्षां अधिक द्वंद्व युद्धांमध्यें भाग घेतलेला बिली कॉन्सिडाइन यानें चार्ल्स याचा पुरस्कर्ता म्हणून द्वंद्व युद्धाची व्यवस्था केली. आपला प्रतिस्पर्धी मेला असें समजून चार्ल्स द्वंद्व युद्धाच्या रणक्षेत्रावरून निघून गेला. सुदैवानें तो इसम बरा झाला आणि म्हणून आपल्या आततायीपणाचे गंभीर परिणाम चार्ल्स याला भोगावे लागले नाहींत.

चार्ल्स कायद्याच्या अभ्यासासाठीं डब्लिन शहरीं गेला. योगायोग असा कीं फ्रँक वेब्लर हा सहाध्यायी त्याच्या खोलीचा भागीदार झाला. मेजवान्या झोडणें, तंटे बखेडे करणें आणि अनेक उचापतींतून सुटका करून घेणें या

सगळ्या गोष्टी फ्रॅंकच्या नेतृत्वाखालीं करणें, हाच चार्ल्स याच्या लेखीं कॉलेजमधील जीवनाचा इत्यर्थ होता.

डब्लिन येथील वास्तव्यांत त्यानें ल्यूसीची पुन्हां भेट घेतली. परंतु ती आतां त्याच्यापासून दुरावलेली दिसली. हॅमर्स्ली तिला जास्त आवडला. चार्ल्स याला अभ्यास जमेना म्हणून लष्करी जीवनाविषयीं आणखी वाढतें आकर्षण वाटूं लागलें. आपण जर धाडसी रिसालदार झालों तर ल्यूसी कदाचित आपल्याला पसंत करील अशी त्याची भावना दिसली. जनरल डॅशवुड यांच्या मार्फत गॉडफ्रे यांनीं त्याला लष्करी अधिकारपद मिळवून द्यायची व्यवस्था केली आणि चार्ल्स याला एन्साइनपद मिळालें.

त्याला पहिली कामगिरी मिळाली पोर्तुगाल देशांत. नेपोलियननें त्या द्वीपकल्पावर स्वारी केली होती. आणि इंग्लंड आपल्या पोर्तुगीज व स्पॅनिश दोस्तांना मदत पाठवीत होतें. लिस्बन शहरीं चार्ल्स याच्या उत्कृष्ट अश्वारोहण कौशल्यामुळें डॉना इनेझ हिला दुखापत व्हायची टळली. तिच्याशीं त्याची मैत्री झाली. या मैत्रीची प्रगति समाधानकारक रीतीनें होत असतांनाच त्याला कळलें कीं डॉना ही ल्यूसी डॅशवुड हिची जिवलग मैत्रीण आहे.

चार्ल्स यानें आपणहून रणांगणावरील कामगिरी मागून घेतली. लढाईत त्यानें लवकरच चांगलें शौर्य गाजविलें आणि त्याला बढती मिळून तो लेफ्टेनंट झाला.

हॅमर्स्ली याला देण्यासाठीं ल्यूसीनें आपलीं पत्रें त्याच्या हवालीं केलेलीं होतीं. तीं पत्रें त्यानें दिलीं तेव्हां हॅमर्स्लीचा चेहरा पडला आणि त्यानें चार्ल्सचा उपमर्द केला. उभयतांचें त्या वेळीं द्वंद्व युद्धच व्हायचें, परंतु कॅप्टन पॉवर्स यानें वेळींच समजूत घातल्यामुळें तो प्रसंग टळला.

चार्ल्स यानें तालावेरा व सिउदाद रॉडरिगो येथील लढायांमध्यें भाग घेतला. एका चकमकीच्या प्रसंगीं तो अंधाराचा फायदा घेऊन फ्रेंचांच्या खंदकांत चोरून घुसला आणि तिथला त्यांच्या इंजिनियरांचा अंतर मोजायचा टेप त्यानें अशा रीतीनें हालवून ठेवला कीं ब्रिटिशांच्या तोफखान्याचा मारा जिथें नेमका होणार होता तिथेंच फ्रेंचांनीं आपले खंदक खणले. जिथें जिथें चार्ल्स जाई तिथें तिथें त्याचा ऑर्डर्ली मायकेल फ्री हा आपल्या साहेबाच्या शोधार्थ पाठोपाठ हजर राही, त्याच्या गणवेषाचीं बटनें घांसूनपुसून स्वच्छ

ठेवी, त्याच्यासाठीं खाद्यपदार्थ चोरून आणी, आणि त्या भागांतल्या सगळ्या पोरींशीं प्रेमाचे चाळे करी.

चार्ल्स याला बढती मिळून तो कॅप्टन झाल्यावर त्याच्या घरून अशी बातमी आली कीं ओ'माली कुटुंबाच्या इस्टेटींची दुर्दशा चाललेली आहे. खंडाची वसुली कमी होऊं लागली, गहाणदारांच्या मुदती भरत आल्या आणि ग्रॉडफ्रे साहेब संधिवातानें पंगू झाले. चार्ल्स रजा घेऊन घरीं आला, पण तो गाल्वे गांवीं यायच्या थोडें अगोदर त्याचे काका स्वर्गवासी झाले. अनेक कर्जदारांचीं देणीं भागवायला पैसे जवळ जवळ मुळींच नव्हते आणि इस्टेटींचा कारभार कसोशीनें चालवायला पाहिजे होता. काकांच्या एका अखेरच्या पत्रांत त्याला गाल्वे येथें राहा असें लिहिलेलें होतें म्हणून चार्ल्स यानें आपला लष्करी हुद्दा विकून टाकून मुलकी जीवन पतकरावें असें ठरविलें.

बिली कॉन्सिडाइन हा त्याचा सल्लागार झाला. बिलीनें त्याला एक उद्वेगजनक कहाणी सांगितली ती अशीः जनरल डॅशवुड यानें इस्टेट खरेदी करण्यासाठीं एक एजंट गाल्वे गांवीं धाडला. डॅशवुड हा एक उपटसुंभ इंग्रज आहे असें समजून गॉडफ्रेकाकांनीं त्याला कठोर शब्दांत समज देणारें पत्र लिहिलें आणि आयर्लंडमध्यें पाऊल ठेवशील तर खबरदार असा इशारा त्या पत्रद्वारें दिला. संधिवाताची व्याधि असतांना देखील आपण इंग्लंडला जाऊन त्या जनरलशीं दोन हात करूं अशी तयारी काकांनीं दर्शविली. खुद्द बिली यानें थेट डॅशवुड साहेबांना आव्हान धाडून दिलें. जनरलसाहेबांनीं या पत्रांना सौम्य भाषेंत उत्तर धाडलें आणि त्यावरून या गरम डोक्याच्या दोघां आयरिश गृहस्थांना आपल्या इज्जतीचें रक्षण झालें असें वाटलें. परंतु ही सगळी हकीगत ऐकतांना चार्ल्स याचें अंतःकरण जड झालें. ल्यूसी आतां आपल्याला मिळणें कायमचें अशक्य झालें असें त्याला वाटलें. त्यानें दोन वर्षें एकान्तवासांत काढलीं. आपली शेती सोडून तो या मुदतींत जवळ जवळ कुठेंच गेला नाहीं.

एल्बा बेटावरून नेपोलियन परत आल्याची बातमी आली त्या दिवशीं चार्ल्स आणि त्याचा ऑर्डर्ली मायकेल हे दोघे डब्लिन शहरीं होते. तिथल्या तिथें चार्ल्सनें ठरविलें कीं आपण परत फौजेंत दाखल व्हायचें. तो आणि मायकेल लगेच लंडनला गेले. तिथें त्याची नेमणूक जनरल स्टाफवर जुन्याच हुद्यावर झाली.

वॉटर्लूची लढाई व्हायच्या जरा अगोदर तो ब्रुसेल्स शहरीं दाखल झाला. बेल्जियमच्या या राजधानींत खूपच गर्दी उसळलेली होती. जनरल डॅशवुड व ल्यूसी, त्याचप्रमाणें डोना इनेझ व तिचे वडील, ही सगळी मंडळी तिथें होतीं, परंतु चार्ल्स याला एका बाबतींत सुरक्षितता वाटली. कारण कॅप्टन पॉवर्स व इनेझ यांचें लग्न ठरलेलें होतें. एके दिवशीं एका बागेंत ल्यूसी आपल्या वडिलांची वाट बघत एकटीच बसलेली होती. हॅमर्स्ली तिच्याकडे गेला आणि घोगऱ्या आवाजांत तिला विचारूं लागला: "तुझ्याशीं केव्हां तरी लग्न होईल या आशेवर मी राहूं का?" त्यांचें बोलणें चोरून ऐकावें अशी इच्छा चार्ल्सला नव्हती. परंतु हॅमर्स्लीला तिनें वाटाण्याच्या अक्षता दिल्याचें चार्ल्सला ऐकायला मिळालें. नृत्यसमारंभाच्या प्रसंगीं चार्ल्स तिला पुन्हां भेटला. परंतु तिचा दुरावलेपणा व थंडपणा तसाच कायम असल्याचें त्याला दिसलें.

चार्ल्सकडे खास जासुदाची कामगिरी आली. हें काम करीत असतांना त्याला फ्रेंचांनीं पकडून तुरुंगांत डांबलें. आणि काय आश्चर्य! फ्रेंचांविरुद्ध हेरांची योजना केल्याबद्दल प्राणदंडाची शिक्षा झालेला जनरल डॅशवुड त्याच्याच कोठडींत हजर! स्पेनमध्यें दोस्ती झालेला एक फ्रेंच अधिकारी सेंट क्रॉइ यानें त्याला पळून जायला मदत देऊं केली. चार्ल्स यानें निःस्वार्थ बुद्धीनें स्वतः ऐवजीं जनरल डॅशवुड याला पळून जाऊं दिलें. खुद्द नेपोलियननें चार्ल्स याला भेटायला बोलावलें. वॉटर्लूची लढाई अथपासून इतिपर्यंत त्याला फ्रेंच छावणींतून पाहायला मिळाली. परंतु तो संधीचीच वाट बघत होता. फ्रेंच फौजेची दाणादाण झाल्याबरोबर तो परत इंग्लिश छावणीकडे आला.

ल्यूसीच्या वडिलांचे प्राण बांचविण्यासाठीं चार्ल्स यानें जें शौर्यशाली कृत्य केलें, त्यामुळें तिला अतःपर त्याला झिडकारणें अशक्य झालें. चार्ल्स आणि ल्यूसी हें जोडपें गाल्वे गांवीं वास्तव्य करायला परत रवाना झालें. ओ'माली किल्ल्याच्या नव्या मालकिणीच्या स्वागतार्थ आयरिश कुळांनीं आपल्या टोप्या काढून तिला खडी ताजीम दिली.

## द चार्टरहाउस ऑफ पार्मा

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* स्टेंडहॉल (मारी-आंरी बीले,

१७८३-१८४२ ). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक अद्भुतरम्य कथा. *काळ :* एकोणिसाव्या शतकाचीं आरंभींचीं वर्षें. *स्थळ :* इटली. *प्रथम प्रकाशन :* १८३९.

*प्रमुख पात्रें :* **फाब्रिझियो डेल डाँगो**, एक तरुण साहसबाज इसम. **गिना पिएट्रानेरा**, त्याची मावशी. **कौंट मॉस्का**, गिनाचा प्रियकर. **मारियेट्टा**, एक नटी. **क्लेलिया काँटी**, फाब्रिझियो याची रखेली.

*समीक्षण :* फ्रेंच भाषेंतील अद्भुतरम्य गद्याच्या त्यांतल्या त्यांत आरंभींच्या नमुन्यांमध्यें ' द चार्टर हाउस ऑफ पार्मा ' या कादंबरीची गणना होते. कथानकाचें स्थळ इटलींतील पार्मा हें नगर राज्य असून ही कथा लांबलचक व गुंतागुंतीचीं वळणें घेत घेत वाचकाला अनेक विनोदप्रचुर व शोककारक साहसी प्रसंगांतून बेल्जियममधील वॉटर्लूपासून इटलींतील बोलोग्नापर्यंत फिरवून आणते. ही कथा ऐतिहासिक अद्भुतरम्य घाटाची असूनहि तींत सामाजिक आनंदपर्यवसायी घटकांच्या सोबतीला जीवनाच्या विफलतेविषयीं अधिक गंभीर स्वरूपाचें विचारमंथन समाविष्ट केलेलें आहे. या कादंबरींत अथपासून इतिपर्यंत असलेल्या नाट्यमय रंजकतेमुळें तिला फ्रेंच अद्भुतरम्यतावादी अभिजात कलाकृति म्हणून विशेष मान्यता लाभली.

*कथानक :* एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं कॉमो सरोवराच्या कांठावरील ग्रियान्टा या गांवांतील भव्य हवेलींत मार्शेसे डेल डाँगो राहत असत. त्यांचा पुत्र फाब्रिझियो या ठिकाणीं लहानाचा मोठा झाला. वडील तापट स्वभावाचे कवडीचुंबक गृहस्थ. नेपोलियन आणि फ्रेंच लोक यांचा त्यांना भयंकर द्वेष. आई बिचारी या अरेराव नवरोजींच्या धाकांत राहून सदा दुःखी कष्टी अवस्थेंत काळ काढी. कुमारवयांत फाब्रिझियोला सगळ्यांत जास्त आनंद जर कशांत वाटत असेल तर गांव सोडून त्याची विधवा मावशी गिना पिएट्रानेरा हिच्या घरीं मिलान शहरीं जायला मिळण्यांत. गिना आपल्या या देखण्या भाच्याला आपल्या मुलासारखाच मानायची.

वयाचीं सतरा वर्षें पूर्ण होत आल्यावर फाब्रिझियोनें असें ठरविलें कीं आपण नेपोलियनला सामील व्हायचें. त्याच्या या निर्धारामुळें त्याची आई व मावशी यांना चांगलाच हादरा बसला, पण तो अचल राहिला. त्याच्या कवडीचुंबक वडिलांनीं त्याला हातखर्चासाठीं द्यायला बाया मंडळींच्या हातीं कांहीं

एक पद्रं दिलें नाहीं. परंतु त्याच्या मावशीनें लहान लहान हिरे त्याच्या कोटाच्या अस्तरांत शिवून ठेवले. फाब्रिझियोनें खोटा पासपोर्ट मिळविला आणि फल-ज्योतिषाचीं साधनें विकणारा म्हणून पॅरिस गांठलें.

नेपोलियनच्या एका बॅटलियनबरोबर ही स्वारी पॅरिसच्या बाहेर चालली असतां त्याला अटक झाली आणि हेर म्हणून त्याची तुरुंगांत रवानगी करण्यांत आली. बादशहा नेपोलियन याजविषयीं तो उत्साहानें गौरवपर बोलायचा आणि त्याची फ्रेंच भाषा अगदींच सुमार असायची, म्हणून त्याच्याविषयीं फ्रेंचांना संशय वाटे. जेलरच्या प्रेमळ पत्नीनें त्याला तुरुंगांतून सोडून दिलें. तो तसाच पुढें निघाला. लढाईत सामील व्हायला केव्हां मिळेल ही एकच काळजी त्याला लागून राहिली. फौजेबरोबरच्या एका सुस्वभावी बाजारबुणग्याजवळून त्यानें एक घोडा विकत घेतला. योगायोग असा कीं वॉटर्लूच्या लढाईत मार्शल ने याच्या घोडदळांत त्याला शिरकाव करायला मिळाला. एका सेनापतीचा घोडा गोळी लागून मरून पडल्यावर रिसालदारांनीं फाब्रिझियोला घोड्यावरून उचलून खालीं ठेवलें आणि त्याचा घोडा त्या सेनापतीला दिला. पायउतार झाल्यावर तो फ्रेंच पायदळ पलटणींत सामील झाला आणि वॉटर्लू येथून माघार घेतांना त्यानें एका प्रशियन अधिकाऱ्याला ठार मारलें. आपल्याला खराखुरा सैनिक व्हायला एकदांचें मिळालें या आनंदांत त्यानें हातांतली बंदूक फेंकून दिली आणि तिथून पळ काढला.

दरम्यान मिलान शहरीं त्याची मावशी गिना ही पार्मा नगर राज्याचा पंतप्रधान कौंट मॉस्का याच्या अनुनयाला वश झाली. दोघांनीं एकमेकांना सुखाची होईल अशी तरतूद आपसांत करून घेतली. वयोवृद्ध ड्यूक सान्सेव्हेरिना याला एखाद्या राजदरबारी हुद्याची फार गरज होती. मॉस्कानें त्याला हा हुद्दा मिळवून दिला आणि त्याच्या मोबदल्यांत त्यानें गिनाशीं लग्न करून तिला डचेस ऑफ सान्सेव्हेरिना या बहुमानाच्या पदावर बसविलें. नंतर ड्यूकनें स्वदेश कायमचा सोडला आणि मॉस्का याला गिना हिनें आपला प्रियकर म्हणून मान्यता दिली. मावशीला जरासें उच्च पद मिळालें ही गोष्ट फाब्रिझियो याच्या फायद्याची झाली. तो ग्रियान्टा गांवीं परत आला, तेव्हां पोलिस त्याला खोटा पासपोर्ट धारण केल्याच्या आरोपावरून पकडायला आले. त्याला त्याच्या मावशीच्या गाडींतून मिलान शहरीं नेण्यांत आले. वाटेंत त्यांना एक वयस्कर

इसम व त्याची कन्या भेटली. या दोघांनाहि अटक झालेली होती, परंतु त्यांना पायीं रखडत जावें लागलें. गिना आणि फाब्रिझियो यांनीं मन मोठें केलें आणि जनरल कॉन्टी व त्याची कन्या क्लेलिया या दोघां आरोपींना आपल्या गाडींत बसवून घेतलें. मिलान शहरीं फाब्रिझियो याज-वरील गंडांतर चुटकीसरशीं दूर झालें.

गिना मावशीला फाब्रिझियोविषयीं वाढत्या प्रमाणांत आपुलकी वाटूं लागली. तसा तो देखणा तरुण होता. तिनें त्याला आपल्याबरोबर पार्मा शहरीं नेलें. तिथें त्यानें नशीब काढावें हा तिचा उद्देश. मॉस्का याच्या सल्ल्या-नुसार या तरुणाला नेपल्स शहरीं धर्मशिक्षण विद्यालयांत तीन वर्षें शिकायला ठेवावें असें ठरलें. तिथून परत आल्यावर त्याला दरबारांत एखादी मानाची जागा मिळायची होती.

अभ्यास संपविल्यावर फाब्रिझियो मिठास बोलणारा व्यवहारी मॉन्सिनोर (श्रीयुत) झाला. आर्चबिशपच्या उच्च पदावर बदलीवाला धर्मगुरु म्हणून त्याची नेमणूक झाली असली तरी त्या पवित्र जीवनाशीं अजून तो समरस झालेला नव्हता. एके रात्रीं नाट्यमंदिरांत या तरुण धर्मगुरूची नजर मारियेट्टा व्हाल्सेरा नामक नीटस बांध्याच्या तरुण नटीवर गेली. त्याचें तिच्यावर लक्ष असलेलें पाहून तिचा संरक्षक गिलेट्टी या मवाल्याला लवकरच त्याचा राग येऊं लागला.

या आगाऊपणाचे भलतेच परिणाम होतील असें मॉस्का याला भय पडलें. म्हणून त्यानें फाब्रिझियोला ग्रामीण भागांत पुराण वस्तु-संशोधन खात्या-मार्फत चाललेल्या उत्खननावर देखरेख करायला धाडून दिलें. या ठिकाणाची पाहणी करतां करतां फाब्रिझियोनें एक शिकारीची बंदूक उसनी घेतली आणि ससांची शिकार शोधायला तो रस्त्यानें चालत निघाला. त्याच क्षणीं एक गाडी त्या रस्त्यानें चालली होती. गाडींत मारियेट्टा व गिलेट्टी अशीं दोघें बसलेलीं होतीं. मारियेट्टा हिला पळवून न्यायला फाब्रिझियो आला असावा अशा समजु-तीनें गिलेट्टी गाडींतून ताडकन उडी टाकून फाब्रिझियोच्या अंगावर सुरा घेऊन धांवला. या मारामारींत फाब्रिझियोच्या हातून गिलेट्टी ठार झाला. मारियेट्टा घाबरली आणि तिनें फाब्रिझियोला आपल्याबरोबर बोलोग्ना शहरीं नेलें. तिथें त्याच्या मावशीकडून आलेल्या दूतांनीं त्याला भरपूर पैसे आणून दिले आणि

आपल्या स्वरूप सुंदर मारियेट्टाचा उपभोग घ्यायला तो तिथेंच स्थाइक होऊन राहिला.

या प्रकरणाची बातमी पार्मा शहरीं पोंचली. मॉस्का याच्या राजकीय प्रतिस्पर्ध्यांनीं गिना हिच्यामार्फत त्याच्यावर प्रहार करायची संधि साधली आणि राजावर दडपण आणून या फरारी इसमावर खुनाच्या आरोपावरून खटला भरला. फाब्रिझियोच्या गैरहजेरींतच हा खटला चालला आणि त्याला प्राणदंडाची अथवा वल्हीं मारणारा गुलाम म्हणून जहाजावर सक्तमजुरी करण्याची शिक्षा मिळाली.

फाब्रिझियोला लवकरच त्याच्या मारियेट्टाचा कंटाळा आला. फाउस्टा नामक एका तरुण गायिकेकडे तो आकर्षित झाला आणि तिच्या पाठोपाठ तो पार्मा शहरीं गेला. तिथें त्याला लोकांनीं ओळखलें आणि त्याची तुरुंगांत रवानगी झाली. मॉस्का याचा येवढा दबदबा असूनहि त्याला गिना मावशीच्या या भाच्यासाठीं जवळ जवळ कांहींच करतां आलें नाहीं. परंतु फाब्रिझियोची स्वारी तुरुंगांत खुषींत होती. कारण क्लेलिया हीच त्याच्या जेलरची कन्या होती आणि कित्येक वर्षांपूर्वी त्यानें तिला आपल्या गाडींत बसायला दिलें होतें. धुळाक्षरांच्या पत्त्यांचें सहाय्य घेऊन उभयतांनीं लवकरच तुरुंगांतल्या तुरुंगांत मनसोक्त सुखसंवाद चालविला.

तुरुंगाबाहेर गिना मावशीनें आपल्या भाच्याला पळून जायला मिळेल अशी योजना आंखली. फेरान्टे नामक एका कवीच्या मदतीनें तिनें आपल्या भाच्याकडे चोरून दोर धाडून द्यायची व्यवस्था केली. हे दोर खुद्द क्लेलिया हिनेंच आंत नेऊन द्यायचे होते. फाब्रिझियो या दोरांच्या सहाय्यानें त्या किल्लावजा तुरुंगांतून पळाला आणि त्यानें पीडमॉट शहर गांठलें. पार्मा शहरीं फाब्रिझियोला तुरुंगवासाची शिक्षा देणाऱ्या राजावर गिना मावशीच्या आदेशानुसार फेरान्टे यानें विषप्रयोग केला. या प्रकारामुळें झालेल्या गोंधळाचा फायदा घेऊन गिना मावशी व फाब्रिझियो हीं दोघें पार्मा नगरीला परत आलीं. आतां त्या गादीवर नवा राजा बसलेला होता. नव्या राजवटींत फाब्रिझियोला माफी मिळाली आणि धर्माध्यक्षांनीं त्याला एक धर्मगुरुपद बहाल केलें. मागाहून त्याची बढती होऊन तो धर्माध्यक्ष झाला आणि त्याच्या प्रवचनांना खूप गर्दी जमूं लागली. मध्यंतरींच्या काळांत क्लेलिया हिचें लग्न

एका श्रीमंत सरदाराशीं झालें. एके दिवशीं ती कुतूहलानें प्रेरित होऊन फाब्रिझियोचें प्रवचन ऐकायला आली. तिच्या प्रेमानें पुन्हां उचल खाल्ली आणि तिनें शेवटीं त्याला आपला प्रियकर होऊं दिलें. रोज रात्रीं तो तिच्या घरीं येऊं लागला. त्याच्यापासून तिला मूल झालें. त्यानें हें बाळ आपल्या घरीं नेलें आणि क्लेलिया आपल्या बाळाला भेटायला तिथें येऊं लागली. परंतु फाब्रिझियोचें हें सुख फारच अल्प काळ टिकलें. त्याचें बाळ देवाघरीं गेलें आणि क्लेलियाहि आपल्या बाळाच्या मृत्यूनंतर फार दिवस जगली नाहीं. तिच्या मृत्यूमुळें फाब्रिझियो विषण्ण झाला. त्यानें आपल्या धर्माध्यक्षपदाचा राजीनामा दिला आणि तो संन्यस्त होऊन नदीच्या तीरावरील चार्टर हाऊस ऑफ पार्मा या मठांत राहिला. तिथें निवांतपणीं ईशचिंतन करण्यांत त्यानें आपलें उर्वरित आयुष्य घालविलें.

## चिल्ड्रेन ऑफ गॉड : नवे प्रेषित

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* व्हार्डिस फिशर ( १८९५- ). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक बखर. *काळ :* १८२०-१८९०. *स्थळ :* न्यू यॉर्क, इलिनॉय, उटा. *प्रथम प्रकाशन :* १९३९.

*प्रमुख पात्रें :* **जोसेफ स्मिथ**, द चर्च ऑफ लॅटर-डे सेंट्स या नव्या मॉर्मन पंथाचा संस्थापक. **ब्रिगहॅम यंग**, स्मिथ याच्या मृत्यूनंतरचा या पंथाचा नेता. **जॉन टेलर**, द मॉर्मन चर्च या पंथाचा मागाहून झालेला नेता.

*स मी क्ष ण :* कादंबरीकार व्हार्डिस फिशर हा आपल्या या ग्रंथाला अमेरिकन महाकाव्य अशी संज्ञा देतो. यांतील मालमसाला महाकाव्याच्या स्वरूपाचा आहे हें नक्कीच. कारण मॉर्मन-पंथीयांनीं न्यूयॉर्क राज्यांतून इलिनॉय व मिसूरी या राज्यांत आणि तिथून शेवटीं उटा या राज्यापर्यंत जी महायात्रा केली, तिची ही हकीगत वाचल्यानंतर त्यांची वीरवृत्ति व तळमळ या गुणांविषयीं कुणालाहि शंका राहूं शकत नाहीं. सत्य घटनेचीं निव्वळ हाडें आधाराला घेऊन फिशरनें त्यांच्यावर मॉर्मनपंथीय व्यक्तिमत्वांचा व प्रसंगांचा असा सुंदर साज चढविला कीं त्यामुळें त्या घटना रक्तामांसाच्या व सजीव झालेल्या दिसूं

लागल्या. याच्या परिणामीं इतिहास व कल्पना यांचा एकजीव करणारी ही कादंबरी निर्माण झाली.

*कथानक :* एकोणीसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकाच्या आरंभीं न्यूयॉर्क राज्यांतील पाल्मिरा गांवीं राहणाऱ्या एका तरुणाला दृष्टांत होऊं लागले. त्यामुळें आपण परमेश्वराचे प्रेषित आहोंत अशी त्याची समजूत झाली. त्या तरुणाचें नांव जोसेफ स्मिथ आणि त्याला झालेल्या दृष्टान्तांच्या आधारावरच त्यानें 'द चर्च ऑफ लॅटर-डे सेन्ट्स' या पंथाची उभारणी केली. याच पंथाची ख्याति मॉर्मन चर्च या नांवानें सर्वत्र झाली. त्या काळांत त्याचे अनुयायी फारच थोडे होते. ते म्हणजे त्याच्या कुटुंबांतील माणसें आणि त्याचे मूठभर स्नेही.

१८३० च्या मार्च महिन्यांत 'द बुक ऑफ मॉर्मन' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. तो प्रकाशांत आल्यानंतर लवकरच जोसेफ स्मिथ यानें आपले भाऊ आणि व्हिटमर कुटुंबांतील पुरुष मंडळी यांना लॅटर-डे सेन्ट्स म्हणून पंथाच्या उपदेशकांची दीक्षा दिली. न्यूवेल नाइट नामक इसमाच्या अंगांतील व्यक्तिगत सैतान जोसेफ यानें काढून टाकला असें सांगण्यांत येऊं लागलें. या चमत्काराची बातमी पाल्मिरा गांवाच्या आसमंतांतील ग्रामीण भागांत पसरली आणि अनेक लोकांनीं या पंथाचें अनुयायित्व पतकरलें.

परंतु यशापाठोपाठ संकट आलें. एका प्रसंगीं लोकांच्या जमावानें या नव्या प्रेषिताला जिवंत जाळायचा घाट घातला, पण थोडक्यांत निभावलें. आणखी एका प्रसंगीं त्याला कोर्टांत नेऊन त्याच्यावर खटला करण्यांत आला. न्यू यॉर्क राज्यांत आपल्या जिवाला अतःपर सुरक्षितता नाहीं हें त्याच्या ध्यानांत आलें.

जोसेफच्या तीनशें अनुयायांनीं न्यू यॉर्क राज्य सोडून दिलें आणि ओहिओ राज्याची वाट धरली. दरम्यान जोसेफनें आपला पहिला दीक्षाधारी ऑलिव्हर कौडरी आणि आणखी एक इसम या दोघांना मिसिसिपी नदीच्या पलीकडे प्रचार दौऱ्यावर धाडून दिलें. त्या भागांतील रेड इंडियन लोकांना आपल्या पंथांत सामील करून घेणें आणि या पंथाचें प्रार्थना मंदिर बांधण्यासाठीं जागा बघून ठेवणें अशा कामगिऱ्या या प्रचारकांवर सोंपविलेल्या होत्या. ओहिओ राज्यांत जोसेफ स्मिथ याचा पुन्हां छळ झाला.

हिंवाळ्यांतील एके रात्रीं एका जमावानें त्याला त्याच्या घरांतून पळवून नेलें आणि त्याच्या तोंडाला डांबर फांसून त्याच्या अंगावर पिसें चिकटवून त्याची धिंड काढली. त्यानंतर लवकरच जोसेफनें आपल्या अनुयायांसह मिसूरी राज्यांत स्थलान्तर करायचा निर्णय घेतला आणि तो स्वतः कांहीं मंडळींना बरोबर घेऊन त्या भागाची पाहणी करायला पुढें गेला.

तो ओहिओ राज्यांत परत आला, तों आपल्यासमोर आणखी संकटें वाढून ठेवलेलीं त्याला दिसलीं. त्याच्याकडून दीक्षा घेतलेले कित्येक इसम त्याच्या गैरहजेरींत स्वतःच प्रेषित होऊन मिरवूं लागले. मिसूरी राज्यांत ज्या माणसांना तो मागें ठेवून परत आला, त्यांच्यावर जमावांकडून हल्ले होऊं लागल्याच्या बातम्या त्याच्याकडे आल्या. मग एके दिवशीं दोन इसम त्याला भेटायला आले आणि म्हणाले: "आम्हांला कांहींतरी सेवाकार्य सांगा." त्यांपैकीं एक होता ब्रिगहॅम यंग, आणि दुसरा होता हेबर किम्बाल. ब्रिगहॅम यंग याची या पंथांतल्या लोकांना मोठी मदत झाली. कारण आपल्या इच्छेनुसार इतर लोकांना वागायला लावायची धमक त्याच्या अंगीं होती. गूढवादी जोसेफ स्मिथ याला ही विद्या कधींच आत्मसात करतां आली नाहीं.

इकडे ओहिओ राज्यांतील मॉर्मन पंथीयांना अंतर्गत कलहाला तोंड द्यावें लागत होतें, तर तिकडे मिसूरी राज्यांत जमावांकडून या नवपंथीयांना घोड्याच्या चाबकांचा मार खावा लागत होता, त्यांचे खून होत होते आणि घरांघरांतून त्यांची हकालपट्टी चाललेली होती. अखेरीस ब्रिगहॅम यंग यानें एक फौज उभारावी आणि ती घेऊन मिसूरी राज्यांत चाल करून जावें आणि तिथल्या मॉर्मनपंथीयांना सोडवावें, असा अधिकार त्याच्यावर सोंपविण्यांत आला. शेवटच्या क्षणीं जोसेफ हाच या मोहिमेचा पुढारी म्हणून तिकडे गेला. ही मोहीम अपेशी होणार हें आतां ठरल्यासारखेंच झालें. मोहिमेंतील कांहीं लोक कॉलऱ्याच्या सांथीला आणि आणखी कांहीं लोक रेड इंडियनांच्या रोषाला बळी पडले. मिसूरी राज्यांतील जमावांशीं त्यांनीं मुळीं लढाच दिला नाहीं.

पुढील कांहीं वर्षें ओहिओ राज्यांत या पंथीयांची बरीच चलती झाली. जोसेफ स्मिथ आणि ब्रिगहॅम यंग या दोघांनीं मॉर्मनपंथीयांची एक खास बँक स्थापन केली. परंतु १८३७ सालच्या आर्थिक अरिष्टांत इतर अनेक बँकांप्रमाणेंच या बँकेचें दिवाळें वाजलें. इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां आपले पैसे गेले या गोष्टीमुळें

या पंथाचे अनुयायी आपल्या पुढाऱ्यांवर भलतेच उलटले. इतके कीं ब्रिगहॅम यंग आणि जोसेफ स्मिथ यांना तिथून आपला जीव घेऊन मिसूरी राज्यांत पळ काढावा लागला. जोसेफचा धर्म आणि प्रेषितपणाचा दबदबा या गुणांवर अजूनहि ज्यांची श्रद्धा होती अशीं तीनशें कुटुंबें मागाहून ओहिओ राज्यांतून स्थलांतर करून या दोघांना येऊन मिळालीं.

मिसूरी राज्यांत या लोकांच्या वस्त्यांना जमावांनीं सतावलें. या पंथाच्या अनुयायांनीं अगतिक होऊन डानिटेस अथवा विनाशकारी देवदूत या नांवाचें एक गुप्त प्रतिकार-दल संघटित केलें. शेवटीं मिसूरी राज्याच्या गव्हर्नरनें असें फर्मान काढलें कीं मॉर्मन पंथाच्या सर्व अनुयायांनीं मिसूरी राज्यांतून निघून तरी जावें, किंवा जमावांच्या हातून मरण पतकरावें. पुन्हां जोसेफ स्मिथ आणि त्याचे सहकारी नेते यांजवर देशद्रोहाच्या आरोपावरून खटले झाले. तुरुंगांतील एका सहानुभूतिदार पाहरेवाल्याच्या मदतीनें त्यांना पळून जातां आलें, म्हणून त्यांचा प्राणदंड चुकला.

यानंतर इलिनॉय राज्यांतील नौव्हू या गांवीं या पंथाच्या अनुयायांनीं वस्ती केली. या जमातींत स्त्रियांची संख्या पुरुषांपेक्षां अधिक होती. यामुळें विवाहाशिवाय मोकळ्या राहिलेल्या स्त्रियांना कुणाच्या तरी दानधर्मावर अवलंबून राहावें लागे किंवा रखेलीपण पतकरावें लागे. या आपत्तीपायीं महिलावर्ग या पंथांतून निघून जाऊं लागला. यावर इलाज म्हणून इथल्या मुक्कामांत जोसेफ स्मिथ यानें आपल्या पंथांत बहुपत्नीकत्वाची प्रथा आणण्याचा प्रयत्न केला. खुद्द जोसेफ याच्या लवकरच वीस बायका झाल्या. त्याची प्रथम पत्नी एम्मा हिनें दोन सवतींना ठेवून घेऊन बाकीच्या सगळ्या जणींना वाटेला लावलें.

जोसेफ स्मिथ इलिनॉय राज्य सोडून अन्यत्र जाऊं शकलाच नाहीं. देशद्रोहाच्या आरोपावरून त्याच्यावर तिसऱ्यांदां पकडवारंट निघालें, तेव्हां तो आपण होऊन कोर्टांत हजर झाला. तिथल्या तिथें जमावानें त्याच्यावर हल्ला करून त्याचा प्राण घेतला. त्याच्या पश्चात ब्रिगहॅम यंग यानें या पंथाचें नेतृत्व आपल्या हातीं घेतलें. मात्र प्रेषित म्हणून नव्हे. नुसता नेता म्हणून. त्यानें असें ठरविलें कीं मॉर्मनपंथीयांना जर शांततेनें जगायला हवें असेल तर त्यांना एकच मार्ग मोकळा आहे. तो म्हणजे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांची हद्द सोडून जाणें आणि दूर अंतरावर पश्चिमेकडे एखादें मुक्कामाचें ठिकाण शोधून काढणें.

हिमानें रबरबलेल्या रस्त्यांतून पायपीट करीत तीन हजार मॉर्मनपंथीय लोक ब्रिगहॅम याच्या नेतृत्वाखालीं पश्चिमेच्या रोखानें निघाले. मागें ठेवलेल्यांना आपल्या नेत्याच्या अभावीं चुकल्या चुकल्या सारखें वाटूं लागलें आणि लवकरच आणखी पंधरा हजार लोक ब्रिगहॅम याच्या पाठोपाठ पश्चिमेकडे वाटचाल करूं लागले.

१८४७ च्या वसंत ऋतूंत ब्रिगहॅम यंग दीडशें निवडक लोक बरोबर घेऊन आपल्या हिंवाळी छावणींतून रॉकी पर्वताच्या रोखानें निघाला. इतर माणसें मागाहून यायचीं होतीं. उटा राज्यांत ' साल्ट लेक ' प्रदेशाच्या दक्षिणेला स्थाइक व्हायचें असा त्याचा निर्धार होता. १८४७ च्या हिंवाळ्यापर्यंत सतराशें मॉर्मनपंथीय लोक उटा राज्यांत येऊन दाखल झाले देखील. येवढ्यांत उटा राज्याचा प्रदेश मेक्सिको सरकारनें अमेरिकेला देऊन टाकला अशी बातमी त्याला कळली. आतां मॉर्मनपंथीयांना स्वतःची अशी भूमि कधीं मिळणारच नाहीं असें त्याला वाटलें. पुढच्या हिवाळ्यांत पांच हजार मॉर्मन पंथीयांनीं कडक थंडींत जेमतेम अर्धपोटीं अन्न खाऊन एक वर्षभर भयंकर हालअपेष्टा भोगल्या. उटा राज्यांतील वास्तव्याच्या तिसऱ्या वर्षीं ब्रायटन यंग याजपुढें एक नवाच प्रश्न उभा राहिला. कॅलिफोर्नियांत सोन्याच्या खाणींचा शोध लागल्यामुळें हजारों बदमाष आणि साहसबाज लोक त्या प्रदेशाकडे आकर्षित झाले. त्यांतल्या बऱ्याच जणांना समुद्र किनाऱ्याकडे जातांना वाटेंत या मॉर्मनपंथीयांच्या वस्त्या लागत असत. हे मवाली या पंथीयांच्या संग्रहांतलें तुटपुंजें धान्यधुन्य चोरून नेऊं लागले आणि बायामाणसांना त्रास देऊं लागले.

कालान्तरानें या पंथाची भरभराट झाली. ब्रिगहॅम यंग हा उटा राज्याच्या गव्हर्नरपदावर निवडून आला. १८५२ सालीं त्यानें मोठें धाडसी पाऊल टाकलें. मॉर्मन पंथाचे पुढारी बहुपत्नीकत्वाची प्रथा चालवीत आहेत हें पुष्कळ लोकांना ठाऊक होतें किंवा निदान त्यांना असा संशय येत होता. ब्रिगहॅमनें या प्रथेचा जाहीर पुरस्कार केला. त्याबरोबर या प्रथेविरुद्ध जो प्रचंड गिल्ला झाला, त्याचें ब्रिगहॅमला आश्चर्य वाटलें आणि त्याचें मन विषण्ण झालें. कारण या प्रथेमुळें मॉर्मनपंथीयांच्या वसाहतींत नीतीचें पालन नीट होत आहे असें त्याला छातीठोकपणें सांगतां येत होतें.

१८५५ सालीं टोळधाडीमुळें त्यांचीं उभीं पिकें नष्ट झालीं. या पंथांतले

अनेक लोक बहुपत्नीकत्वाच्या प्रथेला विरोध करूं लागले. कारण दुष्काळाच्या दिवसांत आपल्या सतत वाढत्या कुटुंबासाठीं पुरेसें अन्न मिळविणें एका माणसाला अशक्य होत असे.

आणखी दोन वर्षांनीं मॉर्मन पंथीयांच्या कानावर अशी बातमी आली कीं अमेरिकेच्या मध्यवर्ती सरकारनें आपला बंदोबस्त करण्यासाठीं फौज रवाना केली आहे. सरकारकडून कसल्याहि दयामायेची अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं हें या लोकांना पूर्वीच्या अनुभवावरून ठाऊक झालेलें होतें. राष्ट्राध्यक्षानें पाठविलेल्या प्रादेशिक गव्हर्नराला या लोकांनीं चांगलेंच तडकावलें आणि वर असा असा दम भरला कीं "आमच्या वाटेला जाल तर आम्ही साल्ट लेक सिटी हें शहर जाळून भस्म करूं आणि आम्ही इकडे वस्ती करायला आलों त्या वेळीं हा भाग जसा वैराण होता तशी त्याची पुन्हां अवस्था करून ठेवून मगच आम्ही इथून निघून जाऊं." शेवटीं राष्ट्राध्यक्षानें माघार घेतली आणि मॉर्मन पंथीयांना माफी देणारा खलिता धाडून दिला.

जनरल ग्रँट हा अमेरिकेचा राष्ट्राध्यक्ष निवडून आल्यावर मॉर्मनपंथीयांचा प्रश्न पुन्हां निकरावर आला. मध्यवर्ती सरकारच्या वकिलांनीं बहुपत्नीकत्वविरोधी कायद्याचा आधार घेऊन मॉर्मनपंथाच्या पुढाऱ्यांना तुरुंगांत डांबण्याचा सपाटा सुरू केला. मग या वकिलांनीं ब्रिगहॅम यंग सकट या पुढाऱ्यांना खुनाच्या आरोपांत गुंतविण्याचा घाट घातला. परंतु यंग याजवर खटला होण्याची पाळीच येऊं शकली नाहीं. कारण तो नैसर्गिक कारणांनीं अगोदरच मरून गेला.

यंग याच्या मृत्यूनंतर सरकारनें मॉर्मनपंथीयांवर खटले भरायचें सत्रच चालू केलें. बहुपत्नीकत्वाची प्रथा त्यांनीं धिक्कारावी म्हणून सरकारचा हा सारा खटाटोप होता. मॉर्मनपंथीयांनीं स्थापन केलेल्या सहकारी संस्था व दुकानें वगैरे उद्योगधंदे यांच्यावरहि सरकारनें गंडांतरें आणलीं आणि या पंथानें पन्नास हजार डॉलरपेक्षां अधिक किंमतीची मालमत्ता आपल्या पंथाच्या मालकीची ठेवूं नये, ठेवल्यास ती सगळी सरकारजमा करावी लागेल अशा धमक्या देऊन त्या अंमलांत आणायचा प्रयत्न सरकारनें चालविला. या एकंदर छळवादाला तोंड देणें व्यवहारतः अशक्य झालें. मॉर्मन पंथाच्या कारभारी मंडळाच्या अध्यक्षानें बहुपत्नीकत्वाच्या प्रथेचा धिक्कार केला. आपलें अस्तित्व चालू ठेवण्यासाठीं या पंथाला कसलाहि वायलेपणा दर्शविणें अतःपर अशक्य

झालें. या पंथाचे अनुयायी आणि पूर्वेकडून इकडे वस्ती करायला आलेले इतरेजन हे सारे यापुढें उटा या नव्या राज्यांत गुण्यागोविंदानें शेजारीं शेजारीं नांदूं लागले.

## क्ल रि सा हा र्लो

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* सॅम्युएल रिचर्डसन (१६८९-१७६१). *कथानकाचा प्रकार :* भावनाप्रधान अद्भुतरम्य कथा. *काळ :* अठराव्या शतकाचीं आरंभींचीं वर्षें. *स्थळ :* इंग्लंड. *प्रथम प्रकाशन :* १७४७-१७४८.

*प्रमुख पात्रें :* **क्लारिसा हार्लो**, एक कुटुंबवत्सल सधन तरुणी. **रॉबर्ट लव्हलेस**, तिला फशीं पाडणारा. **जॉन बेल्फोर्ड**, लव्हलेस याचा दोस्त. **विल्यम मॉर्डेन**, क्लारिसा हिचा कझिन. **आराबेला**, क्लारिसा हिची वडील बहीण. **जेम्स**, क्लारिसा हिचा वडील भाऊ.

*समीक्षण :* या कादंबरीच्या शैलीमुळें आधुनिक वाचकाला हिची अपूर्वाई वाटेल. हिची मांडणी पत्रात्मक आहे. निरनिराळ्या पात्रांनीं एकमेकांना लिहिलेली पत्रें हाच तिचा एकंदर मालमसाला. या पत्रांच्या द्वारां स्वभावचित्रण व कथानक यांचा उलगडा वाचकांसमोर केलेला आहे. कादंबरीच्या अशा नमुन्याचीं वैगुण्यें म्हणजे तिचा कंटाळवाणेपणा आणि तिच्यांतले अनावश्यक पाल्हाळ. अशा प्रकारचीं लांबलचक, गुंतागुंतीचीं आणि कष्टसाध्य पत्ररचना करायला कादंबरींतल्या पात्रांना आपल्या सगळ्या उठाठेवी करतांना वेळ कसा मिळाला याचें नवल वाटतें. त्याचप्रमाणें विसाव्या शतकांतील वाचकाला क्लारिसाचें तर्कशास्त्र पटवून घेणेंहि कठीण जातें. आधुनिक जगाच्या व्यवहारीपणाशीं (pragmatism शीं) मिळतें करून घेणाऱ्या मनाला क्लारिसाचा निर्णय चटकन ग्रहण होण्याजोगा वाटत नाहीं. आपल्याला फशीं पाडणाऱ्या पुरुषाशीं लग्न करण्यापेक्षां मरण पतकरण्याचा तिचा निर्धार म्हणजे कांहीं तरीच वाटतो. या ग्रंथाचा विषय भावनाप्रधान, आणि जाडजूडपणा भलताच असला तरी ही रिचर्डसनची सर्वोत्तम कादंबरी आहे.

*कथानक :* रॉबर्ट लव्हलेस हा घरंदाज कुळांतला इंग्रज तरुण. त्याचा हार्लो कुटुंबाशीं परिचय करून देण्यांत आला. हें क्लारिसाच्या मामाचें

काम. लव्हलेसनें तिची थोरली बहीण आराबेला हिच्याशीं लग्न करावें अशी या मामाची इच्छा होती. थोरल्या बहिणींत विशेष कौतुक करण्याजोगें कांहींच नाहीं असें आढळून आल्यावर हा तरुण धाकटी क्लारिसा हिच्या प्रगाढ प्रेमांत गुरफटला. परंतु क्लारिसाचा भाऊ आणि तिची बहीण यांनीं या लग्नाला आड-काठी आणल्याचें त्याला चटकन कळून आलें. जेम्स हार्लो हा ऑक्सफर्ड विद्यापीठांत लव्हलेस याचा सहाध्यायी होता आणि तेव्हांपासूनच त्याला लव्हलेस आवडत नव्हता. आणि क्लारिसाला पतकरून आपल्याला त्यानें धुडका-वलें म्हणून आराबेला हिला लव्हलेसचा भलताच राग आलेला होता. दोघांनाहि क्लारिसाचा हेवा वाटत होता. कारण त्यांच्या आजोबांनीं तिच्यासाठीं आपल्या मृत्युपत्रांत पुष्कळशी दौलत ठेवलेली होती आणि या दोघां भावंडांना त्यांनीं कांहींच ठेवलेलें नव्हतें.

रॉबर्ट लव्हलेस हा बदफैली माणूस आहे अशी जेम्स हार्लो यानें आपल्या आई-वडिलांची खातरजमा करून दिली. मग त्यानें असें सुचविलें कीं कसलीहि अभिरुचि नसलेला व साधा समंजसहि नव्हे अशा मिस्टर सोल्म्स नामक एका श्रीमंत वयस्क गृहस्थाशीं क्लारिसाचें लग्न करून द्यावें. क्लारिसाच्या नजरेंत सोल्म्स ही व्यक्ति भरेना, तेव्हां तिच्या कुटुंबीयांनीं असें गृहीत धरलें कीं ही लव्हलेस याच्या प्रेमांत सांपडली असावी. तिनें या गोष्टीचा इन्कार केला तरीहि त्यांनीं आपला समज कायम ठेवला.

सोल्म्स यानें आपल्या दालनांत भेटायला येतां कामा नये किंवा घरांतलीं सगळी मंडळी एकत्र जमलेली असतील त्या वेळीं त्यानें आपल्या शेजारीं बसतां कामा नये असें तिनें घरच्या लोकांना बजावून ठेवलें. तिच्या या वागण्याची तिच्या वडिलांना भयंकर चीड आली. वडील म्हणाले : "ज्या गृहस्थाची निवड मी तुझा भावी वर म्हणून केलेली आहे, त्याच्याशीं तूं अधिक सभ्यपणानें वागलं पाहिजेस अशी माझी आज्ञा आहे." तिनें ही आज्ञा धुडकावून लावली आणि सांगितलें : "बाबा, माझ्या मर्जीविरुद्ध मी कुणाशींहि लग्न करणार नाहीं." यावर वडिलांनीं तिला खोली सोडून बाहेर जायला मनाई केली.

क्लारिसाच्या सौंदर्यानें व सुस्वभावानें लव्हलेस भलताच प्रभावित झाला. त्यानें असें ठरविलें कीं या तरुणीला फुसलावून तिच्या घरांतून पळवून न्यायचें. त्याला तिच्याविषयीं वाटणारें प्रेम आणि या हार्लो कुटुंबानें त्याचे जे अनेकदां

अपमान केले त्याबद्दल त्यांचा सूड घेण्याची इच्छा, या दोन कारणांसाठीं त्यानें हा निर्णय घेतला.

मिस्टर हार्लो आणि त्यांचा पुत्र या दोघांच्या अरेरावी व्यक्तित्वामुळें त्याची ही योजना पार पाडण्यांत त्याला बरीच मदत झाली. वडिलांनीं आणि भावानें क्लारिसाची एक विश्वासू मोलकरीण कामावरून दूर केली आणि तिच्या जागीं क्लारिसाशीं उर्मटपणें व बेमुर्वतखोरपणें वागणाऱ्या एका नव्या मोलकरणीची नेमणूक केली. त्यांनीं क्लारिसाला घरांतल्या कुणाहि माणसाची भेट घ्यायला परवानगी दिली नाहीं. तिच्या आईला देखील भेटायची त्यांनीं तिला बंदी केली. क्लारिसाची एकमेव सल्लागार व विश्वासपात्र स्त्री म्हणजे मिस हो. ही तिची मैत्रीण असून तिच्याशीं पत्रव्यवहार करीत असे. या बाईनें तिला असा सल्ला दिला : "शक्य झाल्यास तूं घर सोडून पळून जा. हें करण्यासाठीं तुला लव्हलेस याची मदत घ्यावी लागली आणि त्याच्याशीं लग्न करायला होकार द्यावा लागला तरी हरकत नाहीं."

एके सायंकाळीं क्लारिसा बागेंत फेरफटका करीत असतांना लव्हलेस यानें तिथें हळूच शिरकाव करून घेतला आणि तिला आपल्याबरोबर पळून जायची गळ घातली. आपल्या अरेराव वडिलांच्या तावडींतून सुटायला मिळावें हा एकमेव विचार तिच्या मनांत होता. तिनें थोडेसे आढेवेढे घेतले आणि त्यानंतर ती त्याच्याबरोबर निघून गेली. लव्हलेस तिला म्हणाला : "माझा एक सोयरा लॉर्ड एम्- म्हणून आहे, त्याच्या घरीं मी तुला घेऊन जातों. तुझा मामेभाऊ कर्नल मॉर्डेन याला परदेशाहून परत यायला मिळेपर्यंत आणि त्याच्याकरवीं तुझी व तुझ्या कुटुंबांतल्या माणसांची दिलजमाई व्हायची व्यवस्था होईपर्यंत हा लॉर्ड तुझं संरक्षण करील." परंतु लव्हलेस यानें आपला शब्द खरा केला नाहीं. तो तिला एका वेश्यागृहांत घेऊन गेला आणि तिथें मिसेस सिंक्लेअर नामक एका बाईशीं त्यानें तिचा परिचय करून दिला. आपण तिला लॉर्ड एम्- याच्या घरीं कां घेऊन जाऊं शकलों नाहीं याचा खुलासा करण्यासाठीं त्यानें अनेक काल्पनिक सबबी सांगितल्या. यामुळें बिचारी क्लारिसा गोंधळून गेली. तो म्हणाला : "तूं माझी तात्पुरती पत्नी असल्याचा बहाणा कर." याहि गोष्टीला ती कशीबशी तयार झाली. मग त्यानें मिसेस सिंक्लेअर हिला सांगितलें : "क्लारिसा ही माझी पत्नी आहे. लग्नासंबंधां-तील कांहीं विशिष्ट तरतुदींची व्यवस्था होईपर्यंत मला तिच्या संगतींत राहतां

येत नाहीं." त्याला हें खोटें सांगायला तिनें परवानगी दिली ती अशा समजुतीनें, कीं या क्लृप्तीमुळें आपल्या वडिलांना व आपल्या भावाला आपण कोठें आहोंत याचा पत्ता लावतां येऊं नये.

मिसेस सिंक्लेअरच्या घरीं तिला स्वतःच्या घरांतल्याप्रमाणेंच जवळ जवळ तुरुंगवासांत राहावें लागलें. दरम्यान तिच्या कुटुंबियांनीं तिला बहिष्कृत केलें आणि तिला पैसे वा कपडे धाडायचें नाकारलें. तिच्या वडिलांनीं खरोखरीच असें जाहीर करून टाकलें कीं "ही अतःपर माझी मुलगी राहिलेली नाहीं. हिला इहलोकीं व परलोकीं दुःखांत दिवस काढावे लागतील असा माझा तिला शाप आहे."

या प्रकारामुळें क्लारिसाला फार मनस्ताप झाला. आतां तर निव्वळ जगण्यासाठीं देखील ती लव्हलेस याजवर अवलंबून होती. त्यानें या परिस्थितीचा फायदा घेऊन तिच्यावर आपल्या प्रेमाचा जोरा चालविला. अगोदर दिलेल्या लग्नाच्या वचनाचा तो आतां नामनिर्देशहि करीना. क्लारिसानें तिथून पळून जाण्याचा प्रयत्न केला. ती हॅम्पस्टेडपर्यंत गेली देखील. पण तेवढ्यांत लव्हलेसनें तिला गांठलें. तिथल्या तिथें त्यानें दोन बायांना आपल्या चुलत बहिणी असल्याचा बहाणा करायला लावलें आणि त्यांच्याकडून तिची खात्री पटवून दिली कीं तिनें या दोघींबरोबर आपल्या बिऱ्हाडीं परत जावें हेंच उत्तम. ती मिसेस सिंक्लेअरच्या घरीं परत आल्यावर त्या दोघींनीं तिला गुंगीचीं औषधें पाजलीं आणि मागाहून लव्हलेस यानें तिच्यावर बलात्कार केला. यानंतर कांहीं दिवसांनीं तिला मिस हो हिचें पत्र आलें. त्यावरून तिला कळून आलें कीं आपल्या दर्जाची कोणतीहि स्त्री जिथें दिसणार नाहीं अशा घरांत आपण राहत आहोंत. पुन्हां तिनें पळून जायचा प्रयत्न केला. या वेळीं तिनें खिडकींतून हांका मारून बाहेरून मदत मिळविली. शेवटीं लव्हलेस यानें तिला असें वचन दिलें कीं "तुला तुझ्या मामेभावाकडून किंवा मिस हो हिजकडून मदत मिळवितां येईपर्यंत मी तुझ्या वाटेला जाणार नाहीं."

लॉर्ड एम्- आजारी होता. त्याला भेटायला म्हणून लव्हलेस कांहीं दिवसांकरतां लंडन सोडून गेला. त्याच्या गैरहजेरींत क्लारिसानें एका मोलकरणीचे कपडे चोरून हस्तगत करण्याची शिताफी लढविली आणि वेषांतर करून घरांतून पळ काढला. परंतु एकदोन दिवसांत मिसेस सिंक्लेअरनें तिचा ठावठिकाणा

शोधून काढला आणि तिला कर्जापायीं अटक करवून तुरुंगांत डांबविलें. लव्हलेस याचा मित्र जॉन बेल्फोर्ड याच्या कानीं तिच्या दुरवस्थेची हकीगत गेल्यावर त्यानें तें कर्ज बनावट असल्याचें सिद्ध करून तिला सोडवून आणलें. त्यानें क्लारिसाला एका प्रेमळ कुटुंबवत्सल हातमोजेविणकराच्या घरीं आश्रय मिळवून दिला. आपल्या दुर्दैवाच्या दशावतारांना कंटाळून क्लारिसा झुरणीस लागली. जॉन बेल्फोर्ड यानें तिच्यासाठीं आणलेल्या दवावाल्यानें व डॉक्टरानें कितीहि इलाज केले तरी त्यांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं.

आपल्या कुटुंबियांशीं आपली दिलजमाई व्हावी आणि आपल्या मित्रमंडळींना आपल्या दुर्दशेची खरी हकीगत कळावी म्हणून तिनें आपला वेळ पत्रें लिहिण्यांत खर्ची घातला. लव्हलेसशीं कसलाहि संबंध ठेवण्याचें तिनें साफ नाकारलें. वास्तविक या वेळेपर्यंत त्याची त्यालाच अशी खात्री वाटूं लागली होती कीं आपलें हिच्यावर नितान्त प्रेम आहे. तो तिच्याशीं लग्न करूं इच्छीत होता; आपल्या हातून तिला जी वागवणूक मिळाली व जे हाल भोगावे लागले, त्यांची भरपाई करावी असें त्याला मनापासून वाटत होतें. परंतु तिनें सौजन्यपूर्ण खंबीरपणानें त्याची ही विनंति ठोकरून लावली.

क्लारिसाची प्रकृति अधिक ढांसळूं लागली, तेव्हां तिच्या मित्रांनीं तिच्या कुटुंबियांकडून तिला क्षमा केली जावी म्हणून आपल्या परीनें शक्य ते सगळे प्रयत्न केले. तिच्या वडिलांनीं व भावानें तिला घरांत घ्यायला नकार दिला, तेव्हां ती शवपेटिका तयार करणाऱ्या एका कारखान्यांत गेली आणि तिथें तिनें आपल्या मनाप्रमाणें फेरफार करवून एक शवपेटिका स्मारकशिळेसकट खरेदी केली. ज्या दिवशीं तिनें आपल्या वडिलांचें घर सोडलें ती तारीख आपल्या मरणाचा दिवस म्हणून त्या स्मारकशिळेवर कोरवून घेतली.

कर्नल मॉर्डेन इंग्लंडला परत आला. त्यानें तिच्या अंगांत उत्साह आणण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या या खटपटीला यश आलें नाहीं. कारण हार्लो कुटुंबाची तिच्या संबंधांत असलेली वृत्ति बदलविणें त्यालाहि जमलें नाहीं. त्यानें लव्हलेस व लॉर्ड एम्- यांच्याहि मुलाखती घेतल्या. लॉर्डसाहेब त्याला आश्वासनपूर्वक म्हणाले : "आम्हां उभयतांच्या कुटुंबांना क्लारिसाविषयीं फार आदर वाटतो. तिनं लव्हलेसशीं लग्न करावं अशीच आमच्या कुटुंबियांची इच्छा आहे. लव्हलेस यालाहि तिच्याशीं लग्न करायला हवं आहे." लव्हलेसनें या

आश्वासनाचा पाठपुरावा केला. परंतु क्लारिसाचा मामेभाऊ देखील लव्हलेस हा पति म्हणून स्वीकारायला तिचें मन वळवूं शकला नाहीं.

क्लारिसानें मरायचा निर्धार केलेला आहे हें हार्लो कुटुंबियांसकट सगळ्यांच्या निदर्शनाला येऊन चुकलें. तिनें घरांत कधींहि येऊं नये हा तिच्यावर घातलेला निर्बंध आतां तिच्या वडिलांनीं व भावानें काढून टाकला. आपण क्लारिसाशीं क्रूरपणानें वागलों याबद्दल तिच्या बहिणीला फार वाईट वाटलें. आपल्या मुलीच्या बाबतींतील कर्तव्य बजावण्यांत आपल्या हातून कसूर झाली अशी तिच्या आईची खात्री पटली. त्या सर्वांनीं तिला पत्रें लिहिलीं : "आमच्या हातून जे काय तुझ्या बाबतींत अपराध झाले, त्यांबद्दल तूं आम्हाला क्षमा कर. तूं लवकर बरी व्हावीस आणि तुझ्या कुटुंबियांशीं तुझें पुनर्मीलन व्हावें अशी आम्ही जबरदस्त आशा धरून आहोंत.'" परंतु त्यांचीं ही पत्रें फार उशीरां पोंचलीं. कारण क्लारिसानें अगोदरच राम म्हटलेला होता.

तिच्या अंत्ययात्रेसाठीं तिचें शव तिच्या वडिलांच्या घरीं रवाना झालें. ज्या आजोबांनीं तिला दिलेली वारसाहक्काची संपत्ति हें तिच्यावरील आपत्तीचें एक मूळ कारण होतें, त्याच आजोबांच्या थडग्याच्या पायथ्याशीं कौटुंबिक दफनभूमींत तिला मूठमाती मिळाली. तिच्या मृत्यूमुळें अगदींच हताश झालेल्या लव्हलेसचें मन वळवून लॉर्ड एम्- यानें त्याला विरंगुळा म्हणून दौऱ्यावर जायला लावलें.

तिकडे क्लारिसावरील अन्यायाचा सूड पूर्ण झाला. फ्रान्स देशांत लव्हलेस आणि कर्नल मॉर्डेन यांची गांठ पडली. हिंवाळ्यांतल्या एका ऐन सकाळीं क्लारिसाचा मामेभाऊ मॉर्डेन यानें तिला फशीं पाडणाऱ्या लव्हलेसबरोबर द्वंद्व युद्ध केलें. तरवारीचें टोंक लव्हलेसच्या शरीरांतून आरपार घुसून त्याला प्राणांतिक जखम झाली. मरतां मरतां त्यानें अशी आशा प्रदर्शित केली कीं "माझ्या मृत्यूमुळें तरी माझ्या गुन्ह्यांची निष्कृति झाली तर फार बरं होईल."

## क्लॉडियस द गॉड

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* रॉबर्ट ग्रेव्ह्ज (१८९५- ). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक बखर. *काळ :* इ. स. ४१-५४ *स्थळ :* रोम, ब्रिटन, पश्चिम आशिया. *प्रथम प्रकाशन :* १९३४.

*प्रमुख पात्रें :* **टायबेरियुस क्लॉडियस ड्रुसुस नीरो गेर्मानिकुस,** रोमचा बादशहा. **मेस्सालिना,** त्याची तिसरी पत्नी. **काल्पुर्निया,** त्याची रखेली. **आग्रिप्पिनिल्ला,** त्याची चौथी पत्नी. **लुक्टुस डॉमिटियुस,** यालाच मागाहून नीरो हें नांव मिळालें; हा आग्रिप्पिनिल्ला हिचा पुत्र आणि क्लॉडियसचा नातू. **हेरॉड आग्रिप्पा,** बाशानचा टेट्रार्च.

*समीक्षण :* तपशिलांची कांटेकोर काळजी घेणें आणि घटना व पात्रें कसोशीनें हाताळणें हें 'क्लॉडियस द गॉड अँड हिज वाइफ मेस्सालिना' या कादंबरीचें खास वैशिष्ट्य. कादंबरीकार ग्रेव्हज याचें तंत्रच असें आहे कीं ज्या जीवनाविषयीं व काळाविषयीं तो लिहितो, त्या जीवनाचें व काळाचें उठावदार व ठसठशीत चित्र त्याला पुन्हां उभें करतां येतें. 'आय, क्लॉडियस' या कादंबरीचा हा उत्तरार्ध असला तरी प्रस्तुत कादंबरी तिच्यापरी स्वतंत्र कथाच आहे.

*कथानक :* बादशहा क्लॉडियस हा गादीवर बसण्यापूर्वी क्लॉडियस कुळांतला उपेक्षित पंडित होता. त्या काळांतल्या त्याच्या मित्रपरिवारांत व हितचिंतकांत हेरॉड आग्रिप्पा याची गणना होत असे. टायबेरियस बादशहानें हेरॉड याला देशद्रोही भावना प्रदर्शित केल्याबद्दल तुरुंगांत घातलें. परंतु कॅलिग्युला गादीवर आला, तेव्हां त्यानें हेरॉड याला बाशानचें टेट्रार्कपद बहाल केलें. कॅलिग्युलाचा खून झाल्यावर राजवाड्यांतल्या गार्ड्सनीं क्लॉडियस बादशहा झाल्याची ग्वाही फिरविली. त्या वेळीं हेरॉड सरकारी कामानिमित्त रोम राजधानीला परत आलेला होता.

सुरवातीला क्लॉडियसची अवस्था मोठी कठीण होती. तो लंगडा आहे, तोतरा आहे आणि बावळट आहे असें लोकमत असल्यामुळेंच त्याला ही विशेष अडचण जाणवत होती. कॅलिग्युलानें चार वर्षें जो अंदाधुंदीचा राज्यकारभार केला, त्यानंतर ही राज्यधुरा वाहण्याची कर्तबगारी असल्या माणसाच्या अंगीं नक्कीच असणार नाहीं, म्हणून रोमन सेनेटला त्याच्या बाबतींत विशेष अशी अपेक्षाहि नव्हती. परंतु राज्य हातीं येतांक्षणीं क्लॉडियसनें सुधारणांचा एक कार्यक्रम आरंभला. त्यांत सेनेटची पुनर्घटना, राज्याच्या अर्थव्यवहाराला स्थिरता आणणें आणि कॅलिग्युलाचीं अनेक क्रूर फर्मानें रद्द करणें, या गोष्टींना प्राधान्य होतें. आपला हा व्यापक कार्यक्रम अंमलांत आणण्यासाठीं त्यानें अनेक नव्या मंत्र्यांची नेमणूक केली. आपली पत्नी

मेस्सालिना हिच्याकडे त्यानें सार्वजनिक नीतीच्या डायरेक्टरचा अधिकार सोंपविला. कारण सेनेट सदस्यांच्या यादीची पुनर्घटना करण्याच्या कामीं तिची सगळ्यांत जास्त मदत झालेली होती. आपला निष्ठावंत स्नेही हेरॉड याला त्यानें ज्युडिया, सामारिया आणि ईडॉम या भूप्रदेशाची सुभेदारी दिली. नंतर खुल्या बाजार चौकांत प्रचंड लोकसमुदायापुढें क्लॉडियस आणि हेरॉड या उभयतांनीं स्नेहाच्या व निष्ठेच्या पवित्र आणाभाका घेतल्या.

क्लॉडियस सिंहासनावर आरूढ झाल्यानंतर लवकरच त्याचा पुत्र ब्रिट्टॅनिकस जन्माला आला आणि त्याच्या पाठोपाठ सुमारें अकरा महिन्यांनीं कन्या जन्मली. तिचें नांव ऑक्टेव्हिया ठेवलें. दुसऱ्या अपत्याच्या जन्मानंतर मेस्सालिना बादशहा क्लॉडियस याला भेटायला आली आणि म्हणाली: " मला नव्या राजवाड्यांतील वेगळ्या महालांत जाऊन राहायची परवानगी मिळावी. आपल्यापासून मला दूर राहायचं आहे. ही माझी विनंती आपण मान्य करावी. " क्लॉडियसनें मोठ्या दुःखानें तिच्या या योजनेला अनुमति दिली.

क्लॉडियसच्या देखरेखीखालीं आपल्याला स्वातंत्र्याचा उपभोग तितकासा घेतां येत नाहीं, तो अधिक घेतां यावा, हा नव्या राजवाड्यांत जाऊन वास्तव्य करण्यांत मेस्सालिना हिचा खरा उद्देश होता. नव्या महालांत स्थलांतर करतांक्षणीं तिनें बदफैलीपणा, स्वैराचार, राजकीय कट-कारस्थानें, लांचलुचपत, फसवाफसवी आणि खुनाखुनी—असल्या प्रकारांचा धुमाकूळ आरंभला. क्लॉडियस आपल्या राज्यकारभारांत इतका गढून गेलेला असे कीं मेस्सालिनाच्या या बदकर्मांच्या अफवा त्याच्या कानांवर येण्यापूर्वी सात वर्षें लोटलीं.

क्लॉडियसनें सार्वजनिक बांधकामांचा कार्यक्रम सुरू केला. व्हारसच्या फौजेकडून हातचा घालविला गेलेला गरुडध्वज परत मिळविण्यासाठीं जर्मनीवर स्वारी करायला फौज धाडून दिली. इटलींतलें एक किरकोळ बंड दडपून टाकलें. यानंतर त्यानें ब्रिटन पादाक्रांत करण्याकडे लक्ष पुरविलें. रोमन व्यापारी जहाजें टोगोडुम्नुस यानें अटकावून ठेवलीं आणि ब्रिटन व फ्रान्स या दोन्ही देशांतून ड्रुइड पंथाचा फैलावहि झपाट्यानें होऊं लागला म्हणून या मोहिमेची निकड निर्माण झाली. टोगोडुम्नुस हा आपला भाऊ काराकाक्टुस याच्यासमवेत संयुक्तपणें ब्रिटनवर राज्य करीत होता. क्लॉडियसनें बरीच मोठी फौज देऊन औलुस प्लॉटियुस याला ब्रिटनवर स्वारी करायला धाडलें. विशिष्ट आंकड्यापेक्षां

अधिक प्रमाणांत रोमन फौजेची हानि झाली तर जादा कुमक रवाना करण्याचें त्याला वचन देऊन ठेवलें. औलुस कसाबसा टेम्स नदीपार झाला आणि त्यानें लंडन तर सर केलें. मग लंडनच्या हद्दीलगतच छावणी टाकून तो क्लॉडियसची व जादा कुमक येण्याची वाट बघत राहिला. लंडन व कॉल्चेस्टर यांच्या दरम्यान असलेल्या ब्रेन्टवुड हिल या डोंगराच्या रांगेलगत निर्णायक लढाई झाली. रोमन लोकांनीं क्लॉडियसच्या " आरामखुर्ची " नामक व्यूहरचनेच्या बळावर ही लढाई जिंकली. त्रेपन्न वर्षांच्या वयाला क्लॉडियस आपली पहिली लढाई लढला, तींत विजयी झाला, आणि पुन्हां कधींहि लढला नाहीं. ब्रिटनमध्यें त्याला देवासारखा मान मिळाला आणि तो रोम शहरीं परत आल्यावर त्याचें विजयी वीर म्हणून प्रचंड स्वागत झालें.

आतां त्याला पूर्वेकडे लक्ष देणें भाग पडलें. त्या प्रदेशांत हेरॉड आग्रिप्पा हा संयुक्त ज्यूइश (यहुदी) साम्राज्यस्थापनेचा कट शिजवीत आहे अशा बेचैन करणाऱ्या बातम्या त्याच्याकडे येऊं लागलेल्या होत्या. हेरॉड गुप्तपणें शेजारचे राजे व बडे सरदार यांच्याशीं दोस्तीचे तहनामे करीत होता. ज्यू (यहुदी) लोक जो मेसाया (अवतारी पुरुष) जन्माला येणार म्हणून केव्हांपासूनची वाट बघत होते, तो मेसाया आपणच आहोंत असें जाहीर केल्यावर ज्यू जमातीचा आपण पाठिंबा मिळवूं अशी त्याला आशा वाटत होती. हेरॉडच्या योजना मुळांतच खुडून काढण्यासाठीं कांहीं एक करतां येणार नाहीं, इतक्या थराला गोष्टी केव्हांच गेलेल्या आहेत हें क्लॉडियसच्या ध्यानांत येऊन चुकलें. एका मोठ्या उत्सवाची संधि साधून त्या वेळीं आपणच मेसाया आहोंत असें जाहीर करण्याचा बेत हेरॉडनें योजून ठेविला. त्या उत्सवाच्या वेळीं शेजारच्या राजे लोकांनीं त्याला देव म्हणून संबोधलें. ही गोष्ट त्यानें त्यांना खुशाल करूं दिली; त्यांची चूक दुरुस्त करणाऱ्या भानगडींत तो पडलाच नाहीं. त्या क्षणीं एक घुबड सभास्थानीं पंख फडफडावीत आलें. हेरॉडला या प्रसंगीं एका भविष्याची आठवण झाली. " पुन्हां जेव्हां घुबड तुझ्या दृष्टीस पडेल तेव्हां तुझें मरण जवळ आलें आहे असें तूं समजून चाल. तें घुबड जितके घूत्कार करील तितकेच दिवस त्यापुढें तूं जगशील. " असें तें भविष्य होतें. घुबडानें त्या प्रसगीं पांच घूत्कार काढले; आणि त्यानंतर पांच दिवसांनीं हेरॉडला मृत्यूनें

गांठलें. ज्यू ( यहुदी ) जमातीचें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा त्याचा कट तिथल्या तिथें कोसळला.

क्लॉडियसच्या लग्नाला सुमारें आठ वर्षें झाल्यानंतर त्याची पत्नी मेस्सालिना त्याला एक विलक्षण कहाणी सांगायला आली. ती म्हणालीः " बार्बिलस या ज्योतिष्यानं एक भविष्य वर्तविलय. त्या भविष्यानुसार आपण तीस दिवसांच्या आंत मरणार आहांत. म्हणजे ' आइड्स ऑफ सप्टेंबर ' ( १३ सप्टेंबर ) या तारखेपुढं आपण जगणार नाहीं. माझे पहिले पतिराज सिलियस यांच्याशीं मला पुन्हां लग्न करतां यावं म्हणून आपण जर मला काडीमोड द्याल तर आपलं मरण कदाचित टळेल. " परंतु ही सगळी कहाणी म्हणजे नुसता बहाणा होता. कांहीं तरी खुसपट काढून क्लॉडियसचा कांटा आपल्या मार्गांतून दूर करावा आणि सिलियसशीं लग्न करायचा आपला मार्ग मोकळा व्हावा यासाठीं तिनें ही भाकडकथा रचून सांगितली. वस्तुतः ती आणि सिलियस या दोघांनीं क्लॉडियसचा खून करायचा कट चालविलेला होता आणि त्याच्यामागून त्याची गादी स्वतः बळकावायचा त्यांचा डाव होता. तिचें सिलियसशीं लग्न सप्टेंबरच्या दहा तारखेला होणार असें जाहीर करण्यांत आलें परंतु क्लॉडियस रोम शहराबाहेर गेलेला असतांना तिनें तारीख पांच सप्टेंबरलाच सिलियसशीं लग्न केलें. क्लॉडियसची एक पूर्वकालीन रखेली काल्पुर्निया हिनें शेवटीं त्याला मेस्सालिनाच्या एकंदर वैवाहिक आयुष्यांतील वागणुकीची सगळी खरी हकीगत निवेदन केली. क्लॉडियसनें शंभराहून अधिक लोकांवर खटले भरून त्यांचा शिरच्छेद करविला. यांच्यापैकीं बहुतेकांनीं मेस्सालिनाशीं व्यभिचार केलेला होता. खुद्द मेस्सालिना हिला राजवाड्यांतील गार्ड्सच्या एका अधिकाऱ्यानें ठार मारलें.

क्लॉडियसनें पुन्हां लग्न केलें. या वेळीं त्यानें आपली भाची आग्रिप्पिनिल्ला हिच्याशीं म्होतूर लावला. तिला अगोदरच्या नवऱ्यापासून एक मुलगा झालेला होता. त्याचें नांव लुसियुस डॉमिटियुस. तोच पुढें बादशहा नीरो झाला. क्लॉडियसला अतःपर जीवनांत कसलीच गोडी वाटेना. आपला राज्यकारभार त्यानें आग्रिप्पिनिल्ला आणि आपले मंत्री यांना हवा तसा चालवायला मोकळीक दिली. क्लॉडियसनें लुसियुसला दत्तक घेतलें आणि ब्रिट्टानिकुसच्या जोडीला त्याला आपला संयुक्त वारस नेमला. लुसियुस प्रथम सज्ञान झाला आणि आग्रिप्पिनिल्ला हिनें आपला मुलगा हाच रोमचा एकमेव राज्याधिकारी झालेला

बघावा असा हेतु मनांत धरून क्लॉडियसवर विषप्रयोग केला. नीरो याच्या हातीं सगळें साम्राज्य पक्कें सुपुर्द होईपर्यंत क्लॉडियसच्या मृत्यूची बातमी जनतेपासून छपवून ठेवण्यांत आली. अशा प्रकारें रोमचा बादशहा आणि रोमन देवाधिदेव क्लॉडियस याची कटकटींनीं गजबजलेली राजवट समाप्त झाली.

## द क्लेहॅंगर ट्रायलॉजी

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* आर्नोल्ड बेनेट ( १८६७-१९३१ ). *कथानकाचा प्रकार :* घरगुती वास्तववाद. *काळ :* १८७०-१८९५. *स्थळ :* इंग्लंड. *प्रथम प्रकाशन :* १९१०, १९११, १९१५.

*प्रमुख पात्रें :* **एडविन क्लेहॅंगर**, एक व्यापारी. **हिल्डा लेस्वेज**, त्याची पत्नी. **मॅगी क्लेहॅंगर**, एडविन याची बहीण. **मिस्टर इंगपेन**, एडविन क्लेहॅंगर याचा मित्र. **जॉर्ज कॅनन**, हिल्डा हिचा पहिला नवरा. **डारियस क्लेहॅंगर**, एडविन याचे वडील.

*समीक्षण :* 'क्लेहॅंगर,' 'हिल्डा लेस्वेज' आणि 'दीज ट्वेन' हे तीन भाग मिळून तयार झालेल्या 'द क्लेहॅंगर ट्रायलॉजी' या त्रिखंडात्मक कादंबरींत कादंबरीकार बेनेट यानें एकोणिसाव्या शतकाच्या अखेरी अखेरीच्या काळांतील इंग्लंडच्या मध्यमवर्गाचें चित्र सहानुभूतीनें व समजूतदारपणें रेखाटलें. कुरूपतेसाठीं कुरूपता हा जो यथार्थवादी लेखकांचा खाक्या, तो त्यानें पतकरला नाहीं. इंग्लंडच्या उद्योगप्रधान मध्यविभागांतील ज्या प्रदेशाचें चित्रण त्यानें केलें, तो सगळ्यांत कमी सौंदर्यपूर्ण असा असला, तरी त्यांतला कुरूपपणाच तेवढा टिपायचा, असा प्रकार त्यानें केला नाहीं. त्या प्रदेशांतलें एक प्रकारचें घरगुती सौंदर्य त्याच्या प्रत्ययाला आलें. या कलाकृतींतील घटना जरी उठावदारपणें वाचकाच्या मनांत रेंगाळत राहत नसल्या, तरी तींतील पात्रें मात्र स्पष्टपणें व दीर्घकाळ ध्यानांत राहतील, हें नक्की.

*कथानक :* १८७२ सालीं सोळा वर्षें वयाच्या एडविन क्लेहॅंगरनें आपल्या वडिलांना क्लेहॅंगर प्रिंटिंग प्रेसच्या कामांत मदत करण्यासाठीं शाळा सोडली. आपल्याला शाळेंत जाऊं द्यावें आणि आर्किटेक्ट (वास्तुशिल्पी) होण्यासाठीं अभ्यास करूं द्यावा अशी विनंति एडविन यानें वडिलांना केली.

परंतु तिच्याकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. त्याचे वडील म्हणजे वयोवृद्ध डारियस क्लेहँगर हे स्वकष्टानें पुढें आलेले गृहस्थ होते. कुमार वयांत सक्तीच्या शाळेंतील अंगमेहनतीच्या कामाचा अनुभव घेऊन चढत चढत इंग्लंडच्या मध्यविभागांतील प्रदेशांतल्या समाजांत त्यांनीं धनिकपद प्राप्त करून घेतलें. आपला व्यवसाय आपल्या एकुलत्या एक मुलानें पुढें चालवावा अशी त्यांची इच्छा होती. घरांत त्यांचीच संपूर्ण जुलुमशाही चालू असल्यामुळें त्यांच्या इच्छेच्या आड येण्याची हिंमत कुणालाच होत नसे.

यानंतर कित्येक वर्षांनीं डारियस क्लेहँगर यांनीं गांवांतील जरा अधिक प्रतिष्ठित विभागांत नवें घर बांधलें. शेजारीं राहणाऱ्या ऑर्ग्रीव्ह कुटुंबाशीं एडविन याची दोस्ती जमली. ऑर्ग्रीव्हकाका हे आर्किटेक्ट होते आणि त्या व्यवसायांत आपल्याला स्वतःला कशी काय प्रगति करतां येईल- याविषयीं त्यांच्याशीं चर्चा करण्यांत एडविन अनेक तास खर्च करी. त्याला नकळत ऑर्ग्रीव्हकाकांची ज्येष्ठ कन्या जॅनेट हिचें त्याच्यावर प्रेम बसलें.

या शेजाऱ्यांच्या घरीं हिल्डा लेस्वेज हिच्याशीं एडविन याची गांठभेट झाली. तिचे आई-वडील हयात नव्हते. जॉर्ज कॅनन नामक माजी मालकाच्या बहिणीकडे ती ब्रायटन येथें राहत असे. या कॅननने तिच्याशीं लग्न करायचा विचार चालविला. तिला एडविनविषयीं आकर्षण वाटत असून देखील ती ब्रायटनला परतली आणि लवकरच तिनें कॅननशीं लग्न केलें. लग्नाच्या वेळीं तिनें आपली अल्पशी वडिलार्जित पुंजी आपल्या वतीनें कुठें तरी गुंतवायला त्याच्या स्वाधीन केली.

एक वर्षानंतर हिल्डा परत ऑर्ग्रीव्ह कुटुंबाला भेटायला आली. त्या वर्षाच्या अवधींत तिला असें कळून आलें कीं आपल्या पतिराजांचें पहिलें लग्न झालेलें असून आपलें त्यांच्याशीं झालेलें लग्न रद्द ठरलें आहे. या दुसऱ्या भेटीच्या वेळीं तिचें एडविनशीं प्रेम जमलें आणि तिनें त्याला लग्नाचें वचन दिलें. कारण ब्रायटन येथील तिच्या लग्नाची बातमी कुणालाच ठाऊक नव्हती. मग आपल्याला दिवस गेले आहेत असें कळतांच ती ब्रायटनला परत गेली. तिनें जॅनेट ऑर्ग्रीव्ह हिला पत्रांतून कळविलें कीं "माझं अगोदरच लग्न झालेलं आहे. हें तूं कृपा करून एडविनला कळव." ही गोष्ट त्याच्या मनाला

फार लागली आणि त्यानें आपलें सगळें लक्ष वडिलांच्या धंद्यांत गुंतविलें; कारण वडील मानसिक विकृतीनें आजारी झालेले होते.

दरम्यान हिल्डा बाळंतीण झाली आणि तिनें आपल्या मुलाचें नांव जॉर्ज एडविन असें ठेवलें; म्हणजे या नांवांत मुलाचा बाप आणि एडविन क्रेहँगर या दोघांच्याहि नांवांचा समावेश झाला. तिच्या नणंदेच्या मालकीचें एक लॉजिंग बोर्डिंग चालविण्याचें काम ती करीत असे. कॅननच्या पहिल्या बायकोनें त्याच्या दुसऱ्या लग्नाचा पत्ता लावला आणि त्याला द्विभार्याप्रतिबंधक कायद्याचा भंग केल्याबद्दल दोन वर्षें तुरुंगवासाची शिक्षा मिळाली. तुरुंगांतून सुटल्यावर बनावट चेक दिल्याबद्दल त्याला पुन्हां दहा वर्षें कैदेची शिक्षा झाली. हिल्डाचे पैसे त्यानें व्यहारशून्यपणें एका हॉटेल कॉर्पोरेशनचे शेअर खरेदी करण्यांत गुंतविलेले होते, आणि त्या कंपनीचें दिवाळें वाजल्यावर हे पैसे बुडाले. हिल्डा अतःपर आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र राहिली नाहीं.

वडिलांच्या मृत्यूनंतर एडविन आणि त्याची बहीण मॅगी हीं दोघें क्रेहँगर कुटुंबाच्या घरांत एकेकटींच राहूं लागलीं. दोघांनाहि एकलकोंड्या अविवाहित जीवनाची संवय लागली. वस्तुतः जॅनेट ऑर्ग्रीव्ह म्हणा अगर अनेक अन्य तरुणी म्हणा, यांच्यापैकीं कुणीहि एडविनशीं आनंदानें लग्न केलें असतें. कारण त्याचा छापखान्याचा धंदा चांगलाच भरभराटून वाढत चालला होता.

हिल्डाचा मुलगा तात्पुरता ऑर्ग्रीव्ह कुटुंबाकडे राहायला आला. त्याचा एडविनला खूपच लळा लागला. हा जॉर्ज एडविन इन्फ्ल्युएंझानें आजारी झाला तेव्हां एडविननेंच डॉक्टरला बोलावणें धाडलें आणि हिल्डाला ही बातमी कळविली.

हिल्डा आणि एडविन या दोघांपैकीं कुणीहि आपल्या भावना उघडपणें बोलून दाखवत नसलें तरी आजारी मुलाची शुश्रूषा करण्यासाठीं दोघें एकत्र आल्यावर त्यांचें एकमेकांविषयींचें प्रेम पुन्हां प्रगट झालें. पूर्ववत ठीकठाक झाल्यावर तो आईबरोबर ब्रायटनला परत गेला. हा वेळपर्यंत एडविन आणि हिल्डा यांची पहिली मुलाखत झाल्याला नऊ वर्षें लोटलीं. ब्रायटन येथील डबघाईला आलेला लॉजिंग बोर्डिंगचा धंदा ती कसाबसा चालू ठेवण्याची अजूनहि धडपड करीत होती.

आणखी कांहीं महिन्यांनीं हिल्डाला भेटायला एडविन गेला आणि पाहतो

तों तिच्याजवळ अजिबात पैसा नाहीं आणि घरमालक तिला घरांतून काढून लावायच्या बेतांत आहे. त्यानें तिचीं बिलें भागवून टाकलीं आणि तिनें त्याला आपल्यावर आलेल्या सगळ्या प्रसंगाची कहाणी सांगितली. आपलें लग्न रद्द झालें म्हणून आपला मुलगा विवाहबाह्य संतति ठरला आहे असा तिनें खुलासा केला. एडविन घरीं परतला, परंतु शेवटीं त्यानें हिल्डाशीं गाजावाजा न करतां लग्न करायचें ठरविलें. तो तिला लंडन शहरीं भेटला आणि तिथें दोघें विवाहबद्ध झालीं. मग दोघें क्लेहँगर कुटुंबाच्या घरीं राहूं लागलीं. मॅगी आपल्या एका अविवाहित मावशीकडे राहायला गेली. हिल्डाच्या मुलाला एडविननें दत्तक घेतलें आणि त्याला आपलें नांव ठेवलें.

एडविन दीर्घ काळ आपल्या मनासारखें वागत आलेला. घरच्या कारभारांत ठराविक प्रकारच्या नित्यक्रमाला व स्वतःचे निर्णय स्वतः घ्यायला सरावलेला. परंतु हिल्डाचें व्यक्तिमत्व त्याच्याइतकेंच जोरकस. आणि "ही स्वतःच्या घरगुती मतांनुसार व संवयींनुसार मला तंतोतंत वागायला लावायच्या खटपटींत असते," असें एडविनला वाटूं लागलें. निदान धंद्याचें क्षेत्र हें तरी सर्वस्वीं आपलें स्वतःचें आहे असें त्याचें मत होतें; परंतु ती त्याच्यावर त्या क्षेत्रांतहि प्रभाव पाडण्याचा प्रयत्न करूं लागली, हा त्याच्या मतें अगदीं कहरच झाला.

लग्नानंतर कांहीं महिन्यांनीं मॅगी क्लेहँगर हिची मावशी खूप आजारी पडली. जिच्याकडे ती राहायला गेली होती तीच ही मावशी. ती मरणाच्या पंथाला लागलेली असतां एडविनचा एक व्यावसायिक मित्र इंगपेन याला कारखान्यांतील अपघातांत दुखापत झाली. इंगपेनला इस्पितळांत यदाकदाचित मरण आलें तर कांहीं पत्रें व चित्रें इतरांच्या हातीं लागूं नयेत म्हणून तीं नष्ट करण्यासाठीं एडविन त्याच्या बिऱ्हाडीं गेला. तिथें त्याला एक बाई झोंपलेली आढळली. ही इंगपेनची रखेली. या बाईचा नवरा कायमचा वेडा झालेला होता. आपल्या मित्राच्या या भानगडीमुळें एडविन बेचैन झाला, परंतु इंगपेन हंसून म्हणाला : "आहे हीच परिस्थिति उत्तम आहे. कारण मला लग्नाच्या सांपळ्यांत अडकून पडायला नकोय."

एडविनची मावशी वारली. तिची इस्टेट एडविनची धाकटी बहीण क्लारा

हिच्या मुलांना मिळाली. या व्यवस्थेमुळें एडविन आणि मॅगी यांना आनंद झाला. परंतु हिल्डाच्या मतें आपल्याला व एडविनला या इस्टेटींतला थोडासा हिस्सा मिळायला हवा होता. तिचा स्वार्थीपणा एडविनला बोंचला. आपल्या जवळ पुरेशी श्रीमंती आहे, अशा परिस्थितींत आपले भाचे व भाच्या यांना हा पैसा मिळणें हेंच योग्य ठरतें, असें त्याला वाटलें. आपल्या सध्यांच्या अवस्थेंत काडीमोड हाच मार्ग इष्ट ठरतो असा गंभीर विचार त्याच्या मनांत आला. आपण अविवाहित असतांनाचा काळ किती तरी सुखाचा होता याची आठवण होऊन त्याला हुरहुर लागली. आपल्या आयुष्यांतील एकुलता एक तेजस्वी किरण म्हणजे आपला सावत्र मुलगा जॉर्ज एडविन हाच आहे असें त्याला दिसून आलें. जॉर्ज आतां जॉन ऑर्ग्रीव्हज याच्या मदतीनें आर्किटेक्चरचीं ( वास्तुशिल्पाची ) मूलतत्वें शिकत होता. आपल्या या पुत्राला आतां आर्किटेक्ट होण्याची संधि मिळेल अशी एडविननें आशा धरली.

हिल्डा व एडविन हीं दोघें नजीकच्या शहरीं गेलीं. तिथें एका तुरुंगाची पाहणी करण्यासाठीं त्यांना नेण्यांत आलें. तिथें त्यांना जॉर्ज कॅनन दिसला. खोटी सही केल्याचा आरोप त्याच्यावर शाबीत होत नाहीं असें आढळून आल्यावर त्याची यानंतर लवकरच सुटका झाली. मग हिल्डाला नकळत तो एडविनला भेटला, आणि एडविननें त्याला अमेरिकेला जायला पैसे दिले. हे पैसे आपल्याला परत मिळतील अशी एडविननें मुळींच अपेक्षा ठेवलेली नव्हती, परंतु कॅननची पीडा या देशांतून एकदांची टळावी हें त्याला हवें होतें. कॅननच्या दुसऱ्या पत्नीशीं हिल्डाचा पत्रव्यवहार चालू होता ही आणखी एक डोकेंदुखी त्याच्या मागें लागलेली होती.

हिल्डाच्या सहवासांतील एडविनच्या अस्वास्थ्याचा कळस झाला तो नाताळच्या सणादिवशीं. त्या दिवशीं ती त्याला ग्रामीण भागांतलें एक घर बघायला आपल्या बरोबर घेऊन गेली. त्याला हें घर विकत घ्यायला भाग पाडण्याचा प्रयत्न म्हणून तिनें मुत्सद्देगिरीचे डाव लढविले. मित्रपरिवाराशीं व आप्तेष्ट मंडळींशीं तिनें या बाबतींत अशा प्रकारें बोलणें केलें कीं हें घर विकत न घेणें हा एडविनचा मूर्खपणा आहे असें त्यांना वाटावें.

बायकोशीं त्याचें कडाक्याचें भांडण झालें. "तूं हांवरी आहेस, पाताळयंत्री आहेस, अप्रामाणिक आहेस," असे तिच्यावर आरोप करून

तो तावातावानें घरांतून चालता झाला. परंतु हिंवाळ्यांतल्या रात्रीच्या कडक थंडीत खूप लांबवर फेरफटका केल्यावर त्याचें मन पालटलें. आपलें वैवाहिक जीवन आणि आपली पत्नी यांना आपल्या लेखीं खूपच महत्व आहे हें त्याच्या ध्यानांत आलें. त्यानें आपल्या मनाची अशी समजूत घातली : "मी माझ्या पत्नीला झुकतं माप दिलं पाहिजे. माझं तिच्याशीं इतक्या वाढत्या वयांत लग्न झालेलं आहे कीं आमच्या संवयी त्याच्या अगोदरच पक्क्या होऊन बसलेल्या होत्या." शेवटीं त्याच्या मनांत आपला मित्र इंगपेन याच्याविषयींचा विचार आला. जिच्यावर त्याचें प्रेम आहे, तिच्याशीं त्या बिचाऱ्याला लग्नच करतां येत नव्हतें.

हिल्डाशीं पुन्हां दिलजमाई करण्यासाठीं तो घरीं परतला. त्या दिवशींच्या टपालांत अमेरिकेहून आलेला एक चेक त्याला मिळाला. जॉर्ज कॅननला त्यानें उसन्या दिलेल्या पैशांची ही परतफेड होती. या प्रकारावरून मनुष्य स्वभावावरील त्याचा विश्वास पुन्हां पूर्णपणें प्रस्थापित झाला.

## द क्लॉइस्टर अँड द हार्थ : मठवास आणि संसार

*वाङ्मयप्रकार :* कादंबरी. *लेखक :* चार्ल्स रीड (१८१४-१८८४). *कथानकाचा प्रकार :* ऐतिहासिक अद्भुतरम्य कथा. *काळ :* पंधरावें शतक. *स्थळ :* हॉलंड, जर्मनी, फ्रान्स आणि इटली. *प्रथम प्रकाशन :* १८६१.

*प्रमुख पात्रें :* **जिरार्ड एलियासन**, एक तरुण चित्रकार. **मार्गारेट ब्रॅन्ट**, त्याची वाग्दत्त वधू. **डेनिस**, एक बर्गंडियन धनुर्धर. **मार्गारेट व्हॅन आइक**, जान व्हॅन आइक याची बहीण. **घाइसब्रेक्ट व्हॅन स्विएटेन**, गांवचा पाटील.

*समीक्षण :* या कादंबरीचीं दोन ठळक उपांगें म्हणजे पंधराव्या शतकांतील युरोपियन जीवनाचें तींत केलेलें छायाचित्रणासारखें तपशीलवार वर्णन, आणि बर्गंडियन धनुर्धर डेनिस याचें ठसठशीत स्वभावचित्रण. पंधराव्या शतकांतील युरोपियन जीवनाचीं बिनचूक वर्णनें साधावींत म्हणून रीडनें प्रचंड संशोधनकार्य केलें. त्याच्या डेनिसची गणना इंग्लिश साहित्यांतील अत्यंत हृदयंगम पात्रांमध्यें होते. या कादंबरींत आढळणारे विविध वाङ्मय-प्रकार म्हणजे लांबलचक पत्र, काव्य, नाट्यात्मक संवाद, कथेच्या पोटांत उपकथा,

आणि सौंदर्यपूर्ण अद्भुतरम्यता, हे होत. मध्ययुगाच्या अखेरच्या काळांतील कॅथोलिक पंथ व त्या पंथाचे धर्मोपदेशक यांचें वर्णन उद्बोधक आहे.

*कथानक :* कापडाचा व चामड्याचा व्यापार करणारा हॉलंडचा नागरिक एलियास आणि त्याची पत्नी कॅथेरीन या दंपत्याचा पुत्र जिराई यानें लहानपणींच लेखनकला व ग्रंथांची सजावट करण्याचें कौशल्य या क्षेत्रांमध्यें आपल्या बुद्धीचा विकास प्रगट केला. प्रथम त्याला स्थानिक मठांतील गोसाव्यांनीं मदत केली. याच मठांत तो मागाहून दाखल व्हायचा होता. या तरुण चित्रकाराला शिकविणें ही गोष्ट जेव्हां त्या गोसाव्यांच्या आवांक्याबाहेरची ठरली, तेव्हां तो सुविख्यात चित्रकार जॉन व्हॅन आइक याची बहीण मार्गारेट व्हॅन आइक हिचा शिष्य झाला. बर्गंडीचा ड्यूक व हॉलंडचा अर्ल फिलिप द गुड यानें पुरस्कारलेली बक्षिसाची चित्रस्पर्धा ठरली. तींत या मुलानें भाग घ्यावा म्हणून ती बाई व तिचा नोकर रीख्ट हेनेस या दोघांनीं त्याला उत्तेजन दिलें.

आपलीं चित्रें स्पर्धेत दाखल करण्यासाठीं रॉटरडॅम नगराकडे जिराई निघाला. वाटेंत त्याला पीटर ब्रॅट हा वृद्ध इसम आणि त्याची कन्या मार्गारेट हीं दोघें थकून भागून रस्त्याकडेला बसून राहिलेलीं भेटलीं. तो त्यांच्या बरोबरच नगरांत गेला. तिथें डेम व्हॅन आइक हिजकडून आणलेलें ओळखपत्र घेऊन प्रिन्स फिलिप याची कन्या प्रिन्सेस मारी हिला द्यायला गेला. या मुलाच्या हुशारीनें राजकन्या प्रभावित झाली आणि तिनें त्याला असें वचन दिलें कीं "तूं मठवासाची दीक्षा घेतांक्षणीं तुला तुझ्या तेगौं या खेड्यानजीक मी धार्मिक नोकरी देईन." स्पर्धेत बक्षीस मिळवून तो गांवीं परत आला. आपण ज्या मार्गारेट ब्रॅट हिच्या प्रेमांत गुरफटलों आहोंत ती पुन्हां आपल्याला कधीं भेटेल का नाहीं कोण जाणे, असा विचार त्याच्या मनांत घोळत राहिला.

तेगौं गांवचा पाटील घाइसब्रेक्ट व्हॅन स्विएटेन याजकडून केवळ योगायोगानें जिराईला असें कळलें कीं तो म्हातारा आणि त्याची कन्या हीं दोघें जवळच्याच सेव्हनबर्गेन या गांवीं राहतात. तो त्यांच्या झोंपडीवर वारंवार जाऊं लागला. या तरुणाचें मन मार्गारेट ब्रॅट हिच्यांत गुंतलें आहे हेंहि गौप्य पाटलानें त्याची आई कॅथरीन हिच्याजवळ उघड केलें. घरांत भांडण माजलें. जिराईच्या लग्नाला अटकाव करण्यासाठीं त्याला तुरुंगांत डांबून ठेवीन अशी एलियासनें धमकी दिली. मार्गारेट व्हॅन आइक हिनें जिराईला पैसे दिले,

चित्रकलेसंबंधांत बहुमोल सल्ला दिला आणि अशी शिफारस केली कीं " तूं तुझ्या प्रेयसीला घेऊन इटलीला जा. तिथं तुझ्या अंगच्या गुणाचं हमखास चीज होईल. " जिरार्ड आणि मार्गारेट यांचा साखरपुडा झाला, परंतु त्यांना लग्न करायला मिळायच्या अगोदरच पाटलानें त्याला पकडवून तुरुंगांत डांबविलें. रात्रीं त्याची प्रियतमा मार्गारेट, त्याचा ठेंगणा भाऊ गाइल्स आणि त्याची लंगडी बहीण केट, या तिघांनीं त्याला तुरुंगांतून सोडविलें. हें काम करतां करतां गाइल्सनें कोठडींतील एका पेटींतून कांहीं जुनी कागदपत्रें काढून नेलीं. त्या दुष्ट पाटलानें तीं तिथें ठेवलेलीं होतीं. सेव्हनबर्गेन गांवीं जाऊन जिरार्डनें हीं सगळीं कागदपत्रें पुरून टाकलीं. फक्त मार्गारेटच्या वडिलांसंबंधांतील एक दस्तऐवज तेवढा काढून घेतला.

जिरार्ड आणि मार्गारेट यांची शोधाशोध चालू झाली. खूप खळबळ उडाली. शेवटीं हीं दोघं तेगौं गांवाच्या पंचक्रोशींतून सटकलीं. दोघांनीं वेगवेगळे मार्ग पतकरले. मार्गारेट आपल्या गांवीं सेव्हनबर्गेनला परतली आणि जिरार्डनें रोमचा रस्ता धरला. वाटेंत डेनिस नामक एका बर्गंडियन सैनिकानें त्याच्याशीं दोस्ती केली. ही जोडी ऱ्हाइन नदीच्या रोखानें चालूं लागली. अनेक प्रकारच्या साहसमय प्रसंगांतून दोघे मिळून पार पडले.

इकडे सेव्हनबर्गेन गांवीं मार्गारेट ब्रँट आजारी झाली आणि मार्गारेट व्हॅन आइक हिनें तिच्याशीं स्नेह जोडला. या दोघां प्रेमिकांचा एक जुना सैनिक मित्र मार्टिन स्वतः रॉटरडॅम नगराला गेला आणि तिथें प्रिन्स फिलिपला भेटून त्याजकडून त्यानें जिरार्डला माफी मिळवून दिली. डेम व्हॅन आइक हिनें एक पत्र हॅन्स मेम्लिंग याच्या हातीं इटलींत जिरार्डला देण्यासाठीं पाठवून दिलें; पण पाटलाच्या हस्तकांनीं मेम्लिंग याला वाटेंत गांठून त्याच्या जवळचें पत्र काढून घेतलें.

जिरार्ड आणि डेनिस यांना वाटेंत लढाईवर चाललेली बर्गंडियन सैनिकांची एक कंपनी भेटली. त्यांच्याबरोबर घोड्यावर बसून फ्लँडर्सला जायचा हुकुम डेनिसला मिळाला. जिरार्ड एकटाच राहिला. तो तसाच वाट काढत काढत रोम-नगरीकडे चालता झाला. मागाहून ड्यूकच्या फौजेंत लढतांना डेनिस जायबंदी झाल्यामुळें त्याला हॉलंडला परत जायला मिळालें. तिकडे जिरार्ड भेटेल असें त्याला वाटलें. आपण जिरार्डचा दोस्त आहोंत असें त्याच्याकडून कळल्यावर तेगौं

गांवीं एलियास आणि कॅथरीन यांनीं त्याचा चांगला पाहुणचार केला. दरम्यान वृद्ध ब्रॅट आणि मार्गारेट हीं दोघें सेव्हनबर्गेन येथून निघून गेलीं. ती कुठें गेलीं त्यांचा पत्ताच लागेना. डेनिसनें त्या तरुणीच्या शोधार्थ सारा हॉलंड देश पालथा घातला. ती दोघें रॉटरडॅम शहरीं गेलेलीं होती. परंतु त्यांचा पत्ता एकट्या पाटलालाच तेवढा माहीत होता. मार्गारेटनें बेकायदेशीरपणें वैद्यक व्यवसाय सुरू केला. याबद्दल तिला अटक होऊन जबर दंड ठोठावण्यांत आला. कसें बसें जगतां यावें म्हणून तिनें धोबिणीचें काम पतकरलें. शेवटीं डेनिसला तिचा पत्ता रॉटरडॅम नगरांत सांपडला आणि ती दोघें तेर्गौ गांवीं परत आलीं. जिरार्डचें तिच्यावरील प्रेम त्याच्या घरच्या लोकांनीं गोड मानून घेतलें.

जिरार्ड अनेक धोके पतकरून फ्रान्स व जर्मनी या देशांतून प्रवास करीत करीत व्हेनिस नगरींत दाखल झाला. तिथून तो किनाऱ्यावरील वाहतूक करणाऱ्या जहाजांत बसून रोम नगरीकडे चालला. हें जहाज वादळांत सांपडून फुटलें. त्या वेळीं एका रोमन मातेचे व तिच्या मुलाचे प्राण वांचवायचें शौर्य जिरार्डनें गाजविलें. त्यानें रोम शहरीं दाखल होऊन बिऱ्हाड तर थाटलें. परंतु तिथें काम मिळणें जवळ जवळ अशक्य असल्याचें त्याला आढळून आलें. तो आणि दुसरा एक तरुण चित्रकार पिएट्रो या दोघांनीं चरितार्थासाठीं खेळायचे पत्ते सजवून द्यायचें काम चालू केलें. शेवटीं ज्या बाईचे त्यानें जहाज फुटल्यावर प्राण वांचविले होते, तिच्या मेहरबानीनें जिरार्डला एक प्रमुख पंडित फ्रा कोलोन्ना याच्याकडे हस्तलिखितांची सजावट करायची नोकरी मिळाली.

हॅन्स मेम्लिंग एक पत्र घेऊन रोम शहरीं आला. हें पत्र पाटलानें धाडलेलें होतें. त्यांत मार्गारेट वारल्याची खोटी बातमी होती. जिरार्ड हताश झाला. त्यानें नोकरी सोडली आणि वैतागानें टायबर नदींत उडी घेतली. पण त्याचे प्राण कुणी तरी वांचविले आणि त्याला उचलून एका मठांत नेलें. तिथें तो बरा झाला. शेवटीं त्यानें शपथपूर्वक मठवासाची दीक्षा घेतली. डोमिनिकन पंथाचा ब्रदर क्लेमेन्ट हें नवें नांव त्याला मिळालें. कांहीं काळ शिक्षण दिल्यानंतर स्वित्झर्लंडांतील बासल विद्यापीठांत शिक्षक म्हणून त्याची नेमणूक झाली.

पुढें ब्रदर क्लेमेन्ट याला तिथून इंग्लंडला जायचा आदेश मिळाला. वाटेनें प्रवचनें देत देत त्यानें ऱ्हाइन नदींतून प्रवास चालू केला.

रॉटरडॅम नगरींत ल्यूक पीटरसन यानें मार्गारेटचा अनुनय आरंभला.

तीं त्याला म्हणाली : " जिराडेला शोधून काढलंस तरच तुझं माझ्यावर खरं प्रेम आहे असं तुला सिद्ध करतां येईल." परंतु ल्यूक आणि ब्रदर क्लेमेन्ट यांचे मार्ग एकमेकांशीं मिळते होण्याचा योग नव्हता. दीक्षाधारी क्लेमेन्ट आपली प्रेयसी मार्गारेट हिच्या कबरीचें दर्शन घ्यावें म्हणून सेव्हनबर्गेन गांवीं गेला, परंतु तिची कबर त्याला तिथें सांपडली नाहीं. तो सरळ रॉटरडॅम नगराला चालता झाला. या नगरांत त्यानें प्रवचनें दिलेलीं मार्गारेटनें ऐकलीं, परंतु तिनें त्याला जिराडे म्हणून ओळखलें नाहीं. त्यानंतर तो तेर्गौ गांवीं गांवचा पाटील घाइसब्रेक्ट याला भेटायला गेला. पाटील मरायला टेंकलेला होता. त्यानें क्लेमेन्टजवळ आपल्या पापांचा कबुलीजबाब देतांना सांगितलें : " मार्गारेटच्या हक्काची दौलत मी तिला फसवून बळकावली." मरणाच्या अगोदर पाटलानें तिची सगळी दौलत तिला परत दिली.

ब्रदर क्लेमेन्ट पाटलाला सोडून रॉटरडॅम नगराला परतला आणि नगराबाहेर एका गोसाव्याच्या गुहेंत त्यानें आश्रय घेतला. या ठिकाणीं मानवजातीच्या द्वेषानें भारावून त्यानें खूप आत्मक्लेश भोगले.

दरबारांतील बाजारगप्पांतून मार्गारेट हिला त्याचा पत्ता लागला. ती त्याला भेटायला गेली. परंतु सैतानानें धाडून दिलेलें हें तिचें भूत असावें असें समजून त्यानें तिला धुडकावून लावलें. त्याचें चित्त ठिकाणावर आणण्यासाठीं मार्गारेट आपल्या मुलाला बरोबर घेऊन त्याच्याकडे गेली. या मुलाचेंहि नांव जिराडे हेंच ठेवलेलें होतें. मुलाशीं ब्रदर क्लेमेन्ट याची जानपछान झाल्यावर तो शुध्दीवर आला. त्याच्याशीं हिकमतीनें युक्तिवाद करून मार्गारेटनें त्याला आपल्या बरोबर गौडा या गांवीं यायला तयार केलें. धर्मपीठाच्या अधिकाऱ्यांमार्फत तिथल्या चर्चचा धर्मोपदेशक व्हायची संधि त्याला मिळणार होती. तीं दोघें गौडा गांवीं राहिलीं, परंतु एकत्र नाहीं राहिलीं. जिराडे आपल्या चर्चच्या अनुयायांचीं धर्मकृत्यें करण्यांत मग्न झाला, आणि मार्गारेट त्याच्या अनेक परोपकारी कामगिऱ्यांमध्यें त्याला मदत करूं लागली.

दहा वर्षें गौडा गांवीं वास्तव्य केल्यानंतर मार्गारेट प्लेगानें वारली. तिच्या पश्चात् जिराडेला जगण्यांत अर्थ वाटेना. तोहि त्यानंतर दोन आठवड्यांनीं वारला. त्यांचा पुत्र जिराडे हा लहानाचा मोठा झाला. हाच तो सोळाव्या शतकांतील जगप्रसिद्ध बायबल-पंडित व विद्वान साहित्यिक इरॅस्मस.

# डेसी मिलर

*वाङ्मयप्रकार :* लघुकादंबरी. *लेखक :* हेन्री जेम्स (१८४३-१९१६). *कथानकाचा प्रकार :* मानसशास्त्रीय वास्तववाद. *काळ :* एकोणिसाव्या शतकाचा मध्यभाग. *स्थळ :* वेव्ही, स्वित्झर्लंड, आणि रोम. *प्रथम प्रकाशन :* १८७८.

*प्रमुख पात्रें :* डेसी मिलर, प्रवासी अमेरिकन महिला. विंटरबोर्न, परदेशांत वास्तव्य करून राहिलेला अमेरिकन. जिओवानेल्ली, डेसीला लग्नाची मागणी घालणारा इटालियन.

*समीक्षण :* जेम्सच्या बहुतेक कादंबऱ्यांप्रमाणेंच या 'डेसी मिलर' कादंबरीलाहि कथानक जवळजवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. युरोपियन व अमेरिकन रीतिभाती व ध्येयें यांमधील संघर्षात जेम्सला विशेष गोडी वाटते. युरोपियन शिष्टाचार व नीतिविषयक कल्पना यांच्या पार्श्वभूमीवर डेसी मिलरची रांगडी वागणूक व हृदय हेलावून सोडणारी निरागस वृत्ति उठून दिसते. आणि या दोन्ही गोष्टी परदेशांत खूपच दीर्घकाळ वास्तव्य केलेल्या एका अमेरिकनाच्या दृष्टिकोनांतून सादर केलेल्या आहेत. या खास दृष्टिकोनामुळें प्रस्तुत कादंबरीला परस्परविरोधी वृत्तींच्या उपरोधिक अभ्यासाचें स्वरूप प्राप्त झालें असें म्हणतां येतें.

*कथानक :* विंटरबोर्न हा अमेरिकन तरुण युरोपखंडांत दीर्घकाळ वास्तव्य करून राहिलेला होता. त्यानें वेव्ही येथें पुष्कळ दिवस घालविले. त्याची मावशी मिसेस कॉस्टेल्लो हिचें हें आवडतें ठिकाण होतें. एके दिवशीं तो हॉटेलबाहेर रेंगाळत असतांना त्याचें लक्ष एका तरुणीकडे गेलें. रान्डोल्फ मिलर या अमेरिकन मुलाशीं तो बोलत होता आणि या मुलाच्याच नात्यांतली ती तरुणी असावी असें दिसलें. अंमळशानें या तरुणीनें त्याच्याशींहि थोडेंसें संभाषण केलें. तिचें नांव होतें डेसी मिलर. तो मुलगा म्हणजे तिचा भाऊ. आणि तीं दोघें आपल्या आईसमवेत वेव्ही मुक्कामीं आलेलीं होतीं. अमेरिकेंतील सेनेक्टाडी शहराहून ही मंडळी आली असून या मुक्कामानंतर इटलीला जाणार आहेत असें विंटरबोर्नला त्यांच्या बोलण्यावरून कळलें.

आपण अन्यत्र कुठें न जातां अमेरिकेलाच परत जायचें असा रान्डोल्फचा आग्रह होता. डेसीच्या मनांत शियॉंगचा किल्ला बघायला जायचें आहे हें कळल्यावर विंटरबोर्न तिला म्हणाला : "मी तुला हा किल्ला बघायला माझ्याबरोबर घेऊन जाईन; कारण या जुन्या किल्ल्याशीं माझा चांगलाच परिचय आहे."

विंटरबोर्ननें आपली मावशी मिसेस कॉस्टेल्लो हिला डेसी मिलरची भेट घ्यायला सांगितलें. परंतु मिलर कुटुंब हें सामान्यांपैकीं आहे असें तिला वाटल्यामुळें ती डेसीला भेटायला जायला कबूल होईना. त्या दिवशीं संध्याकाळीं सरोवरांत जलविहार करायचा बेत डेसी आणि विंटरबोर्न या उभयतांनीं आंखला. हें ऐकून मिलर मंडळींचा प्रवासी सोबती युजीनियो घाबरला. हा युजीनियो सोबती म्हणण्यापेक्षां त्या कुटुंबांतलाच एक माणूस अशी त्याची गणना होत होती. रात्रीच्या जलविहाराविषयींचा आपला बेत डेसीनें आयत्या वेळीं बदलला. आणखी कांहीं दिवसांनीं विंटरबोर्न व डेसी हीं उभयतां शियॉंगचा किल्ला बघून आलीं. डेसी असंस्कृत व गांवढळ असल्याचें मिसेस कॉस्टेलोचें मत या सफरींत खरें ठरलें.

विंटरबोर्ननें इटलीला जायचा कार्यक्रम ठरविला. तो तिकडे गेल्यावर थेट मिसेस वॉकर या अमेरिकन बाईच्या घरीं दाखल झाला. जीनीव्हा मुक्कामीं या बाईची व त्याची ओळख झालेली होती. तिथें त्याला डेसी आणि रॅन्डोल्फ हीं बहीणभावंडें भेटलीं. "मला भेटायला कां आला नाहींस ?" असें विचारून डेसीनें त्याची चांगलीच हजेरी घेतली. विंटरबोर्न उत्तरला : "हा तूं माझ्यावर उगीचच गहजब चालवला आहेस. मी हा आत्तांच गाडींतून उतरून इथं आलोंय." मिसेस वॉकर आपल्या घरीं एक मेजवानी देणार होती. या मेजवानीला आपला एक इटालियन मित्र जिओव्हान्नी याला आपल्या बरोबर आणायची परवानगी मिसेस वॉकरजवळ डेसीनें मागितली. मिसेस वॉकरनें परवानगी दिली. मग डेसी म्हणाली : "मी आणि माझा इटालियन मित्र अशीं दोघं फिरायला जाणार आहोंत." हें ऐकून मिसेस वॉकर हिला धक्काच बसला. कारण तरुण अविवाहित स्त्रिया इटालियनांबरोबर रोमच्या रस्त्यांतून फिरायला जात नसत. डेसीनें सुचविलें : "या इटालियन तरुणाला

मी ज्या ठिकाणीं जाणार आहे, तिथपर्यंत विंटरबोर्न मला सोबत करायला आला आणि मग आमच्या बरोबर राहिला तर माझी हरकत नाहीं. ”

विंटरबोर्न आणि डेसी हीं दोघें बाहेर पडलीं आणि त्यांना जिओवान्नी एकदांचा सांपडला. कांहीं काळ तिघें मिळून चाललीं. मग मिसेस वॉकरच्या गाडीनें या तिघांना गांठलें. तिनें हातानें खूण करून विंटरबोर्नला बोलावून घेतलें आणि “ डेसीला गाडींत बसायला लावण्यासाठीं तिचं मन वळव ” असें त्याला विनवून सांगितलें. ती म्हणाली : “ असल्या वागण्यानं डेसी आपल्या अब्रूचं खोबरं करून घेत आहे. ती इटालियन लोकांत मिळून मिसळून वागते; आणि यामुळं तिच्याबद्दल जे प्रवाद उठत आहेत त्यांच्याकडे ती लक्षच देत नाहीं. तूं जर आतांच्या आतां डेसीला माझ्या गाडींत येऊन बसायला लावलं नाहींस तर मी तुझ्याशीं कायमचा अबोला धरीन. ” परंतु मिसेस वॉकर व विंटरबोर्न यांच्या विनंत्या डेसीनें धुडकावून लावल्या आणि ती त्या इटालियन तरुणाबरोबर तशीच पुढें फिरायला गेली.

मेजवानीच्या वेळीं डेसीला फटकारायचें असा मिसेस वॉकरनें निर्धार केला. विंटरबोर्न आली. अजून डेसी यायची होती. मिसेस मिलर येऊन एक तास होऊन गेल्यावर मग डेसी आपला जोडीदार जिओव्हान्नी याच्याबरोबर एकदांची उगवली. मिसेस वॉकरचें मन क्षणभर द्रवलें आणि तिनें या दोघांचें सौजन्यपूर्वक स्वागत केलें. परंतु रात्रीं जातांना डेसी निरोप घ्यायला आली तेव्हां मात्र मिसेस वॉकरनें तिच्याकडे पाठच फिरविली. त्या वेळेनंतर डेसी आणि जिओव्हान्नी यांना सगळ्या घरांचे दरवाजे बंद झाले. विंटरबोर्न अधूनमधून तिला भेटे, परंतु ती सदासर्वदा त्या इटालियनाच्या सहवासांत असे. विंटरबोर्ननें विचारलें : “ तुझा याच्याशीं वाङ्‌निश्चय झालाय का ? ” डेसी उत्तरली : “ नाहीं ! ”

एके रात्रीं मलेरिया लागण्याचा धोका असूनहि, जिओव्हान्नी डेसीला बरोबर घेऊन कॉलोसियुम हें प्राचीन रोमचें साठमारीचें मैदान बघायला गेला. या प्राचीन मैदानांत विंटरबोर्न त्यांना भेटला. त्यानें या अविचारीपणाबद्दल त्या इटालियनाला तिथल्या तिथें झाडलें. जिओव्हान्नी यावर म्हणाला : “ हे जुने अवशेष चांदण्यांतच बघायचे असा डेसीनं आग्रह धरला, त्याला मी काय

करूं ?" थोड्याच दिवसांत डेसी खूप आजारी पडली. आजारीपणाच्या मुदतींत तिनें विंटरबोर्नला निरोप धाडला कीं "माझा जिओव्हान्नीशीं कधींहि वाङ्निश्चय झालेला नव्हता." यानंतर आठवड्यानें ती वारली.

रोम शहरांतील प्रॉटेस्टंट पंथीयांच्या स्मशानांत विंटरबोर्न आणि जिओव्हान्नी हे दोघे डेसीच्या कबरीशेजारीं उभे होते. जिओव्हान्नी म्हणाला : "डेसी हयात असती तरी देखील तिनं माझ्याशीं लग्न कधींच केलं नसतं." मग विंटरबोर्नच्या ध्यानांत आलें कीं "मी स्वतःच माझ्या भावनांचा ठाव न घेतां डेसीवर प्रेम करीत होतों. मी जरा वेगळ्या रीतीनं वागलों असतों तर मला तिच्याशीं लग्न करतां आलं असतं." त्याला फार उशीरां शहाणपण सुचलें. आपण युरोपांत वाजवीपेक्षां जास्त काळ राहिलों, यामुळें आपण अमेरिकन शिष्टाचारांतला मोकळेपणा आणि अमेरिकन स्वभावांतील गुंतागुंत या गोष्टी विसरूनच गेलों होतों, हें आतां त्याला पटलें. पण उपयोग काय ?






जगप्रसिद्ध अशा ७६० लेखकांच्या ( यांत ३१ लेखक ' नोबेल प्राइझ ' विजेते आहेत ) उत्कृष्ट अशा १६०० कलाकृतींचा सारांशरूप परिचय **अमर विश्व साहित्य** मालेंतून क्रमशः आपणांस सादर होईल.

या निवडक कलाकृतींत कादंबरी, कथा, नाटक, काव्य, चरित्र, इतिहास, तत्वज्ञान, प्रवास, निबंध, लोककथा इत्यादि सर्व साहित्य–प्रकार आढळतील.

प्रस्तुत चौथ्या भागांत ऑथेल्लो, द मिकाडो, रोमियो अँड ज्युलियेट, मेडेया, द रायव्हल्स, स्ट्राइफ इत्यादि इंग्लिश, ग्रीक, नॉर्वेजियन, आयरिश, फ्रेंच अशीं एकंदर पंधरा नाटकें, एक इंग्लिश काव्य, आयरिश, फ्रेंच, अमेरिकन व इंग्लिश अशा चार कादंबऱ्या मिळून एकंदर वीस जगप्रसिद्ध ग्रंथांचे सारांश दिले आहेत.

**मूल्य रु. ३–५०**